तीन दिवस चालायचा. तर ह्याला फाटा द्या, तो एक तासात दोन तासात करा असा विचार आम्ही सांगू लागलो. अशा आम्ही बारक्या बारक्या सुधारणा, ज्या समाजाला ताबडतोब पचतील आणि समाज ज्या ताबडतोब ग्रहण करील त्या सांगू लागलो. भिन्न जातींमधील लग्ने आम्ही मान्य केली. त्यांची संतती बाजूला पडू नये असा आम्ही विचार सांगितला. अशी आमची तडजोडवादी भूमिका आम्ही मांडीत राहिलो.

— तुमची भूमिका व्यवहारात जरी तडजोडवादी होती तरी तुमची सैद्धान्तिक भूमिका पूर्णपणे विवेकवादी ( रॅशनलिस्ट ) होती असे म्हणणे योग्य ठरेल की नाही ? म्हणजे रॅशनलिस्ट भूमिका आणि तुमची भूमिका ह्यांच्यात सिद्धांताच्या दृष्टीने काही फरक नव्हता.

— मला असे म्हणायचे आहे की आमच्या भूमिकेत परलोकवादी दृष्टिकोन होताच. म्हणजे, मोक्ष, पुनर्जन्म अशा तऱ्हेचे हिंदु धर्मांचे किंवा बौद्ध, जैन धर्माचे जे सिद्धांत आहेत ते आम्ही गृहीत धरले, त्यांच्यावर आम्ही टीका केली नाही. ह्या दृष्टीने असे म्हणता येईल की आम्ही धार्मिक होतो. धर्म आम्ही मानीत होतो. आम्हाला धर्मसुधारणा करायची होती भौतिकवादी दृष्टिकोन जो आहे तो आम्ही मानीत नव्हतो. ही एक मर्यादा आमच्या विचाराला होती. म्हणून मग स्वामींनी निरनिराळ्या तऱ्हेचे जे संस्कार आहेत, विधी आहेत ते लहान करून टाकले. त्यांचा विस्तार नाहीसा केला. यज्ञामध्ये पशुहिंसा करीत असत आत्तापर्यंत. तर पशुहिंसारहित यज्ञ करा असा विचार सांगितला. पशुहिंसेचा जो आचार आहे तो प्राथमिक समाजस्थितीला जुळेल अशा स्वरूपाचा आहे तेव्हा तो बंद करा, बळी देण्याची प्रथा बंद करा असे आम्ही सांगितले म्हणजे बुद्धाने जो सांगितला किंवा जैनांनी जो सांगितला तोच विचार आम्ही सांगितला. परंतु बौद्ध धर्म सोडला आणि जैन धर्म पाहिला तर हा जो परंपरागत जातिभेद आहे तो त्यांच्यांतही अगदी पक्का दृढ आहे. अस्पृश्यतानिवारणाला स्वामींनी मदत केली. उदा. जेव्हा आम्ही महात्मा गांधींकडे गेलो– ३२ साली– तेव्हा जी मंडळी आमच्याबरोबर होती त्यांचे नेतृत्व स्वामींकडे होते. अस्पृश्यतानिवारण झालेच पाहिजे हा दृष्टिकोन त्या ठिकाणी स्वामींनी पत्करला. अस्पृश्यांशी व्यवहार केल्याने पाप लागत नाही, पाप लागते ते उच्च दर्जाच्या नैतिक तत्त्वांशी विरोध केल्याने, त्यांच्या विरुद्ध आचरण केल्याने, आणि ह्या नैतिक तत्त्वांच्या पाठीशी परमेश्वर उभा आहे. असा हा आमचा, धर्मसुधारकांचा दृष्टिकोन होता. म्हणून असे म्हणता येईल की बुद्धिवाद ज्याला म्हणतात, विवेकवाद हल्लीचा अगदी पक्का, परलोकाच्या बाबतीत अज्ञेयवाद स्वीकारणारा किंवा परलोक नाहीच, हाच जन्म आहे असे मानणारा विवेकवाद, तो आमचा दृष्टिकोन नव्हता. स्वामी तर काय होते; ज्याला भौतिकवाद म्हणतात, मटिरिॲलिझम, तो भौतिकवादही एक तऱ्हेचे अद्वैत आहे असे ते मानीत. भौतिक अद्वैत असा लेख त्यांनी लिहिला आहे त्याच्यात भौतिक अद्वैतवादाचा सिद्धांत त्यांनी मांडला आहे. विचारक्षेत्रात ते अतिशय बंधनरहित रीतीने विचार करीत. परंतु प्रत्यक्ष जीवन जे त्यांचे होते ते अतिशय पारमार्थिक होते, मोक्षवादी होते.

— तुम्ही आता गांधींचा उल्लेख केला. त्यावरून एक प्रश्न विचारावासा वाटतो. समन्वयवादी किंवा मीमांसावादी शास्त्रीपंडित आणि तुम्ही सुधारक, म्हणजे धर्मसुधारक, ह्यांच्यात झालेल्या झटापटीची काही हकिकत सांगा ना.

— पहिली झटापट जी झाली ती म्हणजे वाईमध्ये १९२३ साली ब्राह्मणपरिषदेत झाली. ब्राह्मणपरिषदेमध्ये ब्राह्मण पोटजातींच्या एकीकरणाचा मुद्दा निघाला. त्या मुद्यावर मी उठून उभा राहिलो. मी म्हटले की ब्राह्मणांच्या मध्ये एकमेकाविषयी ज्या आख्यायिका आहेत–अमुक एक पोटजात का बहिष्कृत करावी तर परशुरामाने कोळ्यांना पवित्र करून घेऊन त्यांना ब्राह्मण बनविले म्हणून; तेव्हा त्यांच्याशी विवाह करू नयेत किंवा कऱ्हाडे जे आहेत ते ( क्षमा करा ) विधवापुत्र आहेत अशा तऱ्हेच्या अनेक कथा होत्या–ह्या कथांना मी विरोध केला आणि हा जो स्कंदपुराणातील सह्याद्रिखंड आहे त्याच्यात अशा तऱ्हेच्या चमत्कारिक कथा एकाएका पोटजातीविषयी सांगून ह्या पोटजाती खरोखरच भिन्न आहेत आणि त्यांचे एकमेकांविष-







यीचे जे आचार आहेत त्यांना प्रामाण्य आहे असे सिद्ध करण्याचा प्रयत्न केलेला आहे त्यालाही मी विरोध केला. त्या कथा मी तेथे सांगितल्या. अमुक एक जात कोळ्यांची, म्हणजे अंत्यजांची बनलेली आहे, अमुक विधवापुत्र आहेत हे मान्य करू नये असे मी म्हटले. तेव्हा वाईमध्ये त्या सभेत प्रक्षोभ झाला आणि सभा मोडायची पाळी आली. स्वामी उभे राहिले आणि म्हणाले की, अहो ह्याने जे सांगितले ते म्हणजे धर्मशास्त्रामध्ये ज्याला अर्थवाद म्हणतात तो अर्थवाद त्याने सांगितला. अर्थवाद मानू नये असे धर्मशास्त्रात म्हटलेले आहे, एवढाच त्याचा अर्थ आहे, तेव्हा तुम्ही ह्या बाबतीत इतका आग्रह धरू नका. हा पहिला वाद. दुसरा वाद सोनगीर येथे; धुळ्यापासून नरढाणा रेल्वेस्टेशनकडे जाणारा मार्ग आहे त्या ठिकाणी सोनगीर नांवाचे एक लहानसे खेडे आहे. तेथे केशवदत्तमहाराज म्हणून एक बुवा होते. तेथे एक पंडितांची परिषद भरवली. ती म्हणजे कुकुरमुंडे यथील एका वैष्णव संस्थानाचे अधिपती त्यांनी भरवली. त्यांनी भारतांतले पाच पीठांचे आचार्य बोलावले होते. गुजरातेतील वल्लभपंथाचे पुष्टिमार्गी आचार्य जे होते त्यांना बोलावले होते, त्याचप्रमाणे शारदापीठाचे शंकराचार्य, तसेच पुरीचे शंकराचार्य मोठे विद्वान्, संस्कृतचे, इंग्रजीचे व गणिताचे प्राध्यापक होते ते मद्रासला, त्याना बोलावले, कुर्तकोटी शंकराचार्य, त्यांना बोलावले, अशी अनेक पीठांचे आचार्य असलेली मंडळी बोलावली. काशी, कलकत्ता, मद्रास येथील मोठमोठे पंडित, अनंतकृष्णशास्त्री कलकत्त्याचे मोठे वेदान्ती पंडित, लक्ष्मणशास्त्री द्रविड, राजेश्वरशास्त्री द्रविड असे लोक जमविले. आणि त्याच्यामध्ये आम्ही जी धर्मसुधारक मंडळी होतो त्यांना बोलावून सांगितले की तुमचा विचार धर्मशास्त्रदृष्ट्या बरोबर आहे की नाही हे तपासायचे आहे. तुम्ही आले पाहिजे. आम्ही गेलो. त्या ठिकाणी शास्त्रार्थ सुरू झाला. स्वामी वादविवाद, भाषणे करीत नसत; आम्हाला ते शिकवीत असत. (काही लोकांना सभा नसते; म्हणजे सभा साधत नसते.) त्यांचा विद्यार्थी म्हणून मी उभा राहिलो. त्यांनी मला बोलायला सांगितले, त्यांच्या सांगण्यावरून मी पहिल्यांदा शास्त्रार्थ सुरू केला, तो म्हणजे आपण मघाशी जे बोललो, मीमांसापद्धती विरुद्ध ऐतिहासिक पद्धती. ऐतिहासिक पद्धतीचा दृष्टिकोन मी मांडला. मानवी बुद्धीला धर्मपरिवर्तन करता येते हे ऐतिहासिक पद्धतीने सिद्ध करता येते असे मी सांगितले. वेद, स्मृति, पुराणे यांच्यामध्ये परस्परविरोधी जे आचार सांगितले आहेत ते वेळोवेळी ऋषिमुनींनी कसे बदलले आहेत ह्याचे मी प्रतिपादन केले. ऐतिहासिक पद्धतीच बरोबर आहे हा विचार त्या ठिकाणी मी स्थापन केला. वेद हे पौरुषेय की अपौरुषेय अशी चर्चा त्या ठिकाणी सुरू झाली. तेव्हा मी असे सांगितले की वेद हे पौरुषेयच आहेत. थोर माणसांनीच केलेले आहेत. म्हणून बदल केला पाहिजे. तेव्हा अनंतकृष्णशास्त्री हे महापंडित उभे राहिले आणि म्हणाले की भगवत्पूज्यपाद आचार्यांनी, म्हणजे शंकराचार्यांनी 'शास्त्रयोनित्वात्' हे जे ब्रह्मसूत्रातले तिसरे सूत्र आहे त्या सूत्रावरील भाष्यात असे म्हटलेले आहे की वेद हा स्वयंसिद्ध प्रमाण आहे आणि म्हणून तो मानलाच पाहिजे. मग मी एकदम उठून उभा राहिलो आणि म्हटले की शंकराचार्य हे जे आहेत तेसुद्धा माणूसच आहेत. त्यांची वाक्ये जी आहेत ती माणसाची वाक्ये धरली पाहिजेत, ती काही त्रिकालदर्शी ऋषींची वाक्ये नाहीत. असे म्हटल्याबरोबर एकदम क्षोभ झाला व सभा मोडायची पाळी आली. तेव्हा आमचे स्वामी उभे राहिले आणि म्हणाले की आपली जी पद्धती आहे, दार्शनिक पद्धती, ती अशी आहे की चार्वाकाचा पक्षसुद्धा पूर्वपक्ष म्हणून मांडायचा-- शंकराचार्यांनी मांडलेला आहे— बौद्ध पूर्वपक्ष मांडायचा, बौद्ध व जैन हे अवैदिक, त्यांचेही मत मांडायचे. त्याप्रमाणे लक्ष्मणने हा पूर्वपक्ष मांडला आहे. तेव्हा सभा न मोडलेली बरी. मंडळींनी हे मानले आणि शास्त्रार्थ पुढे चालू राहिला.

—गांधीजींच्या आणि स्वामींच्या काही गाठी पडल्या होत्या असे तुम्ही मघाशी म्हणाला. ह्या गाठी कोणत्या निमित्ताने पडल्या ?

--म. गांधींनी येरवड्यामधून अस्पृश्यता-निवारणाची चळवळ सुरू केली. १९३२ साली. आणि राजकीय चळवळ जी आहे ती जोपर्यंत आपण कारावासात आहोत तोपर्यंत करणार नाही असे आश्वासन त्यांनी सरकारला दिले. अस्पृश्यता-निवारणासाठी गांधींनी अनेक मोठमोठ्या विद्वानांना, देशातल्या विचारवंतांना, नेत्यांना निमंत्रण दिले.

हिंदूधर्मशास्त्राप्रमाणे अस्पृश्यतानिवारण होऊ शकते हा विचार सांगणाऱ्या मंडळींनाही बोलावले. वारंवार सभा होत असत. बाबू भगवानदास, आचार्य आनंदशंकर ध्रुव, इ. आधुनिक शिक्षण घेतलेली जी मोठमोठी मंडळी होती त्यांना जसे बोलावले, तसेच जुने जे पंडित, काशी, कलकत्ता, मद्रास, वाई, नाशिक येथील त्यांनाही बोलावले. दोन्ही बाजूंची मंडळी बोलावली. सनातनी मंडळी, अस्पृश्यतानिवारण करणे पाप आहे असे म्हणणारी मंडळी बोलावली आणि अस्पृश्यतानिवारण धर्मशास्त्राप्रमाणे होऊ शकते असे म्हणणाऱ्या मंडळींनाही बोलावले. ह्याच्यामध्ये आम्हा वाईकरांबरोबर स्वामींनाही बोलावले. स्वामींनी चर्चेसाठी यायचे कबूल केले. बाबू भगवानदास होते, प्रि. ध्रुव होते, केशव लक्ष्मण दप्तरी होते, महामहोपाध्याय पाठक अशी मंडळी होती. स्वामींना अकराची वेळ दिली होती. ती त्यांच्या भिक्षेची वेळ. तेव्हा म. गांधींना त्यांनी सांगितले की " माझी भिक्षेची वेळ झालेली आहे. आता ती मी बदलू शकत नाही. " तेव्हा गांधी म्हणाले " मीच तुम्हाला येथे भिक्षा घालतो." आणि त्याप्रमाणे त्यांना तेथे येरवडा जेलमधील भाकरी आणि वरण दिले. त्यांनी ते खाल्ले. ते म्हणाले, " काय छान लागते आहे, गोड आहे." म. गांधींनीही विचारले " कसे काय अन्न आहे ? " म्हणून. स्वामी म्हणाले, " फार छान आहे. " मग चर्चेला सुरवात झाली.

मुख्य चर्चेचा विषय होता तो असा की अस्पृश्यतानिवारण धर्मशास्त्रदृष्टचा होऊ शकते असे म्हणणारे जे धर्मशास्त्रज्ञ पंडित होते त्यांच्या तर्फे एक जाहीरनामा काढायचा होता. गांधींनी 'हरिजन' हे साप्ताहिक सुरू केले होते त्याच्यामध्ये तो जाहीरनामा प्रसिद्ध करायचा होता. तेव्हा जाहीरनाम्याची सूत्रबद्ध मांडणी करायची. मंडळींनी सांगितले की स्वामींनी ती करावी, स्वामी म्हणाले की हा इथे शेजारी माझा शिष्य बसला आहे तो ते सगळे लिहील, मी ते तपासीन आणि मग तुमच्यापुढे सगळे मांडीन. त्याप्रमाणे मी अस्पृश्यतानिवारणाची सिद्धांतपद्धती मांडली, मसुदा तयार केला, स्वामींना दाखवला, त्यांनी तो मान्य केला आणि मग तो दप्तरींना दाखवला. दप्तरींचे म्हणणे असे होते की आज जी अस्पृश्यता आहे ती केवळ अस्वच्छतेमुळे आहे. तेव्हा अस्वच्छता गेली पाहिजे. म्हणजे ते स्पृश्य होऊ शकतात. म. गांधींना ते मान्य नव्हते. कारण अस्वच्छ सर्वच असतात; असू शकतात अगदी स्वच्छ असे थोडेच लोक असतात. तेव्हा 'हे काही बरोबर नाही' असे म. गांधी म्हणाले. दप्तरी हे ऐकेनात. तेव्हा आम्ही त्यांना बाजूला घेतले. स्वामींनी सांगितले ' विचार करा. जे आपण शरीराने स्वच्छ आहोत असे म्हणतो ते शरीर स्वच्छ कुठे आहे ? ते स्वच्छ नाही. म्हणून, त्यांनी योगसूत्रभाष्यातील एक वाक्य सांगितले. 'कायं आधेयशौचत्वात् पंडिता ह्यशुचिं विदुः ' शेवटी दप्तरींनी ते मान्य केले आणि आमच्या सगळ्यांचा मिळून जाहीरनामा तयार झाला आणि 'हरिजन ' च्या तिसऱ्या की चवथ्या अंकामध्ये तो आमच्या सर्वांच्या सह्यानिशी प्रसिद्ध झाला.

जुन्या पंडितांच्या सभा चालूच होत्या. ते गांधीजींकडे मधून मधून यायचे. तेव्हा गांधीजींच्या आज्ञेवरून मला उपस्थित रहावे लागे, एकदा पंचानन तर्करत्न भट्टाचार्य हे महानैयायिक तिथे आले. महात्मा गांधींना त्यांनी सांगितले, " तू इतका थोर, पवित्र महान् पुरुष आहेस, तुझी भावना फार चांगली आहे, पण अस्पृश्यता निवारणाचा हा जो तू विचार केलेला आहेस आणि ही जी चळवळ चालविली आहेस ती आपल्या हिंदूधर्मशास्त्राच्या विरुद्ध आहे; आणि धर्मशास्त्राच्या विरुद्ध जर पारमार्थिक पुरुषाने आचरण केले तर परमार्थ साधणार नाही. आणि तू तर खरा हिंदू आहेस म्हणून मिरवितोस, तर हे बरोबर नाही " असे त्यांनी गांधींना सांगितले. गांधींनी मला जी हकिकत सांगितली त्यावरून मी हे सांगतो आहे. त्या दिवशी मी स्वतः हजर नव्हतो. पंचानन तर्करत्न भट्टाचार्य गेल्यानंतर दुसऱ्या दिवशी मी गेलो तेव्हा गांधीजी म्हणाले, 'तुम्हाला काल बोलवायचे राहिलेच, भट्टाचार्य अचानक आले, चर्चा झाली.' 'काय झाले ? ' मी विचारले. तर गांधीजी म्हणाले, " तू खरा हिंदू आहेस, पारमार्थिक आहेस, असे हिंदू धर्मशास्त्राच्या विरुद्ध वर्तन करू नको, पाप लागेल " असे त्यांनी मला सांगितले. मी महात्माजींना विचारले, " तुम्ही त्यांना काय उत्तर दिले ? ' गांधी म्हणाले, 'मी त्यांना सांगितले की मी इंग्लंडमध्ये होतो. तिथला जो आर्चबिशप आहे त्याच्या लक्षात आले की माझी



अनुक्रमणिका

बायबलवर फार श्रद्धा आहे. मी ख्रिस्ताला फार मानतो. तेव्हां त्यांनी मला सांगितले की तुला खरोखर जर पश्चात्ताप झाला असेल तर तुला इकडेच आले पाहिजे, ख्रिश्चन झाले पाहिजे. तेव्हा मी त्यांना उत्तर दिले की मी खरा हिंदू राहून खरा ख्रिश्चन राहू शकतो, अशी माझी श्रद्धा आहे. मी ख्रिश्चन धर्मात आल्याने मी दोष केला असे होईल. कारण कोणताही मनुष्य ख्रिस्तावर श्रद्धा ठेवून आपापल्या धर्मात राहू शकतो, असे माझे मत आहे आणि आपला धर्म त्याने सोडला तर ते पाप होईल. तेव्हा ते आर्चबिशप म्हणाले तू हिंदूच रहा. तू खरा प्रामाणिक माणूस आहेस. ईश्वर तुला क्षमा करील. गांधी पुढे म्हणाले की मी भट्टाचार्यांना उत्तर दिले की मी खरा हिंदू आहे आणि खरा हिंदू म्हणून जर मी अस्पृश्यता पाळली तर मी पाप करीन. अस्पृश्यता पाळल्याने माझ्या मोक्षाच्या मार्गामध्ये मी धोंड उभी केली असे होईल, मी पाप उभे केले असे होईल, म्हणून ते पाप नाहीसे करायला मी उभा आहे, नाहीतर मला मोक्ष मिळणार नाही. एवढे बोलणे झाले असे सांगून गांधीजींनी मला विचारले, स्वामीजी पुन्हा कधी येतील ? मी म्हटले, 'स्वामीजी वादविवादामध्ये भाग घेणारे गृहस्थ नाहीत, परमार्थी मनुष्य आहे, ते तुम्हाला सल्ला देऊन गेले, आता वाद करायचा जर झाला तर मी त्यांचा शिष्य आहे, मी वाद करायला उभा आहे तुमच्या शेजारी.' तेव्हा गांधीजी म्हणाले, 'आणखी एक सातआठ दिवसांमध्ये हिंदुस्तानातील विशेष पंडित बोलावले आहेत आणि त्यांच्याशी वाद आहे. तर उपस्थित रहा.' असे त्यांनी मला उपस्थित रहावयाला सांगितले. त्यादिवशी, आता मला नेमका दिवस माहित नाही पण केसरीमध्ये नरसिंह चिंतामण केळकर ते त्यावेळी संपादक होते. त्यांनी त्यासंबंधाने काही स्वतःचे टीका–टिप्पण केलेले आहे. सकाळी दहाला ही परिषद भरणार होती. दहाला काही ही मंडळी, त्याप्रमाणे उपस्थित राहिली नाहीत. वैद्यपंचानन कवडीशास्त्री ह्यांच्याकडे ही काशी–कलकत्ता, मद्रास येथील पंडित–मंडळी उपस्थित झाली होती. महाराष्ट्रातली शास्त्रीमंडळीही जमली होती. ही मंडळी बरोबर एक वाजता आली. दहाची वेळ काही पाळली नाही. त्यांच्या पूजा–अर्चा वगैरे सगळ्या गोष्टी व्हायच्या होत्या. ती मंडळी आली. दरवाजातून त्यांना एकदम आत घेण्याकरता महात्मा गांधींनी माणसे पाठविली. ते म्हणाले, आम्ही येणार नाही; आता असे एकदम. हा कागद घ्या आणि ह्या कागदावर तुम्ही तुमचे जे कोणी पंडित असतील त्यांनी सह्या कराव्यात, तरच आम्ही आत येऊ. महात्माजींनी त्यांना निरोप पाठविला की "तुम्ही इथे या, तुमचा कागद आम्हाला दाखवा, आपण चर्चा करू आणि मग त्यावर सह्या होतील." राजेश्वरशास्त्री त्यांचे पुढारी होते. महान नैयायिक, त्यांनी सांगितले, "हा वाद आहे. आणि त्यामुळे वादामध्ये समयबंध असतो. म्हणजे कोणत्या भूमिका निश्चित मान्य करून पुढे बोलायचे हे समयबंधामध्ये ठरवायचे असते. तर तो समय-बंध आम्ही केलेला आहे. त्याशिवाय आसनपरिग्रह शक्य नाही." हे म्हणणे पुन्हा महात्मा गांधींना कळविले गेले. मी तिथे बसलोच होतो, गांधीजींच्या शेजारी; तर गांधींनी उत्तर दिले की, "अरे, तुम्ही गुरू आहात. मला वाद करायचा नाही पण मला तुमच्यापासून उपदेश घ्यायचा आहे. समजून घ्यायचे आहे. म्हणून तुम्ही आत या." त्यावर ते म्हणाले, "गुरू आणि शिष्य ह्यांचासुद्धा वाद असतो. चर्चा म्हणजे वाद. आणि त्यांच्यामध्ये काही निश्चित भूमिकेच्या आधारावर पुढचा विचार होत असतो. भूमिका निश्चित नसेल तर विचार आणि वाद होऊ शकत नाहीत. हं तर, 'गुरुशिष्यसब्रह्मचारिभिः वादः प्रयोक्तव्यः' या न्यायसूत्रानुसारे राजेश्वरशास्त्री यांनी अशी समयबन्धाची मागणी केली. म्हणून ते म्हणाले, 'हा कागद घ्या आणि सह्या पाठवा.' तो कागद आत आला. त्याच्यामधे संस्कृत व हिंदी भाषेत सांगितलेली आठ–नऊ कलमे होती. त्याच्यामध्ये, 'श्रुतिस्मृतिपुराणानाम् प्रामाण्यम्' ही पहिली अट होती. मी म्हटले– मान्य आहे. दुसरी गोष्ट. श्रुतिस्मृतिपुराणांचा ऐतिहासिक पद्धतीने अर्थ लावायचा नाही. मीमांसापद्धतीनेच अर्थ लावायचा हे दुसरे कलम होते. तिसरी गोष्ट म्हणजे, 'वादाचा विषय कोणता?' त्याच्यामध्ये हिंदी आणि संस्कृत दोन्ही प्रकारांनी मांडणी केली होती. गांधींकरता हिंदी आणि आमच्याकरता संस्कृत, तर तिसरा समयबंधातला


अनुक्रमणिका

मुद्दा असा की, आज जी हिंदूंची देवतामंदिरे आहेत, त्यांच्यामध्ये अस्पृश्यांचा प्रवेश होऊ शकतो; असं तुमच्या पंडितानी मांडायचे, आणि प्रवेश होऊ शकत नाही, पाप लागते, असे आम्ही मांडू. आणि ह्या मुद्यावर वाद होईल. अशा-तऱ्हेचे सात-आठ मुद्दे होते. तेव्हा गांधींच्यापुढे ते मुद्दे मांडल्यावर, गांधीनी मला ते दाखविले. मी म्हटलं "हे सगळं मला मान्य आहे. श्रुतिस्मृति-पुराणानाम् प्रामाण्यम्। मान्य आहे. मीमांसापद्ध-तीने वाद होईल, ऐतिहासिक पद्धतीने नाही ; मान्य आहे. तिसऱ्या मुद्द्याबद्दल म्हटलं, एक थोडा फरक करावा. आणि तो कोणता ? मी म्हटले, संस्कृतमध्ये अद्य अस्पृश्यत्वेन अभिमतानाम् । आणि हिंदीमध्ये "आज माने हूए अछूत।" असे घाला. म्हणजेच, "अछुतों का हिंदु मंदिरोमे प्रवेश हो सकता है, कोई पाप नही लग सकता।" तर ह्याच्यामध्ये मी 'आज माने हुए' एवढीच शब्दावली घातली. बाकी काही नाही. कागद परत पाठविला. त्या कागदावर माझी आणि गांधींची सही केलेली होती ; त्यावेळी आम्ही दोघेच तिथे होतो. अरे हो, आठवलं म्हणजे माझे मित्र आणि शिष्य तर्कतीर्थ रघुनाथशास्त्री कोगजे आम्ही दोघेच इकडे होतो आणि बाकीचे पन्नास मोठमोठे पंडित तिकडे जमलेले होते. मी हे अभिमानाने सांगत नाही. पण खरोखरच आमच्या बाजूने अगदी थोडे लोक होते. त्यानंतर त्यांनी तो कागद परत पाठविला; आणि राजेश्वरशास्त्रीनी असे सांगितले की आम्ही काही वकील नाही ; तुम्ही वकिली केली आहे आणि त्यामुळे आम्ही काही आत येऊ शकत नाही." आणि अशारीतीने संध्याकाळीं पाच वाजेपर्यंत लिखापढी चालली आणि निकाल लागला नाही ; म्हणून ती सभा होऊ शकली नाही. दुसऱ्या दिवशी केसरीमध्ये "म. गांधींनी हे असे करणे योग्य नव्हते. अशा अटी घालायला नको होत्या" असे नरसिंह चिंतामण केळकरांनी लिहिले. मला वाटतं, 'स्फूट-सूचना' मधून जे काही असे, त्याच्यामध्ये हे लिहिलं होतं. दुसऱ्या दिवशी जेथे ही मंडळी जमली होती तेथे मला बोलावून नेले. हे सगळे शास्त्री पूजा करीत होते. पूजा झाली. भोजन व्हायचे होते. काहीतरी बारा वाजून गेले होते. शास्त्रार्थ करूया असे ते म्हणाले. मी म्हटले, तुम्ही भोजन करून घ्या. कारण किती वेळ लागेल सांगता येणार नाही. त्याप्रमाणे त्यांनी भोजन केले. आम्ही एक वाजता बसलो चर्चेला आणि संध्याकाळी पांचपर्यंत चर्चा झाली. शास्त्रार्थ झाले आणि ते जुन्या मीमांसा पद्धतीने झाले. एकच मुद्दा ह्या ठिकाणी सांगतो. तो असा की स्मृतीमध्ये अस्पृश्यांची जी व्याख्या केली आहे, 'ब्राह्मण्याम् शूद्रात् जातः चंडालः'— ब्राह्मण स्त्रीच्या ठिकाणी शूद्राने—म्हणजे चातु-र्वर्ण्यातील चवथ्या वर्णातील कुणी, अस्पृश्याने नव्हे, निर्माण केलेली संतती म्हणजे चंडाल संतती. आणि नंतर त्यांच्यापासून निर्माण होणारी संतती ही चंडाल संतती. तेव्हा मी त्यांना म्हटले की आजचे जे अस्पृश्यवर्ग म्हणून ह्या देशात आहेत, ज्या अस्पृश्य जमाती आहेत त्या आपण अशा प्रतिलोम संकराने निर्माण झालो आहोत असे मानतात का ? आणि इतर असे मानतात का ? असा मी प्रश्न टाकला. ह्यांना 'चंडाल' असेही म्हणत नाहीत. महाराष्ट्रात 'महार' म्हणतात, कुठे 'ढेड' म्हणतात, तुम्ही शास्त्रीपंडित त्यांना 'चंडाल' म्हणता, ते स्वतःला तसे मुळीच म्हणत नाहीत. अशा स्थितीत 'चंडाल' ही जी संज्ञा आहे त्या संज्ञेचा अर्थ स्पष्ट केलेला आहे आणि आज जे अस्पृश्य म्हणून मानले जातात ते संकरज नाहीत असे माझे मत आहे आणि ते संकरज असतील तर तुम्ही तसे जाहीर करा. ते पंडित म्हणाले, "अरे असे आम्ही म्हटले तर आमच्या घरावर दगड पडतील, आमची घरे जाळतील, उगीच काय ? असे आम्ही बोलणार नाही." मग म्हटले "ठीक झाले; आता प्रश्न नाही. वादाचा मुद्दा मिटला" इतर फार मुद्दे निघाले. चार तास आमचा अगदी मोठा घनचक्कर शास्त्रार्थ झाला आणि मग मी त्यांचा निरोप घेतला.

—हे वादविवाद रोमहर्षक आहेत. पण स्वामीजींनी व त्यांच्या शिष्यांनी ह्या क्षेत्रात शांतपणे विधायक कार्य केले असणार. त्या संबंधी काही माहिती ?

—महाराष्ट्रातील मोठमोठी विद्याविभूषित पण संस्कृतमध्ये पारंगत असलेली मंडळी, चिंतनशील अशी मंडळी स्वामींच्या भोवती जमली होती. उदा. म. म. काणे. त्यांचा 'हिस्टरी ऑफ धर्मशास्त्र' हा प्रचंड, जगद्मान्य ग्रंथ आहे. म. म. काणे स्वामींचे

शिष्य. ते त्यांचा जगद्मान्य ग्रंथ लिहीत असताना, इतिहास लिहीत असताना काही अडले की स्वामींना प्रश्न विचारायचे, आणि त्यातून समजून घ्यायचे. अशा रीतीने त्यांनी हा ग्रंथ लिहिला आणि आपल्या ग्रंथात, त्याच्या पाचव्या खंडात त्यांनी मुद्दाम स्वामीजींचा उल्लेख केला आहे– 'आता स्वामीजी नाहीत, मी त्यांना पत्रव्यवहाराने अनेक प्रश्न विचारीत होतो.' तसेच महत्वाचे समाजचिंतक ना. गो. चाफेकर, हे ह्या शिष्यमंडळीत होते. नागपुरचे दप्तरी. पुण्याच्या लॉ कॉलेजचे संस्थापक ज. र. घारपुरे. अशा विविध क्षेत्रातील व्यक्तींचे एक मंडळ स्वामीजींनी स्थापन केले, – धर्मपरिवर्तन मंडळ किंवा तत्त्वनिष्ठ धर्मपरिवर्तन मंडळ (धर्मनिर्णय मंडळ) अशी संस्था स्थापन केली आणि त्या संस्थेच्या द्वारे अनेक लहान लहान पुस्तिका प्रसिद्ध केल्या, संस्कार थोडक्यात कसे करावे हे सांगितले, भिन्न भिन्न शाखांचे जे ब्राह्मण आहेत त्यांचे भिन्न भिन्न कर्मकांडाचे प्रकार राहू नयेत म्हणून त्यांना एक समान कर्मकांड सांगितले, विधवाविवाहाचे कर्मकांड काय असावे हे सांगितले, अशा रीतीने बारिक बारिक सुधारणा त्यांनी सुचविल्या; त्या, त्या वेळी जे सामाजिक प्रश्न उत्पन्न होत असत त्यांची चर्चा हे मंडळ करीत असे आणि परिषदा भरवीत असे. महादेवशास्त्री दिवेकर हे त्यांच्यातले एक अत्यंत प्रखर प्रचारक होते. त्यांनी धर्मसुधारणेची चळवळ महाराष्ट्रात वेगाने पसरवून टाकली. आणि जे नवीन आचार घालून देणे आवश्यक होते त्यांना आधारभूत असे ग्रंथ त्यांनी लिहिले. 'विद्यार्थीधर्म' म्हणून त्यांनी एक पुस्तक लिहिले, पोटजातींचे एकीकरण करण्याचा प्रयत्न केला, अस्पृश्यता निवारणावर निबंध लिहिला, असा अनेक प्रकारे त्यांनी प्रचार केला. त्याचप्रमाणे स्वामींचा एक दृष्टिकोन असा होता की–आणि सामाजिक दृष्टया त्याला फार महत्त्व होते–हे जे जादूगार साधू पुढे येतात ते सर्व खोटे असतात असे त्याचे मत होते. त्यामुळे वाईमध्ये असा कुणी साधू आला आणि आपण चमत्कार करतो असे त्याने म्हटले की तें आम्हा सगळ्या विद्यार्थ्यांना सांगत की असे चमत्कार होऊ शकत नाहीत. सृष्टीचे जे नियम आहेत, विज्ञानाने सिद्ध झालेले, त्यांच्या बाहेर काहीही घडत नाही. आणि ज्या चमत्कारांच्या कथा पुराणात दिल्या आहेत ते केवळ अर्थवाद आहेत, त्या केवळ चांगल्या कर्मांचे स्तवन करतात आणि निंद्य कर्माचा निषेध करतात. त्यांच्यावर विश्वास ठेवू नका असे आम्हाला ते नेहमी सांगत असत. तेव्हा उपासनी बुवा किंवा नारायणमहाराज केडगावकर अशी जी साधूमंडळी तेव्हा वावरत होती त्यांच्या भोवती प्रचंड जमाव जमत असे. नारायणमहाराजांच्या केडगावला उत्सव असला तर पुण्याहून मोठमोठ्या रेल्वे गाड्या भरून जायच्या. हे जे महाराष्ट्रात चालले होते त्याच्याकरिता 'बुवाबाजी'वर– 'बुवाबाजी' हा शब्द मी स्वतः वापरीत नाही कारण तो काहीसा अपमानकारक आहे आणि मला कुणाचा अपमान करायचा नाही, लोकांच्या प्रामाणिक श्रद्धेचा अपमान करायचा नाही– फार मोठा प्रखर हला करणारे लेख महादेवशास्त्र्यांनी लिहिले. महादेवशास्त्र्यांच्या लेखांमागे जी प्रेरणा होती, जे स्पष्टीकरण होते ते स्वामींकडून त्यांना लाभले होते. तर्कतीर्थ रघुनाथशास्त्री कोगजे ह्यांनी धर्मनिर्णयमंडळ स्थापन केले आणि आपण स्वतः त्याचे सचिव बनले. तेही असे धर्मसुधारणेचे प्रश्न उपस्थित झाले की बैठका बोलवायचे आणि चर्चा घडवून आणायचे.

– आता शेवटचा प्रश्न. आज अनेकजण असे म्हणतील की, हे धर्मपरिवर्तनाचे कार्य मुख्यतः ब्राह्मण व तत्सम जाती ह्यांच्यापुरते मर्यादित राहिले. अस्पृश्यता आणि जातिभेद ह्या प्रश्नांना मध्यवर्ती स्थान देऊन त्यांच्यावर हल्ला करण्याचे काम ह्या मंडळींनी केले का?

– जरूर केले. पण त्या बाबतीत ते विचार सांगत असत. प्रत्येक जण, चातुर्वर्ण्य गुणकर्मविभागशः असेच आहे, जातिसंस्था बरोबर नाही, ती बदलत आली आहे हा विचार मांडत असे. आणि हा विचार अतिशय उत्तम रीतीने जागतिक ग्रंथात– म. म. काण्यांच्या 'हिस्टरी ऑफ् धर्मशास्त्र' ह्या ग्रंथात– मांडला गेला आहे. अस्पृश्यतानिवारणाचा विचार अतिशय स्वच्छ रीतीने मांडण्यात आला आहे. हीच मंडळी ह्यांच्यात प्रमुख होती आणि ते आमच्या चळवळीचे आधार होते. आणि ती अगदी चांगली तयार अशी मंडळी होती. परंतु ह्या चळवळीत ह्या ज्या लहानलहान धार्मिक सुधारणा होत्या त्यांना जास्त महत्व दिले गेले. पण बाकीचे विचारही ते व्यवस्थित रीतीने मांडीत असत.

अ. भि. शहा : अनुवादक मे. पुं. रेगे

# इस्लाम आणि मानवतावाद

---

"इस्लामची विचारपद्धती अधिकारवादी ( authoritarian ) आहे. ( खलिफाची ) राजसत्ता निरंकुश असावी हा सिद्धांत, ईश्वराचे त्याने निर्मिलेल्या जीवांशी असलेले नाते निरंकुश सत्तेचे असते ह्या धार्मिक सिद्धांताशी समान्तर आहे." [१]

मानवतावाद हे माणसाविषयीचे एक दर्शन आहे आणि ती एक जीवनपद्धती आहे. "माणूस विश्वात स्वतःच्या मदारीवर उभा आहे आणि इहलोकातील त्याचे दृश्य जीवन हे त्याचे सबंध जीवन आहे ह्या गृहीतकृत्यापासून तो निष्पन्न होतो. तसेच स्वतःच्या जीवनाविषयीची आणि मानवजातीच्या जीवनाविषयीची जबाबदारी पत्करणे हाही मानवतावादाचा अंगभूत घटक आहे. मानवी परिस्थितीविषयीचे हे निदान आणि पत्करलेली ही जबाबदारी वैयक्तिक निर्णयांवर आधारलेली असते आणि हे दोन निर्णय म्हणजे मानवतावाद. ह्याच्याहून कमी भरेल त्याला मानवतावाद म्हणता येणार नाही." [२] म्हणून मानवतावाद "मानवी हित आणि मानवी मन ह्यांचे सर्वोच्च स्थान मान्य करतो आणि दैवी, निसर्गातीत अस्तित्वाचा अव्हेर करतो ( चेंबर्स डिक्शनरी ). तत्त्वज्ञान, नीतिशास्त्र आणि व्यावहारिक कृती ह्यांच्या दृष्टीने मानवतावादी भूमिकेचा आशय काय आहे हे ह्या व्याख्यांनी पुरेशा नेमकेपणे स्पष्ट झाले आहे. मानवतावादी भूमिकेपासून निष्पन्न होणारा एक परिणाम असा की मानवतावादी कोणत्याही स्वरूपाच्या अधिकारशाहीला-मग ती धार्मिक असो किंवा ऐहिक असो–पाठिंबा देऊ शकत नाही. मानवतावादी लोकशाहीवादी असावा लागतो. माणसांना शिक्षण देऊन सुधारता येते असा त्याचा विश्वास असतो. तसेच, तो जरी धार्मिक प्रवृत्तीचा असला तरीं 'मानवी बुद्धिमत्तेच्या अंगी संस्थात्मक आणि नैतिक सुधारणा घडवून आणण्याची शक्ती असते' [३] असा त्याचा विश्वास असतो. आजच्या श्रद्धाळू लोकांना ह्याचे आश्चर्य वाटायचे कारण नाही. पंधराव्या शतकात ख्रिश्चन मानवतावाद्यांनी जो कार्यक्रम स्वीकारला होता त्याची भिस्त माणसाच्या अंगची विवेकशक्ती अतिशय महत्वाची आहे ह्या दृढ धारणेवर होती ... त्याचा भर ईश्वरी प्रसादापेक्षा मानवी प्रकृतीवर होता; धर्मशास्त्रापेक्षा नीतीचे, चिंतनापेक्षा कृतीचे महत्व त्याला अधिक होते.' [४] ह्यामुळे मानवतावादी हा समाजाचा चिकित्सक परीक्षक असतो आणि 'हे जीवन म्हणजेच सर्व काही आहे' असे तो मानीत असल्यामुळे त्याला त्याच्या भौतिक आणि आध्यात्मिक संपन्नतेत आपल्या परीने जी काही भर घालता येणे शक्य असेल ती घालण्याची जबाबदारी तो स्वीकारतो. त्याची जर ईश्वरावर श्रद्धा असेल तर माणसाच्या सेवेतच ईश्वराची सेवा सामावलेली असते असे तो मानतो.

---

१. जी. ई. फॉन ग्युनेबॉम, इस्लाम : एसेज इन् धि नेचर अँड ग्रोथ ऑफ ए कल्चरल ट्रॅडिशन ( दुसरी आवृत्ती, पुनर्मुद्रित ), रुटलेज अँड केगन पॉल, लंडन, १९६४, पृ. १३५.

२. एच्. जे. ब्लॅक्‌हॅम, ह्युमनिझम, पेन्गिवन बुक्स, लंडन १९६८, पृ. १३

३. मायरन पी. गिलमोर, धि वर्ल्ड ऑफ ह्युमनिझम ( १४५३–१५१७ ), हार्पर अँड ब्रदर्स, न्यू यॉर्क १ २, पृ. २०४.

४. कित्ता, पृ. २०४–२०५







अनुक्रमणिका

जगाविषयीचा हा मानवतावादी दृष्टिकोन आनुभविक, वैज्ञानिक ज्ञानावर आधारलेला आहे. परीक्षण न करता कित्येक सिद्धांतांशी चिकटून राहण्याच्या वृत्तीशी तो पूर्णपणे विसंगत आहे. मानवतावादी दृष्टीने नीतिशास्त्राचा संबंध कित्येक मूलभूत मानवी प्रेरणांशी पोचतो. व्यक्तीव्यक्तीमधील संबंधांचे नियमन करणाऱ्या दंडकांची ( norms ) व्यवस्था म्हणजे नीती ह्या दृष्टीने तो नीतीकडे पहातो. म्हणून त्याला अभिप्रेत असलेली नीती विवेकाधिष्ठित, ऐहिक व सापेक्ष असते. पण ह्यामुळे नीतीच्या सार्वत्रिक प्रामाण्याला बाधा येत नाही. ही नीती ऐहिक असल्यामुळे, ऐहिक यशाची किंमत, जर हे यश योग्य, ऋजू मार्गाने प्राप्त करून घेतलेले असेल तर, ती कमी लेखीत नाही. ती विवेकाधिष्ठित असल्यामुळे, साध्ये आणि साधने ह्यांच्यांत उचित असा संबंध जुळवून आणणे आवश्यक असते, हे ती मान्य करते. तसेच आपल्या वेगवेगळ्या साध्यांमध्ये, आणि आपली साध्ये व इतरांची साध्ये ह्यांच्यामध्ये समन्वय साधणे आवश्यक आहे हेही ती मान्य करते. परंतु हा समन्वय एखाद्या तत्त्वमीमांसक तत्त्वाला किंवा ईश्वरी आदेशाला अनुसरून न करता ज्ञानाच्या साहाय्याने, माणसाच्या आपल्या इतिहासजन्य परिस्थितीशी क्रियाप्रतिक्रिया चाललेल्या असतात ही जाणीव बाळगून साधला पाहिजे असे ती मानते.

मानवतावादी नीतीचे जे स्वरूप आहे त्याचा आधुनिक ज्ञानाशी साक्षात् संबंध आहे. वस्तूंविषयीचे आपले जे ज्ञान असते त्याची घडण कशी असते हे आधुनिक विज्ञानाने स्पष्ट केले आहे. आणि अभ्युपगमांचे ( hypothesis ) परीक्षण करण्याचे आनुभविक निकष त्याने विकसित केले आहेत. ह्यामुळे माणूस आणि निसर्ग ह्यांविषयीच्या सर्वच उपपत्तींच्या ठिकाणी अंगभूत अशी अनिश्चितता असते ही गोष्ट उघड झाली आहे. हे उघड करण्याचे श्रेय आधुनिक विज्ञानाला आहे. अगदी दृढपणे प्रस्थापित झालेली उपपत्तीही भावी अनुभवांमुळे खोटी पाडली जाणे शक्य असते किंवा अधिक सामान्य आणि व्यापक अशा उपपत्तीमध्ये सामावून घेतली जाणे शक्य असते हे वैज्ञानिक जाणतो. पण अशा रीतीने उपपत्ती जरी बदलत गेल्या तरी वैज्ञानिक पद्धतीला अनुसरून जे ज्ञान प्राप्त करून घेतलेले असते आणि ज्याचे प्रामाण्य सिद्ध करण्यात आलेले असते त्याच्या ठिकाणी एक विशिष्ट गुण अनिवार्यपणे असेल अशी हमी वैज्ञानिक पद्धतीकडून लाभते. हा गुण असा की अशा ज्ञानाच्या अंगी स्वत:ला अधिकाधिक दुरुस्त करीत नेण्याची क्षमता आणि प्रवृत्ती ह्या ज्ञानाच्या अंगी असते. ह्याचा एक महत्त्वाचा परिणाम असा झाला आहे की आधुनिक दृष्टिकोनातून पाहता अन्वेषणाचे ( inquiry ) फलित म्हणून जे ज्ञान आपल्याला लाभते त्याला जितके महत्व असते तितकेच अन्वेषणपद्धतीलाही महत्व असते. हा आधुनिक दृष्टिकोन केवल किंवा अंतिम सत्याची सर्व भाषा आणि तिच्याशी निगडित असलेली असहिष्णू वृत्ती वर्ज्य मानतो. कित्येक सिद्धांत परीक्षण न करता स्वीकारले पाहिजेत आणि कोणत्याही परिस्थितीत त्यांना दृढपणे चिकटून राहिले पाहिजे ह्या वृत्तीला तो समूळ फाटा देतो. सत्य काय आहे आणि योग्य काय आहे हे समाजात अधिकृतपणे म्हणून प्रसृत करू पाहणारी जी स्थाने आणि संस्था समाजात असतात त्यांना आळा घालण्यासाठी, त्यांच्याकडून लाभणारे आदेश दुरुस्त करण्यासाठी आणि तसेच मानवी निर्मितिशीलता मोकळेपणे बहरू देण्यासाठी तो चिकित्सक परीक्षणाच्या वृत्तीला उत्तेजन देतो. आधुनिक ज्ञानाने आणि ह्या ज्ञानापासून जन्माला आलेल्या नवीन नीतीने जी बौद्धिक चौकट उपलब्ध करून दिली आहे तिच्यामुळे मानवी प्रेरणांशी, आणि शिक्षणाच्या प्रसाराने आणि विज्ञान व तंत्रज्ञानाच्या विकासाने मोकळ्या झालेल्या उत्पादक शक्तींशी, अधिक चांगल्या प्रकारे जुळणाऱ्या नवीन संस्थांचा उदय होण्याला साहाय्य झाले आहे. ह्याहीपेक्षा अधिक महत्वाची गोष्ट अशी की सतत बदलत असणाऱ्या परिसराशी गतिशील असा समतोल साधीत जगण्यासाठी आवश्यक असलेली मानसिक तयारी ही बौद्धिक चौकट करून घेते. पूर्वी माणसे संस्थांद्वारा किंवा विचार करण्याच्या आणि वर्तनाच्या रूढ सवयींमध्ये स्थैर्य शोधीत; त्याऐवजी मूल्यांची सुसंगत व्यवस्था लावणाऱ्या एका विशिष्ट दृष्टिकोनात ते हे स्थैर्य शोधायला शिकतात. मानवी परिस्थितीत हे जे आमूलाग्र परिवर्तन झाले आहे त्याचे मानवतावादी




स्वागत करतो. त्याच्यात एक आव्हान आहे; पण मानवी प्रकृतीत गर्भित असलेली जी अस्तित्वाची पातळी आहे ती पूर्णपणे गाठून त्या पातळीवर आपले जीवन जगण्याची संधी ह्या परिवर्तनाने माणसाला, ह्या पृथ्वीवर त्याचा उदय झाल्यानंतर पहिल्यांदाच, प्राप्त करून दिली आहे.

२

इस्लामी परंपरेला आजवर तेरा शतकांहून अधिक काल लोटला आहे. पण ह्या परंपरेत प्रभावी ठरलेला जगाविषयीचा इस्लामी दृष्टिकोन मूलतः मानवतावादाला विरोधी आहे. जीवनाच्या ऐहिक आणि पारमार्थिक क्षेत्रांमध्ये इस्लाम काही भेद करीत नाही. किंबहुना त्या दोघांना एकजीव करण्यात, एकवटण्यात इस्लाम हिंदूधर्माच्याही पलीकडे जातो. हिंदू धर्म व्यक्तीने स्वतःच्या प्रयत्नांनी जी वैयक्तिक मुक्ती साधायची असते तिच्यावर भर देतो. ह्याच्या उलट जमात (उम्मा) हे कुराणात ईश्वराची जी उद्दिष्टे प्रकट झाली आहेत ती साधण्याचे एकमेव माध्यम आहे असे मानतो. मुस्लिम जमातीचा एक घटक, एक अवयव म्हणूनच कुणाही व्यक्तीला एक मुसलमान हे स्वरूप प्राप्त होऊ शकते. एक मुसलमान म्हणून तिचे जे अस्तित्व असते ते मुसलमान जमातीचा एक घटक म्हणूनच असते. म्हणजे 'व्यक्ती' ही संकल्पनाच किंवा 'नागरी समाज' (civil society) ही संकल्पनाच अप्रमाण म्हणून इस्लामकडून अव्हेरण्यात येते. व्यक्तीचे एक विशिष्ट धार्मिक स्वरूप अंगी असलेल्या समूहाशी (म्ह. मुस्लिम जमातीशी) जे नाते असते, त्या समूहाचा घटक असण्याचे जे नाते असते. त्या नात्यावर इस्लाम मानवी जीवनाची सर्व अर्थपूर्णता आधारतो; मानवी जीवनाला जो अर्थ प्राप्त होतो तो ह्या नात्यात सामावलेला असतो.

ईश्वराने प्रकट केलेल्या धर्मावर आधारलेल्या सर्वच संस्कृतींच्या ठिकाणी हे वैशिष्ट्य असल्यासारखे दिसते. ह्या बाबतीत ख्रिश्चन धर्म जर काहीसा वेगळा भासत असेल तर त्याच्या जवळजवळ प्रारंभापासून त्याच्यावर ग्रीक परंपरेचा प्रभाव पडला होता हे त्याचे कारण होय. युरोपमध्ये ग्रीक विद्यांचे जे पुनरुज्जीवन झाले त्याची परिणती रीनेसामध्ये आणि व्यक्तीला 'पवित्र ग्रंथा'चा अर्थ लावायचा अधिकार असतो ह्यावर भर देणाऱ्या प्रॉटेस्टंट पंथाच्या उदयामध्ये झाली. ख्रिश्चन धर्माचे हे जे 'मानवीकरण' झाले आणि त्याचा परिणाम म्हणून व्यक्तीच्या स्वरूपाविषयीच्या ऐहिक संकल्पनेचा जो विकास झाला ते ख्रिश्चन धर्माच्या ग्रीक परंपरेशी ज्या क्रिया-प्रतिक्रिया झाल्या त्यांचे साक्षात् फलित होय.[५] ह्या संदर्भात लक्षात घेण्यासारखी गोष्ट अशी की 'किताबी लोकां'* प्रमाणे ईश्वराचा एक प्रेषित लाभण्याचे भाग्य ग्रीकांच्या वाट्याला आले नव्हते; किंवा हिंदूंप्रमाणे ईश्वरी अवतारही त्यांना लाभला नव्हता. ह्यामुळे विश्वाचे स्वरूप शोधून काढताना त्यांना केवळ आपली बुद्धी आणि निरीक्षणशक्ती ह्यांच्यावर विसंबून रहावे लागले. शिवाय ग्रीक लोक अनेक देवदेवता मानीत आणि ह्या देवांच्या अंगी जरी अतिमानवी शक्ती असल्या तरी त्यांच्या इच्छा-आकांक्षा 'आध्यात्मिक' नव्हत्या, त्या पूर्णपणे 'ऐहिक' होत्या. ह्यामुळे हे देव मूलतः माणसांपासून वेगळे भासत नसत. हिंदू आपले वेद नित्य आणि 'अपौरुषेय' आहेत, म्हणजे कुणाही माणसाने न रचलेले आहेत असे मानतात. ग्रीक परंपरेत ह्या

---

* ईश्वराने ज्या लोकांमध्ये आपला प्रेषित पाठवून त्याच्या द्वारा धर्मग्रंथ–ईश्वरी संदेश–प्रकट केला असे लोक; विशेषतः ज्यू आणि ख्रिस्ती. (भाषांतरकर्त्याची टीप)

५. ख्रिश्चनधर्माच्या प्रारंभीच्या वर्षात, दृढपणे प्रस्थापित असलेल्या रोमन साम्राज्यातील वितुष्टाच्या वातावरणात टिकून रहाण्यासाठी राज्यसंस्थेशी ऐहिक वृत्ती धारण करणे ख्रिश्चन धर्माच्या दृष्टीने अपरिहार्य होते. रीनेसांमध्ये काय घडले असेल तर ते हे की त्या काळी ह्या ऐहिक वृत्तीचे पुनरुज्जीवन करण्यात आले आणि तिचा विस्तार व्यक्तीपर्यंत करण्यात आला. महंमदाप्रमाणे जीझसनेही जर राज्य स्थापन केले असते तर ख्रिश्चन धर्माचा विकास कसा झाला असता हा एक कुतूहलजनक प्रश्न आहे.








बाबतीत ज्याची वेदांशी तुलना करता येईल असा कोणताही ग्रंथ नव्हता. तेव्हा हिंदूंप्रमाणे अपरिवर्तनीय अशा सत्याचे ओझे बाळगायचे ग्रीकांना कारण नव्हते, त्यापासून ते मुक्त होते. ह्यामुळे 'वस्तूंचे स्वरूप अधिकाधिक यथार्थतेने जाणून घेण्यासाठी सतत चाललेला शोध' अशी विज्ञानाची संकल्पना ते बनवू शकले. तसेच अन्वेषणाचे (inquiry) साधना उपलब्ध करून देणाऱ्या, आणि जे आढळले असेल त्याच्या प्रामाण्याचा कस घेण्यासाठी निकष उपलब्ध करून देणाऱ्या वैज्ञानिक पद्धतीचीही संकल्पना त्यांनी घडविली. चिकित्सक अन्वेषणाच्या आणि परीक्षणाच्या परंपरेचा विकास ते अशा रीतीने घडवू शकले. 'शंभर फुले उमलावी आणि शंभर पंथांनी विवाद करावे' ह्यासाठी जे सहिष्णुतेचे वातावरण आवश्यक असते ते त्यांनी निर्माण केले.

ग्रीक परंपरेचा ह्याच स्वरूपाचा परिणाम इस्लामवरही घडून आला असता. पण अल्-मामुनच्या राजवटीत (८१३–८३३) जेव्हा इस्लामचा तिच्याशी संसर्ग आला तोपर्यंत तिच्यातील चैतन्य ओसरून गेले होते आणि इस्लामचीही जडणघडण पक्की होऊन चुकली होती. ह्याहूनही महत्त्वाची गोष्ट अशी की इस्लामचा उदय ज्या समाजात झाला तो अनेक टोळ्यांच्या परस्पराशी सतत चाललेल्या झगड्यांनी शीर्णविशीर्ण झालेला समाज होता, जिला राज्यसंस्था म्हणता येईल असे त्याच्यात काही नव्हते आणि भिन्न विचारआचारांच्या व्यक्तींचा रासवटपणे छळ करायला तो मागेपुढे पहात नसे. ह्यामुळे इस्लामच्या संस्थापकाला, आपला संदेश पुरतेपणे लोकांपुढे प्रकट करण्यापूर्वीच राज्याचीही स्थापना करावी लागली. म्हणजे बळाच्या निर्णयशक्तीवर विसंबून न रहाता, अधिक प्रगत संस्कृतीच्या संसर्गाने ह्या संदेशाला अधिक प्रगल्भ स्वरूप देण्याला अवसरच नव्हता. प्रेषिताच्या मृत्यूनंतरच्या शंभर वर्षांच्या काळात, भोवतालच्या निश्चेष्ट आणि अवनत समाजांत जो झपाट्याने आणि विस्मयकारक असा विस्तार झाला त्यामुळेही इस्लामच्या विकासाला पायबंद बसला. आपला धर्म परिपूर्ण आहे, इतरांच्या धर्मांहून श्रेष्ठ आहे, त्याचे सिद्धांत प्रमादरहित (infallible) आहेत अशी जी मुसलमानांची खात्री होती ती सतत मिळणाऱ्या विजयामुळे दृढ झाली. मध्ययुगीन ख्रिश्चन समाजात पाखंडी मते जितक्या निर्घृणपणे दडपून टाकण्यात येत असत तितक्याच निर्घृणपणे ती इस्लाममध्येही दडपण्यात येत असत. ह्यामुळे सर्वोत्कृष्ट, अतिशय धैर्याचे मुस्लिम विद्वानही धार्मिक श्रद्धेने स्वीकारलेल्या मूलभूत सिद्धांतांच्या सत्यतेविषयी आपण यत्किंचितही संशय घेत आहो असे ज्याच्यामुळे वाटेल असे काहीही म्हणायचे काळजीपूर्वक टाळीत. मुताझिलाइट पंथाचे तत्त्ववेत्ते ईश्वर, आत्मा इत्यादि विषयीच्या इस्लामी सिद्धांतांचे विवरण आणि समर्थन करण्यासाठी ग्रीक संकल्पनांचा उपयोग करीत. पण 'सुन्नी मुसलमानातील बहुसंख्य' त्यांनासुद्धा "पाखंडी मानीत असत" आणि पाखंडी म्हणूनच त्यांना वागवीत असत.[६] इब्न सिना हा जे कित्येक थोडे खरोखर थोर असलेले मुस्लिम तत्त्ववेत्ते आहेत त्यांच्यातील एक आहे. पण इब्न सिना हा 'पूर्वनिश्चित तार्किक रचनेची' कल्पना करतो आणि तिची 'ईश्वराच्या शक्तीला मर्यादा घालतो' आणि 'सान्त व्यक्तीला अनन्ताविषयी जो आत्यंतिक भीतिमिश्रित पूज्यभाव वाटला पाहिजे त्याच्यात न्यून आणतो' म्हणून मुस्लिम परंपरेच्या अधिकृत भाष्यकारांनी त्याच्यावर टीका केली आहे.[७] पण एवढेच नव्हे. इब्न सिना स्वतःच आपल्या उत्तर आयुष्यात एक अतिशय भाविक, सश्रद्ध ज्ञानमार्गी (ghostic) बनला; 'अॅव्हिसेना (इब्न सिना) सारख्या व्यक्तीच्या लिखाणात ह्यासारख्या "विवेकविरोधी कल्पनांचे आणि विधानांचे" जाळे अधिका-

६. डब्ल्यू मॉंटगॉमरी वॉट, 'व्हाट इज इस्लाम ?,' लॉंगमन्स, लंडन १९६८; पृ. १६८; जी. ई. फॉन ग्र्युनेबॉम, 'मिडिइव्हल इस्लाम' (दुसरी आवृत्ती), शिकागो युनिव्हर्सिटी प्रेस, १९५३, पृ. १०२–१०५

७. सैद हुसेन नस्र, अॅन इन्ट्रोडक्शन टु इस्लामिक कॉस्मॉलॉजिकल डॉक्ट्रिन्स,' हार्वर्ड, केंब्रिज (मॅसे.) १९६४, पृ. २१४

धिक दाट बनत चालल्याचे जेव्हा आपल्याला आढळून येते तेव्हा आपल्याला धक्काच बसल्यासारखे होते.'[८]

एक सांस्कृतिक परंपरा म्हणून इस्लामचे हे जे अंग आहे त्याचा मी मुद्दाम काहीशा विस्ताराने परामर्श घेतला आहे. भूतकालात इस्लामची वृत्ती असहिष्णुतेची होती हे ह्याचे कारण नव्हे. इस्लामचीच केवळ असहिष्णुतेची वृत्ती होती असे नाही. इतरांचीही तशी होती. माझे कारण असे आहे की मोकळेपणे केलेल्या अन्वेषणाविषयी, विरोधी किंवा वेगळ्या मताच्या आविष्काराविषयी इस्लाम अजूनही तीच असहिष्णुतेची वृत्ती धारण करताना आढळतो. मुताझिलाइट पंथी आणि त्यांचे सनातनी विरोधक ह्यांनी परस्परांचा जो छळ चालविला होता तो ओसरल्यानंतर विज्ञान आणि तत्त्वज्ञान ह्यांचा विकास घडून येईल आणि त्यायोगे ही वृत्ती सौम्य होईल अशी काही थोडी आशा होती. पण अल्–घझालीने ( मृ. १,१११ ) ती पुढील अनेक शतकांसाठी अतिशय यशस्वीपणे नष्ट केली. तुर्कस्तानात लादले त्याप्रमाणे जर वरून लादण्यात आले नाही तर मुस्लिम समाजामध्ये प्रबोधन घडून येणार नाही अशी निश्चिती अल्–घझालीने आपल्या कामगिरीने साधली. मुस्लिम परंपरेचे विद्वान अभ्यासक अल्–घझालीला मुस्लिम संस्कृतीने निर्माण केलेला सर्वश्रेष्ठ विचारवंत मानतात. मला असे वाटते की अल्–घझाली म्हणजे प्रेषिताच्या मृत्यूनंतर इस्लामी समाजाला भोगावी लागलेली सर्वात मोठी आपत्ती होती. ( हिंदू समाजाच्या संदर्भात शंकराचार्यांचे हेच स्थान आहे. )

३

कुराणाच्या प्रकटीकरणाचा आणि इस्लामच्या प्रारंभीच्या वाढीचा काळ, आणि सध्याचा काळ ह्यांच्यांत अनेक शतकांचे अंतर असले तरी इस्लाममध्ये समजुती आणि विचाराच्या सवयी ह्यांचे एक विलक्षण सातत्य आढळून येते, ह्या बाबतीत इस्लाम आणि इतर धर्म यांच्यात भेद आहे ही गोष्ट वरील विवेचनावरून स्पष्ट होईल. वर म्हटल्याप्रमाणे इस्लाम माणसाची स्वायत्तता आणि निर्मितिशीलता नाकारतो. बुद्धी ही माणसाच्या स्वाभाविक शक्तीपैकी एक आहे हे जरी इस्लाम मान्य करीत असला तरी बुद्धी आणि अनुभव ह्यांच्याहून श्रेष्ठ असलेली आणि स्वतःप्रमाण ज्ञानाला जन्म देणारी प्रातिभज्ञानशक्ती (intuition) अशी शक्ती आहे असे तो मानतो. उदा. अल्–घझालीच्या म्हणण्याप्रमाणे, " ( वैद्यक, ज्योतिष ) ह्यासारख्या शास्त्रात ज्याने संशोधन केले आहे त्याला हे अनिवार्यपणे कळून आलेले असते की ईश्वरी प्रेरणेमुळे व स्फूर्तीमुळेच आणि सर्वश्रेष्ठ जो ईश्वर त्याच्या साहाय्यामुळेच हे ज्ञान प्राप्त होऊ शकते. निरीक्षणामुळे हे ज्ञान प्राप्त होऊ शकत नाही."[९] पण एवढेच नाही. काही थोड्या निवडक व्यक्ती सोडल्या तर इतरांना गणित आणि तत्त्वज्ञान शिकवायला अल्-घझालीचा विरोध आहे. कारण ह्यामुळे त्यांची श्रद्धा कमकुवत होईल अशी त्याची भीती आहे. कारण गणित संबंधित विज्ञानांना अधिरपणे जे वाहून घेऊ पहातात त्यांना प्रतिबंध करणे योग्य ठरेल. कारण जरी त्यांच्या विषयांचा आणि धर्मांचा नजिकचा संबंध नसला, तरी हे विषय तत्त्वज्ञानात्मक शास्त्रांना पायाभूत असल्यामुळे तत्त्ववेत्यातील दुष्ट प्रवृत्ती आणि भ्रष्टता ह्यांची बाधा विद्यार्थ्याला होते."[१०]

इस्लामची परंपरा केवळ बुद्धिविरोधी आहे असे नाही; ऐहिक, लोकशाही राज्यव्यवस्थेच्या वाढीला ती प्रतिकूल आहे. उदा. नागरी समाजाच्या व्यवहाराचे नियमन करण्याचा सार्वभौम अधिकार माणसाला असतो, एखाद्या व्यक्तीला म्हणा किंवा सर्व लोकांना मिळून म्हणा, ह्या गोष्टीला इस्लाम मान्यता देत नाही. " स्वर्गावरचे, पृथ्वीवरचे आणि ह्या दोहोत जे काही असेल त्या सर्वांवरचे सार्व-

---

८. एच्. ए. आर् गिब्ज्, सैद हुसेन नस्र ( कित्ता ), प्रस्तावना.

९. मॉंटगॉमरी वॉट ( भाषां ) 'फेथ अँड प्रॅक्टिस ऑफ् अल्–गझाली' जॉर्ज ॲलेन अँड अन्विन, लंडन १९५३ पृ. ६५.

१०. कित्ता ; पृ. ३४






भौमत्व" ईश्वराकडे आहे; माणसाकडे नव्हे.[११] अर्थात केवळ एवढेच वचन घेतले तर त्याच्यापासून सार्वभौमत्वाची ऐहिक संकल्पना वर्ज्य आहे असे निष्पन्न होते असे मानायचे कारण नाहीं. ह्याच स्वरूपाचे सत्य बायबलमध्येही घोषित करण्यात आले आहे पण बायबल राज्यसंस्थेचे क्षेत्र आणि धर्माचे क्षेत्र ह्यांच्यात सुस्पष्टपणे भेद करते आणि ह्या सत्याच्या आशयाला महत्त्वाची मुरड घालते.[१२] धर्म सार्वभौम असला पाहिजे ही हिंदू संकल्पना अल्लाच्या सार्वभौमत्वाच्या मुस्लिम संकल्पनेशी अधिक मिळतीजुळती आहे. पण हिंदू धर्म आणि मुस्लिम धर्म यांच्यात कित्येक महत्त्वाच्या बाबतीत भेद आहे. हिंदू धर्माचा कुणी एक विशिष्ट, सर्वमान्य असा संस्थापक नाही हा इस्लाम आणि हिंदू धर्म यांमधील एक महत्त्वाचा भेद आहे. त्याचप्रमाणे विश्वाचा एक मानवसदृश असा निर्माता आहे आणि तोच विश्वाची धारणा करतो. असे हिंदू धर्म मानीत नाही. आणि शेवटचा मुद्दा असा की एकाच व्यक्तीच्या किंवा वर्गाच्या ठिकाणी ऐहिक आणि आध्यात्मिक अधिकार एकवटण्याला हिंदूधर्म धार्मिक मान्यता देत नाही. उलट इस्लाममध्ये राज्यसंस्था आणि धर्मसंस्था ह्यांच्यात भेदच करण्यात येत नाही. किंवा नागरी समाज आणि धार्मिक जमात यांच्यांत, किंवा युद्धक्षेत्रावरील नेता आणि प्रार्थनामंदिरातील नेता यांच्यात इस्लाम भेद करीत नाही. उम्मा ही ईश्वराने निवडलेल्या लोकांची एक जमात आहे आणि राज्यसंस्था हीं ह्या जमातीला ईश्वराने नेमून दिलेल्या मार्गावरून चालता यावे ह्यासाठी बनविण्यात आलेली केवळ एक रचना आहे. म्हणून खलिफा हा राजाही होता आणि 'श्रद्धाशील लोकांचा नायक'ही होता, शरिया हा ऐहिक कायदा होता आणि धार्मिक कायदाही होता.

खलिफा ईश्वराच्या नावाने राज्य करीत असल्यामुळे त्याची सत्ता अमर्यादित होती. "तो न्यायी असावा, कुराणातील नियम आणि त्यांच्यापासून निष्पन्न होणारे उपनियम ह्यांच्या अर्थाचा निर्णय करण्याचे ज्ञान त्याला असावे, त्याच्या मनाच्या सर्व शक्ती शाबूत असाव्यात आणि त्याच्या शरिराचे सर्व अवयव धडधाकट असावे, आपल्या मनाप्रमाणे वागायला तो स्वतंत्र असावा, मसलतीत तो हुषार असावा आणि त्याच्या ठिकाणी उच्च धैर्य असावे आणि शेवटी, तो योग्य जातकुळीचा, म्हणजे कुरेश टोळीचा सदस्य, असावा[१३] "अशी अपेक्षा होती." अर्थात हा एक केवळ आदर्श होता. प्रत्यक्षात पहिल्या चार खलिफानंतरचे खलिफ ह्या आदर्शाच्या मानाने कमी पडतात हे मान्य करण्यात येते. पण इस्लाम एकतंत्री जुलमी सुलतानशाही विरुद्ध केलेल्या बंडाला अनुमती देत नाही. "धर्मकोविदांच्या लिखाणावरून हे स्पष्ट होते की एका बाबतीत घझालीशी सहमत होते. ते यादवीपेक्षा कोणत्याही प्रकारचे स्थिर शासन, निरंकुश, जुलमी, सुलतानशाहीसुद्धा पसंत करीत; आणि सत्ताधीश कुणीही असो, सर्व प्रजेने त्याचे आज्ञापालन केले पाहिजे असा त्यांचा आदेश होता......एक हाडिथ ( प्रेषिताचे आलेले वचन ) अशा अर्थाची आहे...' माझे ( प्रेषितांचे ) आज्ञापालन हे ईश्वराचे आज्ञापालन आहे आणि इमामचे ( धार्मिक नेत्याचे ) आज्ञापालन हे माझे आज्ञापालन आहे; तसेच माझ्याविरुद्ध केलेले बंड हे ईश्वराविरुद्ध केलेले बंड आहे आणि इमाम विरुद्ध केलेले बंड हे माझ्याविरुद्ध केलेले बंड आहे." [१४] तेव्हा फॉन ग्र्युनेबॉम म्हणतात त्याप्रमाणे "निरंकुश राजकीय सत्तेचा सिद्धांत ईश्वराची, त्याने निर्मिलेल्या जीवांवर निरंकुश सत्ता असते ह्या सिद्धांताशी समांतर आहे," हे स्पष्ट होते.[१५]

---

११. एम्. एम्. पिक्थाल, 'धि ग्लोरियस कोरांन,' धि न्यू अमेरिकन लायब्ररी, न्यू यार्क, XLIII. ८५

१२ पहा : मॅथ्यू, २२.२१ "म्हणून ज्या गोष्टी सीझरच्या आहेत त्या सीझरला सुपूर्द करा आणि ज्या ईश्वराच्या आहेत त्या ईश्वराकडे सुपूर्द करा."

१३ अल्-मवार्दि, अल-अहकम अल्-सुलतानिया ( "सुलतानाविषयीचे कायदे" ) पृ. ३ व पुढे, आर. लेव्ही, 'धि सोशल स्ट्रक्चर ऑफ इस्लाम,' केंब्रिज १९५७ ( पुनरावृत्ती १९६५ ) पृ. २८५

१४. आर्. लेव्हि, कित्ता, पृ. २९१

१५. जी. ई. ग्र्युनेबॉम, ह्या निबंधाच्या प्रारंभी उद्धृत.








ह्या विचारव्यवस्थेत वैयक्तिक स्वातंत्र्य आणि मानवी समता ह्याना काही स्थान असायचा प्रश्नच उद्‌भवत नाही; मग माणसाच्या नैतिक स्वायत्ततेची दखल घेण्याची गोष्ट दूरच राहिली. ईश्वराच्या इच्छेपुढे माणूस कःपदार्थ आणि सर्वतोपरी हतवल आहे ह्या गोष्टीवर कुराणात परत परत भर देण्यात आला आहे; आणि ईश्वराच्या इच्छेला कोणत्याही नियमाचे किंवा तत्त्वाचे बंधन नाही आणि म्हणून ती माणसाला अनाकलनीय आहे.[१६] समतेविषयी म्हणाल तर कुराण गुलामगिरीला अनुज्ञा देते आणि केवळ घटस्फोट आणि वारसा यांच्या बाबतीतच नव्हे तर साक्षीदार म्हणून मान्य होण्याच्या बाबतीतही स्त्रीला पुरुषापेक्षा कनिष्ठ मानते ह्या गोष्टींची दखल घेतली तर कुराणाची ह्या विषयीची शिकवण स्पष्ट होईल.[१७] उदा. II. २८२ ह्या वचनात कराराला दोन पुरुष साक्षी असावे लागतात किंवा एक पुरुष व दोन स्त्रिया साक्षी असावे लागतात. असा नियम घालून देण्यात आला आहे. ह्याच प्रकारची विषमता वारसाहक्क आणि घटस्फोटाचा हक्क ह्यांच्या बाबतीतही आहे. इस्लाम समतेचा पुरस्कार करतो अशी जी सर्वसाधारण समजूत आहे तिच्यात दोन प्रकारे दुरुस्ती करणे आवश्यक आहे. इस्लामची समतेची संकल्पना केवळ सह-मुस्लिमांपुरती मर्यादित आहे, सर्व माणसे एकाच ईश्वराची लेकरे आहेत व म्हणून समान आहेत असे ह्या संकल्पनेत अभिप्रेत नाही. दुसरी गोष्ट अशी की समतेची ही संकुचित संकल्पनासुद्धा प्रार्थनेच्या वेळेपुरती मर्यादित ठेवण्यात येते. संपत्ती, सामाजिक दर्जा, लिंग किंवा कौटुंबिक संबंध ह्यांतून जे भेद निर्माण होतात त्यांना उद्देशून हे समतेचे तत्त्व लावण्यात येत नाही. वांशिक श्रेष्ठत्वाच्या कल्पनेला इस्लाम मान्यता देत नाही ही गोष्ट खरी आहे; पण तरी सुद्धा प्रेषिताच्या मृत्यूनंतर बराच काल होईपर्यंत सुद्धा खलिफा होण्यासाठी कुरेश टोळीचा सभासद असणे ही पात्रतेची एक आवश्यक अट आहे असे मानण्यात येत असे. एवढ्या उच्च क्षेत्राचा विचार सोडून दिला आणि अधिक सामान्य माणसांकडे वळलो तरी, एखाद्या निग्रो मुस्लिमाला सामान्यपणे, आपण अरब मुस्लिमाशी समान मानले जाऊ अशी अपेक्षा बाळगता आली नसती; अर्थात् पुरेशा सत्तेचे किंवा संपत्तीचे त्याला पाठबळ असेल तर गोष्ट वेगळी.

मानवतावादी दिशेने आपली उत्क्रांती घडवून आणायला मुस्लिम समाज कायमचा असमर्थ ठरणार असा ह्या विवेचनाचा अर्थ आहे का? मला असे वाटत नाही. पण ही उत्क्रांतीची प्रक्रिया दीर्घकाल चालणारी आणि बिकट अशी ठरेल यात शंका नाही. आधुनिक मानवतावादी मूल्ये आणि दृष्टिकोन ह्यांच्याशी सुसंवाद साधेल अशा रीतीने इस्लामच्या शिकवणीचे नवीन, सर्जनशील निरूपण करण्याचे ठरविले तर विशेषतः प्रेषिताच्या संदेशात आणि सुन्नामध्ये ह्यासाठी पुरेशी सामग्री आहे असे आढळून येईल.

उदा. बहुपत्निकत्वाविषयी कुराणात जी विधाने करण्यात आली आहेत ती मुसलमानांनी जर त्यांच्या ऐतिहासिक संदर्भात[१८] घेतली तर आज बहुपत्नि-

---

१६. उदा. पहा एम्. एम्. पिक्थाल, कित्ता III. २६ "तुला पाहिजे असेल त्या कुणालाही तू सार्वभौम सत्ता बहाल करतोस व तुझ्या इच्छेप्रमाणे तू कुणाचीही सार्वभौम सत्ता काढून घेतोस. तुझ्या इच्छेप्रमाणे तू कुणालाही उच्चपदी स्थापन करतोस आणि तुला पाहिजे असेल त्याप्रमाणे तू कुणालाही हीनपण देतोस. कल्याण तुझ्या हातात आहे. पहा! तू सर्व काही करायला समर्थ आहेस."

१७. उदा. पहा. कित्ता, XVI 75: 'अल्लाने हे साम्य बनविले आहे: (एकापक्षी) ज्याचा कशावरही अधिकार नसतो असा (कुणाची तरी केवळ) मालमत्ता असलेला गुलाम, आणि (दुसऱ्या पक्षी) आम्ही ज्याला नीट सामग्री उपयोगाकरिता दिली आहे आणि जो गुप्तपणे किंवा उघड रीतीने तिचा खर्च करतो तो होय. हे दोन्ही समान आहेत काय?"

१८. एम्. एम्. पिक्थल, कित्ता. IV 2-3 "पोरक्या मुलांना त्यांची संपत्ती द्या...... आणि आपण त्यांच्याशी रास्तपणे वागू शकणार नाही अशी भीती जर तुम्हाला वाटत असेल तर, तुम्हाला ज्या स्त्रिया चांगल्या वाटतील त्यांच्याशी, दोघांशी, तिघांशी, चौघांशी लग्न करा. पण (इतक्या

अनुक्रमणिका

कत्वाच्या प्रथेवर कायदेशीर बंधन घातल्याने त्यांच्या धर्मात हस्तक्षेप तर होणार नाहीच, उलट ह्या विधानात जी वृत्ती प्रकट झाली आहे तीच वृत्ती अशा बंदीतून व्यक्त होईल असे त्यांना आढळून येईल. ह्या विधानांविषयी थोडासुद्धा विचार केला तर पुढील गोष्टी स्पष्ट होतात: (१) ही विधाने मुभा देणारी आहेत, आदेश देणारी नाहीत; (२) युद्धात कामी आलेल्या पुरुषांची मुले आणि विधवा यांची जी दुर्दशा होते ती पाहून अंतःकरणाला आलेल्या कळवळ्यामुळे प्रेषिताने ती केली आहेत; (इस्लामपूर्व काळात अरब अशा विधवांना मालकीच्या वस्तू म्हणून वागवीत आणि त्यांना सक्तीने देहविक्रय करून पैसे मिळवायला भाग पाडीत); आणि (३) पहिली बायको हयात असताना जर एखाद्या मुसलमानाला परत लग्न करायचे असेल तर (प्रेषिताने आयेशा हिच्याशी लग्न केले असले तरीही) त्याने विधवेशी लग्न केले पाहिजे, कुमारिकेशी नव्हे. प्रेषिताने ज्या प्रकारच्या बहुपत्निकत्वाच्या पद्धतीला अनुज्ञा दिली तिचे स्वरूप आणि तिच्या मागचा हेतू ध्यानात घतला तर ती पद्धत आज मुसलमान आपला धार्मिक अधिकार म्हणून ज्या प्रकारच्या बहुपत्निकत्वाच्या हक्कासाठी आग्रह धरतात त्याच्याहून पूर्णपणे भिन्न आहे यात शंका नाही. आणि कुराणामध्ये मुस्लिम वैयक्तिक कायद्याविषयी करण्यात आलेल्या प्रत्येक विधानाकडे– उदा. घटस्फोट किंवा वारसा विषयीच्या विधानांकडे– ह्या दृष्टीने पहाता येईल. म्हणजे माणसांच्या कल्याणाविषयीच्या ज्या आस्थेने प्रेरित होऊन प्रेषिताने कुरेशी टोळीला लाभणाऱ्या विशेषाधिकारांकडे पाठ फिरवली, त्याऐवजी छळणूक आणि देशत्याग सहन करावा लागला तरी त्याचे स्वागत केले, जिवाला धोका निर्माण झाला तरी त्याची तमा बाळगली नाही ती आस्थाच ह्या वचनांच्या मागे आहे असे दाखवून देता येईल.

शिवाय नवीन ज्ञानाच्या आणि अनुभवाच्या प्रकाशात कुराणातील वचनांचा नवीन अर्थ लावायला अनुकूल असलेली अशी प्रेषिताची एक प्रसिद्ध हदिस आहे. ऐहिक व्यवहाराच्या क्षेत्रात मी केवळ एक माणूस आहे हे ध्यानात धरा असे प्रेषिताने आपल्या अनुयायांना सांगितल्याची एक कथा आहे– ह्याचा अर्थ असा की ऐहिक व्यवहाराच्या क्षेत्रात इतर कुणाही माणसाइतका त्यांचा निर्णयही स्खलनशील ठरणे शक्य होते. अर्थात् सनातनी मुसलमान ज्या गोष्टींबाबत कुराणात स्पष्टपणे विधाने करण्यात आली आहेत त्या सर्व गोष्टी ऐहिक व्यवहाराच्या क्षेत्रातून वगळतील यात शंका नाही. पण ह्याचा अर्थ असा होईल की ते दुटप्पीपणे दुहेरी मानदंडाचा वापर करतात; म्हणजे त्यांची भूमिका अधिकच कमकुवत ठरेल. कारण कुराणाने अनेक बायका करण्याची परवानगी दिली असल्यामुळे बहुपत्निकत्वाच्या प्रथेवर बंदी घालायला जेव्हा ते विरोध करतात तेव्हा कुराणाने अनुज्ञा दिलेली कोणत्याही गोष्टीवर बंदी घालायचा अधिकार राज्यसत्तेला नसतो ही भूमिका त्याच्यात अभिप्रेत आहे. पण ह्याच न्यायाने स्त्रियांना गुलाम म्हणून बाळगण्यावर जी बंदी घालण्यात आली आहे तिलाही त्यांनी विरोध केला पाहिजे; कारण कुराणातील ज्या वचनांनी बहुपत्निकत्वाला अनुज्ञा दिली आहे त्याच वचनांनी युद्धात पकडण्यात आलेल्या स्त्रियांशी लैंगिक संबंध ठेवायलाही मुसलमानांना परवानगी दिली आहे.

पण एवढेच नाही. गुन्हेगारांना कित्येक पाशवी शिक्षा देण्याचा कुराणाने आदेश दिला आहे. प्रामुख्याने मुस्लिम असलेल्या देशांतही ह्या शिक्षा आता प्रचलित नाहीत. उदा. व्यभिचाराचा अपराध केलेल्या स्त्रीला किंवा पुरुषाला शंभर फटक्यांची शिक्षा दिली पाहिजे असे कुराणात सांगितले आहे; आणि "त्या दोघांना शिक्षा दिली पाहिजे ह्यावर जर तुमचा विश्वास असेल तर त्यांच्याविषयी वाटणाऱ्या दयेमुळे अल्लाचे आज्ञापालन करण्या-

---

सर्वांना) आपण न्याय देऊ शकणार नाही अशी भीती तुम्हाला असेल तर (केवळ) एकीशीच करा; नाहीतरी तुमच्या उजव्या हातात असलेल्या (म्ह. तुमच्या मालकीच्या बंदिवान स्त्रिया) आहेतच. अशा रीतीने तुमच्या हातून अन्याय घडण्याची शक्यता कमी होईल.



अनुक्रमणिका

पासून तुम्ही परावृत्त होऊ नका." [19] तसेच शरियतच्या पुराव्याविषयीच्या कायद्याप्रमाणे कराराचे साक्षी म्हणून दोन पुरुष किंवा एक पुरुष व दोन स्त्रिया आवश्यक असतात.[20] स्त्रियांविरुद्ध ह्या भेदभाव करूनसुद्धा परत बेदावीच्या म्हणण्याप्रमाणे फक्त दिवाणी खटल्यांमध्ये स्त्रिया साक्षिदार म्हणून मान्य होण्यासारख्या असतात.[21] पण कुणीही समंजस मुसलमान, मग तो कितीही सनातनी असला तरी कुराणाचे हे सारे म्हणणे आज अंमलात आणावे अशी मागणी करणार नाही. आता ह्या प्रश्नाविषयीची ही त्याची वृत्ती ध्यानात घेतली तर तिचा फक्त दोन प्रकारे अर्थ लावता येईल आणि ह्या दोन अर्थातून कोणत्यातरी एका अर्थाची निवड करावी लागेल. एक अर्थ असा होईल की कुराणाने अगदी सुस्पष्टपणे दिलेल्या आदेशांशी कित्येक बाबतीत मूलतः विरोधी असलेल्या अशा दिवाणी आणि फौजदारी कायद्याखाली तो रहात असल्यामुळे तो आता मुसलमान उरलेला नाही. किंवा त्याचा दुसरा अर्थ असा होईल की ज्या जगात तो जगतो आहे त्याच्याशी जुळवून घ्यायला स्वेच्छेने म्हणा किंवा अनिच्छेने म्हणा तो तयार आहे. पण कोणताही अर्थ घेतला तरी कुराणाच्या सुस्पष्ट आदेशांपासून तो ढळला आहे; आणि तसूभर ढळला आहे की योजनभर ढळला आहे ह्याला काही महत्व नाही.

मग श्रद्धेने स्वीकारलेल्या धार्मिक सिद्धांतांना आणि संस्थांना मानवतावादी स्वरूप द्यायला सुशिक्षित मुसलमान विरोध का करतात? जे सुशिक्षित मुसलमान जाणीवपूर्वक दुटप्पी खेळ खेळण्यात गुंतले आहेत म्हणजे जे बाहेर आधुनिकतेची भाषा बोलतात आणि घरी सनातनी, भाविक भाषा बोलतात त्यांचा विचार येथे करण्याचे कारण नाही. पण जे असे समजून उमजून दुटप्पीपणे जगत नसतात त्यांना एकतर आपल्या जमातीच्या क्रोधाची दहशत वाटत असते किंवा त्यांना आधुनिकीकरणाच्या प्रक्रियेची भीती वाटत असते. ह्या प्रक्रियेमुळे हिंदू आणि मुसलमान, ख्रिश्चन आणि ज्यू यांना समान असलेली मानवता पुढे येईल आणि मुसलमान ही आपली अस्मिता आपण गमावून बसू अशी ही भीती आहे. पहिल्या गटातील मंडळींना वाटत असलेली भीती अतिरंजित आहे हे उघड आहे आणि समान विचारांच्या व्यक्तींनी एकत्र येऊन धैर्याने मुकाबला करण्याने तिच्यावर काबू मिळविता येईल. दुसऱ्या गटाच्या दृष्टीने पहाता धर्माचे स्वरूप, मानवी संस्कृतीत धर्माने वठविलेली भूमिका आणि व्यक्तीच्या अस्मितेत धर्माचे योग्य स्थान ह्या गोष्टींची मूलगामी चिकित्सा आवश्यक ठरते. ही चिकित्सा येथे करता येणार नाही. पण एका गोष्टीकडे लक्ष वेधण्यासारखे आहे. अशी चिकित्सा शक्य व्हायची तर त्यापूर्वी, इतर मानवी संस्थांप्रमाणे धर्मामध्येही सार्वत्रिक, सार्वकालिक महत्वाच्या घटकांबरोबर कित्येक केवळ ऐतिहासिक स्वरूपाचे घटकही अंतर्भूत असतात ह्याची जाणीव पुरेशा मुसलमानांना झालेली असणे आवश्यक आहे. प्रत्येक युगाला, आपल्याला लाभलेल्या वारशाचे नव्याने मूल्यमापन करून त्याच्यातील कोणत्या गोष्टी आपल्या गरजांशी संबंधित आहेत आणि कोणत्या गतार्थ झाल्या आहेत, हे ठरवावे लागते. इस्लामच्या सांस्कृतिक वारशाच्या अशा मूल्यमापनाला जेव्हा प्रारंभ होईल तेव्हा ते मुस्लिम समाजाच्या मानवतावादी प्रबोधनाचे प्रसादचिन्ह ठरेल. अ-मुस्लिम परिसराच्या प्रभावामुळे असे प्रबोधन आज भारतात घडून येत आहे ह्याच्या खाणाखुणा दिसत आहेत. पण हे प्रबोधन पुरेसे लवकर घडून येईल का, हिंदू आणि मुसलमान यांच्यांत आपल्या पारंपरिक भूमिकांना चिकटून राहून परस्परासमोर ठाण मांडून रहायची जी वाढती प्रवृत्ती आज दिसून येत आहे ती उलटवायची तर हे प्रबोधन जितक्या लवकर घडून आले पाहिजे तितक्या लवकर ते घडून येईल का हा खरा प्रश्न आहे.

---

१९. एम्. एम् पिक्थाल, कित्ता, XXIV. २

२०. कित्ता, II. २८२

२१. आर् लेव्ही, कित्ता. पृ. ३४४

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

# हिंदू धर्म

---

हिंदू धर्म हा सनातन धर्म आहे. जगाच्या स्थैर्याचे, अभ्युदयाचे आणि मोक्षाचे साधन धर्म होय; असा हिंदू धर्माचा मूलभूत सिद्धांत आहे. धर्म हा सनातन आहे. सृष्टी उत्पन्न केल्यानंतर जीवांचा योगक्षेम चालावा, त्याना सद्गती प्राप्त व्हावी आणि मोक्ष मिळावा, म्हणून धर्माचा उपदेश परमेश्वर प्रत्येक सृष्टीत करीत असतो. हे सृष्टिचक्र अनादिकालापासून चालू आहे. आद्य शंकराचार्यांनी भगवद्गीतेच्या भाष्याच्या प्रस्तावनेत हा मुद्दा संक्षेपाने सांगितला आहे. त्याचे तात्पर्य असे: " भगवंताने हे जग निर्माण करून त्याच्या स्थितीकरता म्हणजे धारणेकरता मरीची इत्यादी प्रजापतींना निर्माण केले आणि प्रवृत्तिरूप धर्म शिकविला; हाच वेदोक्त धर्म होय. भगवद्गीतेत भगवान म्हणतात की मी हा कर्मभाग विवस्वानाला सांगितला, विवस्वानाने मनूला सांगितला; तो परंपरेने प्राप्त झालेला धर्म राजर्षींना ज्ञात झाला. त्यानंतर सनक, सनंदन इत्यादी योग्याना उत्पन्न करून निवृत्तिरूप धर्म शिकविला. ज्ञान आणि वैराग्य हे त्या धर्माचे लक्षण होय. वेदांमध्ये सांगितलेले प्रवृत्तिलक्षणधर्म आणि निवृत्तिलक्षणधर्म जगाच्या स्थितीला कारण असतात. प्राण्यांच्या अभ्युदयाला आणि निश्रेयसाला कारण जो होतो, तो धर्म होय. ब्राह्मणादी वर्ण आणि ब्रह्मचर्यादी आश्रमात असलेले लोक श्रेयाची कामना करतात म्हणून धर्माचे आचरण करतात. जेव्हा मानवांवर कामविकाराचा प्रभाव पडतो; त्यामुळे त्यांच्यातील विवेक आणि ज्ञान क्षीण होऊ लागते; आणि अधर्माकडे प्रवृत्ती निर्माण होते; तेव्हा धर्माचा पराभव होतो आणि अधर्म प्रबल होऊ लागतो. अशा स्थितीत जगाच्या परिपालनार्थ तो आदिकर्ता नारायण म्हणजे विष्णू धर्माच्या उद्धाराकरता वेळोवेळी अवतार घेतो. उदा., पृथ्वीवरील ब्रह्मज्ञानाच्या आणि ब्राह्मण्याच्या रक्षणार्थ देवकीच्या ठिकाणी वसुदेवापासून विष्णूचा अंश जो कृष्ण तो जन्मला; कारण ब्राह्मण्याच्या रक्षणाने वैदिक धर्म सुरक्षित राहतो. वर्णाश्रम धर्म हे ब्राह्मण्याच्या अधीन असतात. भगवान हा ज्ञान, ऐश्वर्य, शक्ती, बल, वीर्य व तेज या सहा गुणांनी सदासंपन्न असतो. तो स्वतःच्या त्रिगुणात्मक वैष्णवी मायेला वश करून अज, अव्यय, वस्तुमात्राचा स्वामी, नित्य, शुद्ध, बुद्ध व मुक्त अशा स्वभावाचा असूनही स्वतःच्या मायेने देह धारण केल्यासारखा होऊन म्हणजे अवतार धारण करून जगावर अनुग्रह करीत राहतो, असे दिसते. त्याला स्वतःचा असा स्वार्थ नाही; केवळ प्राणिमात्रांवर अनुग्रह करण्याचीच त्याला इच्छा आहे. "

सृष्टीच्या उत्पत्तीच्या वेळीच जीवात्म्यांना धर्माचा उपदेश करणारे महर्षी व सिद्ध पुरुष विश्वाच्या विधात्याने निर्मिले; धर्म हा सनातन आहे, हे यावरून सूचित होते. ऋत आणि सत्य म्हणजेच धर्म परमेश्वराच्या तपातून निर्माण झाला आणि त्यानंतर परमेश्वराने सूर्य–चंद्र, तारागणांनी व्यापलेले आकाश म्हणजे द्युलोक, पृथ्वी आणि अंतरिक्ष यांची निर्मिती पूर्वीप्रमाणेच केली, असे 'ऋग्वेदात' ( १०.१९० ) अखेरीस म्हटले आहे. विश्वाच्या उत्पत्ति–स्थिति–लयांचे चक्र अनादिकालापासून सुरू आहे आणि पूर्वीच्या कल्पामध्ये म्हणजे या सृष्टीच्या पूर्वीच्या सृष्टीमध्ये जसे जग होते तसेच जग देव निर्मितो, असा याचा अभिप्राय आहे. सृष्टी ही जीवांच्या धर्माधर्माचरणाची निष्पत्ती असते. धर्माधर्मापासून चांगली वाईट सृष्टी निष्पन्न होत असते.

अनुक्रमणिका






महाभारतात (१२–२३२) म्हटले आहे, की पूर्वीच्या सृष्टीमध्ये ज्या ज्या तऱ्हेची कर्में घडत असतात, त्याच तऱ्हेची कर्में नंतरच्या सृष्टीतही पुनःपुनः घडत असतात. हिंसक व अहिंसक, मृदु आणि क्रूर, सत्य आणि असत्य, धर्म आणि अधर्म या प्रकारची द्वंद्वे त्या त्या प्राण्यांच्या वासनेप्रमाणे त्यांच्या आचरणात दिसतात. ऋतुचक्र चालू असते, त्यात प्रत्येक ऋतूची रूपे प्रकट होत असतात. असेच प्रत्येक युगात व कल्पात घडत असते. अज परमेश्वर तीच तीच नामे व रूपे निर्माण करत असतो. (ब्रह्मसूत्र–शांकरभाष्य १.२.२६–३३)

वेद हे ऋषींनी निर्माण केले असल्यामुळे आणि सर्व धर्म वेदोक्तच असल्यामुळे वेदपूर्वकाली धर्म नव्हता किंवा धर्म आणि अधर्म असा विचार नव्हता असे हिंदू धर्माला मानावे लागते. मग तो हिंदू धर्म सनातन कसा, असा आक्षेप उत्पन्न होतो. यावर उत्तर असे आहे, की वेद हे ईश्वरी शब्द आहेत. ईश्वर हा नित्य व सत्य असल्यामुळे त्याचे वेदज्ञानही नित्य आणि सत्य आहे. एवढेच नव्हे तर सर्व सृष्टी वेदांच्या नित्य अशा शब्दापासून ईश्वर निर्माण करतो. देवाची वेदरूप वाणीच ऋषींमध्ये प्रविष्ट होते. त्या त्या ऋतूत तदनुरुप वृक्षवनस्पती, हवापाणी उत्पन्न होतात त्याचप्रमाणे प्रत्येक युगात वेद युगानुरूप धर्म सांगण्याकरिता प्रगट होतात (महाभारत १२.२३८) असा सिद्धांत गृहीत धरून हिंदू धर्म हा सनातन धर्म आहे, अशी संकल्पना हिंदूंच्या धर्मतत्त्वज्ञांनी मूलभूत मानली आहे (ब्रह्मसूत्र; शांकरभाष्य १. २. २६ – ३३.) असा, हिंदूधर्म हा सनातन धर्म आहे, हा सिद्धान्त सर्वच ब्रह्मसूत्रभाष्यकार मानतात.

हिंदुधर्माची आज विद्यमान असलेल्या धर्मांशी तुलना करता असे दिसते की, पारशी, यहुदी ख्रिश्चन आणि इस्लाम हे धर्म, आपला धर्म हा सनातन आहे, असे मानत नाहीत. इ. स. पूर्वीच्या सहाव्या शतकापासून तो इ. स. च्या सातव्या शतकापर्यंतच्या काळात वेळोवेळी झालेल्या प्रेषितांनी ईश्वराचा संदेश दिला; मनुष्याने स्वर्गास पोहोचावे आणि स्वर्गसुख अनुभवावे, याकरिता अंतिम धर्माचा उपदेश केला; असे हे धर्म मानतात. उदा. जरथुश्त्राला अहुर मज्दाने म्हणजे परमेश्वराने प्रथम श्रेष्ठ धर्म उपदेशिला, असे पारशी धर्माचे मत आहे. मोझेस या प्रेषिताला अद्वितीय अशा साक्षात देवाने सायनाय या वाळवंटी प्रदेशात धर्माज्ञा प्रथम ऐकविल्या, असे यहुदी धर्माच्या पवित्रग्रंथात म्हणजे बायबलच्या जुन्या करारात म्हटले आहे. परमेश्वराचा पुत्र जो येशू ख्रिस्त त्याला मनुष्य पापमुक्त व्हावा म्हणून आत्मयज्ञ करण्याकरता व सन्मार्ग दाखविण्याकरता या पृथ्वीवर पाठविले, असे ख्रिश्चन धर्म मानतो आणि त्याचप्रमाणे मुहंमद पैगंबरला अद्वितीय देवाने जो उपदेश दिला, तोच 'कुर्रान' या पवित्र धर्मग्रंथात सांगितला आहे, असे इस्लाम धर्म मानतो. वरील सर्व प्रेषित इ. स. पूर्व सहाव्या शतकापासून तो इ. स. च्या सातव्या शतकापर्यंत निर्माण झाले. म्हणजे यावरून असे तात्पर्य निघते, की इ. स. सहाव्या शतकापूर्वी ही मानवजात मोक्षदायक अंतिम धर्माच्या संदेशापासून वंचित होती. हे सर्व धर्म ऐतिहासिक धर्म आहेत आणि या धर्मांच्या अनुयायांचीही तशीच श्रद्धा आहे. याच्या उलट हिंदू धर्माची अशी श्रद्धा आहे, की इंद्र वरुणादी देव आणि त्यानंतर मानवप्राणी सृष्टीमध्ये जेव्हा उत्पन्न झाले, तेव्हापासूनच परमेश्वराने त्यांना धर्ममार्ग उपदेशिला आहे. त्याचप्रमाणे जेव्हा जेव्हा धर्माची अवनती होते व अधर्म माजतो, तेव्हा तेव्हा परमेश्वर अवतार घेऊन धर्माचा उद्धार करतो.

### वेदातील ऋत म्हणजे विश्वधर्म

विश्वाचे नियमन करणारे 'ऋत' म्हणजे धर्म तत्त्व. हे प्रथम ऋग्वेदात स्पष्ट झाले. वेदांतील ऋत आणि अनृत अशा द्वंद्वात्मक संकल्पना विश्वाच्या आणि मानवी जीवनाच्या वर्तनाचे स्पष्टीकरण करतात. दिवस व रात्र, संवत्सराचे नियमित परिवर्तन, सूर्य–चंद्रांची व तारकांची नियमबद्ध गती, सूर्य–चंद्राचे व तारकांचे उदयास्त, वनस्पतींच्या पत्र–पुष्प–फलरूप विकासक्रिया, प्राण्यांच्या व माणसांच्या गर्भधारणेतील निश्चित कालावधी, द्यूलोक आणि पृथ्वी यांचा अभेद्य संबंध अशा प्रकारच्या विश्वव्यवस्थेसच 'ऋत' या संज्ञेने ऋग्वेदाने निर्दिष्ट केले आहे. देवांचा आदिदेव प्रजापती किंवा ब्रह्मा हा ऋतापासून प्रथम उत्पन्न झाला; म्हणून त्यास ऋतज म्हणतात. अग्नी, सोम, वरुण, मित्र,









अनुक्रमणिका

सविता, पूषण, इंद्र इ० देवांना 'ऋतज,' 'ऋतावा' म्हणजे ऋत धारण करणारे आणि 'ऋतपा' म्हणजे ऋताचे रक्षण करणारे असे म्हटले आहे. योग्य कर्म, सत्य पथ किंवा प्रशस्त वर्तनक्रम यांचा वाचक ऋत शब्द वैदिक नीतिशास्त्रात आला आहे. 'व्रत' हाही शब्द त्याचाच पर्याय आहे. निर्ऋती ही वेदात पापदेवता मानली आहे. सत्यमार्गापासून च्युती असा निर्ऋती शब्दाचा व्युत्पत्यर्थ आहे. निसर्गाच्या दिव्य शक्ती अग्नी, उषा, सविता, वायु, पर्जन्य, जल, आकाश, पृथ्वी, या व्यक्तिरूप देवता आहेत; आणि त्या ऋततत्त्वाधीन आहेत, असे ऋग्वेदात म्हटले आहे. इंद्र, वरुण, सविता, मित्र, पूषण, रुद्र, धाता, विधाता, विश्वकर्मा किंवा हिरण्यगर्भ यापैकी कोणत्याही मोठ्या देवाच्या स्तुतीत तो स्थावर जन्माचा नियंता द्युलोक, अंतरिक्ष आणि पृथ्वी यांचा निर्माता आणि त्यांचे धारण करणारा, त्यांचा ईश म्हणून वर्णिलेला आहे. परंतु ते सगळे ऋतातून जन्मले आहेत.

ऋत आणि यज्ञ ही पर्यायपदे आहेत. यज्ञ हे वेदांप्रमाणे विश्वतत्त्व आहे. देवांचे विश्वव्यापार म्हणजेच यज्ञ होय. म्हणून ऋग्वेदामध्ये असे म्हटले आहे, की यज्ञाने यज्ञाची पूजा देव करतात; तेच यज्ञ पहिले धर्म होत. त्या धर्मांचे परिपालन केल्यामुळेच देव स्वर्गात स्थिरावले आहेत. वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरद, हेमंत व शिशिर हे वर्षाचे सहा ऋतू; यांची नियमित गती पाहूनच यांना वेदांनी 'ऋतू' हा शब्द लावला आहे. या सर्व ऋतूंची प्रवृत्ती म्हणजे आदित्यादी देवांचे यज्ञकर्म होय. ऋताचे पालन करीत देव सृष्टिचक्र चालवितात, याचे स्पष्टीकरण सवितादेवाच्या वर्णनावरून नीट लक्षात येते. ऋग्वेदातील पुरुषसूक्तात म्हटले आहे, की विश्वातील पुरुष हाच यज्ञपुरुष होय. त्यातूनच देव, चातुर्वर्ण्य उत्पन्न झाले. तोच विश्वात्मक झाला आहे :

ऋताचे म्हणजे व्रताचे पालन सविता करीत असतो. त्याचे ते व्रत सर्व भुवनांच्या धारणेकरता चालते, त्यामुळे विश्वाचे परिपालन होत असते. हे व्रत म्हणजेच सत्य होय, अशा तऱ्हेचा विचार सवितादेवाच्या सूक्तांमध्ये ऋग्वेदात व्यक्त झाला आहे. उदा.—

"वर आलेला विशाल हस्तांचा हा देव आपले हात (किरण) सर्वांच्या लक्षात येतील, असे पसरतो. विश्वातील जलाशय. त्याच्या व्रताला नमस्कार करतात; वायूसुद्धा त्याच्यामुळे स्वतःच्या वर्तुळात फिरत राहतो. अंधकारास जिंकण्याकरता दृढपणे ठाण मांडून हा पुनः पुनः फिरत असतो. सर्व चराचर सृष्टीचे प्रीतिस्थान असलेला हा त्यांचा सहकारी झाला आहे. या दिव्य सवितादेवाच्या व्रताच्या अनुसाराने म्हणजे आज्ञेच्या अनुसाराने पापकर्मांचा त्याग करून प्रत्येक मनुष्य पुढे आला आहे. देवा! वैराण प्रदेशांत फिरणारे पशू, ज्या ठिकाणी पाण्यामध्ये त्यांचा भाग तू ठेवला आहेस तिकडे शोधत जातात. तू पक्ष्यांकरता वनराजी निर्मिली आहेस. सवितादेवाच्या आज्ञा कोणी मोडू शकत नाही (ऋग्वेद २.३८). स्वर्गाला धरून ठेवणारा प्रजांचा प्रतिपालक असा हा कवी सोनेरी झगा अंगात घालीत असतो. हा विचक्षण, विस्तृत जगात पसरून भरून, राहतो; प्रशंसनीय सौख्याचे प्रदान करतो (ऋग्वेद ४.५३). सर्व भुवनाची धारणा ज्यामुळे होते, ते सवित्याचे व्रत कोणी भंगू शकत नाही. सुंदर अंगुलीने पृथ्वीच्या विस्तृत पाठीवर आणि स्वर्गाच्या उंचीवर त्याचे कार्य चालते आणि तेच सत्य होय. (ऋग्वेद ४.५४) हा कवी सर्व रूपे म्हणजे सर्व रंग (वस्तूंमध्ये) भरतो; द्विपाद व चतुष्पाद यांच्याकरता कल्याणाची प्रेरणा देतो. हा आदरणीय सविता, उषेने प्रयाण केले, की नंतर स्वर्गाचे निरीक्षण करीत विलसायला लागतो. (ऋग्वेद ५.८१).

### आश्रमधर्म व वर्णधर्म

'ऋत' व 'ऋण' ही पदे 'ऋ' या गत्यर्थक धातूतून निघाली आहेत. प्राचीन भारतीयांच्या नीतिशास्त्रात ऋण ही संकल्पना नैतिक जबाबदारीच्या कल्पनेचा मुळापासून विकास कसा झाला, याची सूचक आहे. ब्रह्मचर्य व गृहस्थाश्रम या दोन आश्रमांची कल्पना ऋण या संकल्पनेवर आधारली आहे. विश्वसमाज व मानवसमाज देवघेवीवर किंवा विनिमयावर अधिष्ठित असतो. सबंध विश्व हा समाज आहे, अशी वेदांची कल्पना आहे; तो देवघेवीवर चालतो. आपणापाशी जे आहे ते द्यावे आणि त्याऐवजी आपल्यापाशी नसलेले व दुसऱ्यापाशी असलेले घ्यावे,

अनुक्रमणिका

असा हा रास्त देवघेवीचा व्यवहार असतो. माणसाच्या तीन, चार किंवा पाच प्रकारच्या ऋणाची कल्पना वेदकाळी उत्पन्न झाली. देवऋण, ऋषिऋण आणि पितृऋण ही तीन ऋणे घेऊन ब्राह्मण जन्मतो; असे तैत्तिरीय संहितेत (६.३.१०.५) म्हटले आहे. शतपथ ब्राह्मणात ब्राह्मण हा शब्द वगळला आणि मनुष्यमात्रावर देव, ऋषी, पितर आणि मनुष्ये यांचे जन्मतःच ऋण असते, असे म्हटले आहे. देवांचे ऋण म्हणजे विश्वातील इंद्र, वरुण, वायू, आदित्य, द्युलोक, पृथ्वी, अग्नी इ. देवांचे ऋण होय. प्रकाश, पाणी, अन्न यांची प्राप्ती त्यांच्यापासून होते. या ऋणाची फेड देवयज्ञाने नित्य करायची असते. ऋषींचे ऋण म्हणजे आपणास परंपरेने प्राप्त झालेली सर्व प्रकारची विद्या. ही विद्या ब्रह्मचर्याश्रम पतकरून विद्याग्रहणाने आणि जन्मभर स्वाध्याय केल्याने हे ऋण फिटते. आपण जन्मतो, हे पितरांचे ऋण होय. हे ऋण गृहस्थाश्रम स्वीकारून प्रजोत्पादनाने फेडता येते. माणसांचे सहकार्य मिळाल्याशिवाय जीवन शक्य नसते. म्हणून ते ऋण आतिथ्यसत्काराने व नित्य दानाने फिटते. बृहदारण्यक उपनिषदात (१.४. १६) याच ऋणसंकल्पनेला अनुसरून पाच महायज्ञ सांगताना म्हटले आहे की देव, ऋषी, पितर, मनुष्ये, पशू इ. अन्य प्राणी यांचा आधार मनुष्याचा आत्मा आहे. यज्ञाने देवांचा, अध्ययनाने ऋषींचा, प्रजोत्पादनाने आणि श्राद्धक्रियेने पितरांचा, अतिथी म्हणून आलेल्या माणसांना आश्रय आणि अन्न दिल्याने त्यांचा आणि पशुपक्षी, मुंग्या इत्यादिकांना माणसापासून तृण, उदक, अन्न इत्यादिकांची प्राप्ती होते म्हणून त्यांचा माणूस आधार बनतो. अशा रीतीने हे देवादी सर्व माणसाचे कल्याण इच्छितात.

हे सर्व विश्व म्हणजे समाज अशी वेदांची कल्पना आहे. उदा., देवांचा समाज आणि मनुष्यांचा समाज गृहीत धरून बृहदारण्यक उपनिषदात (१.४.१०–१६) चातुर्वर्ण्यसंस्थेचा विकास आणि धर्मतत्त्वाचा महिमा सांगितला आहे:– " प्रथम अग्निरूप केवळ ब्रह्म होते, ते एकच होते. त्याचे सामर्थ्य कमी पडू लागले; प्रगती होईना; म्हणून त्याने अधिक उच्च रूप धारण केले, ते म्हणजे देवांमधील क्षात्रवर्ण होय, इंद्र, वरुण, सोम, रुद्र, पर्जन्य, यम, मृत्यु आणि ईशान हा तो वर्ण होय. तेवढ्याने भागेना, प्रगती होईना, म्हणून वैश्यवर्ण निर्माण केला. वसुगण, रुद्रगण, आदित्यगण, मरुद्गण आणि विश्वेदेव हे देवांमधले वैश्य होत. तेवढ्याने भागेना, म्हणून शूद्रवर्ण निर्माण केला. त्याला पूषा म्हणतात, ही सर्वांची पोषण करणारी पृथ्वी पूषा होय. तेवढ्याने भागेना, सामर्थ्य कमी पडू लागले म्हणून अधिक श्रेयस्कर रूप ब्रह्माने निर्मिले, ते म्हणजे धर्म होय. धर्म हा क्षत्रियाचाही क्षत्रिय आहे. म्हणून धर्मापेक्षा काही वरिष्ठ नाही; कारण कमी बळाची व्यक्ती अधिक बळाच्या व्यक्तीला धर्माच्या आधारे आज्ञा करू शकते, राजा जसा आज्ञा करतो त्याचप्रमाणे. ज्याला धर्म म्हणतात तेच सत्य होय- म्हणून सत्य बोलणारा धर्म बोलतो, असे म्हणतात किंवा धर्म जो सांगतो, तो सत्य सांगतो, असे म्हणतात. हेच देवांमधील चातुर्वर्ण्य मनुष्यांमध्ये अवतरले. हे देवमनुष्यांमधले चातुर्वर्ण्य आत्म्याबाहेर नाही. हा सर्व आत्माच होय. असे ज्याला माहीत नाही, त्याचे पुण्यकर्म अखेर क्षय पावते. जो हा सर्व आत्माच आहे, असे जाणतो, त्याचे पुण्यकर्म क्षीण होत नाही.

वर्णधर्म आणि आश्रमधर्म यांच्या कल्पना उपनिषदांमध्ये अधिक स्पष्ट झाल्या; उपनिषद्पूर्वकाळी वैदिक समाजात ब्रह्मचर्य व गृहस्थ या दोन आश्रमांचेच धर्म मुख्यतः मान्य झाले होते. वानप्रस्थ आणि संन्यास हे निवृत्तिमार्गी आश्रम आरण्यके आणि उपनिषदे यांच्यामध्येच मान्य झालेले दिसतात. कारण आरण्यकपूर्व वा उपनिषत्पूर्व वैदिक साहित्यात जो यज्ञधर्म आणि व्रते सांगितली आहेत, ती ब्रह्मचारी आणि गृहस्थ यांनाच उद्देशून सांगितली आहेत. विश्वाचे मूलभूत एकच सत्तत्त्व म्हणजे ब्रह्म किंवा परमात्मा याचे विवरण करणाऱ्या छांदोग्य या प्राचीन उपनिषदाच्या अखेरीसही जो धर्मतत्त्ववेत्त्या आचार्यांचा वंश सांगून उपसंहार केला आहे त्यात असे म्हटले आहे :– " ती ही ब्रह्मविद्या ब्रह्मदेवाने प्रजापतीला, प्रजापतीने मनूला आणि मनूने प्रजांना सांगितली. आचार्यकुलामध्ये गुरुशुश्रूषेचे व्रत आचरीत वेदाध्ययन करून स्वतःच्या कुटुंबात परतावे. नंतर पवित्र स्थानी स्वाध्यायाचे अध्ययन करीत, धार्मिक कर्मे करीत, सर्व इंद्रिये

अनुक्रमणिका

आत्मवश करून, विशिष्ट प्रसंग सोडून केव्हाही कोणत्याही प्राण्याची हिंसा न करता रहावे; सर्व आयुष्यभर हे व्रत चालवावे म्हणजे ब्रह्मलोकाची प्राप्ती होते. पुन्हा संसारामध्ये परतावे लागत नाही." ( ८,१५ ). परंतु त्याच छांदोग्य उपनिषदात ( २.२३ ) धर्मांचे तीन स्कंध ( आश्रम ) सांगितले आहेत. "यज्ञ, अध्ययन आणि दान हा पहिला स्कंध म्हणजे गृहस्थाश्रम होय. तप हा द्वितीय स्कंध वानप्रस्थ होय ; आणि जन्मभर नैष्ठिक ब्रह्मचर्याचे आचरण करून राहणे, हा तृतीय स्कंध होय. या तिन्हीही आश्रमांपैकी जो ब्रह्मनिष्ठ होतो त्याला अमरत्व प्राप्त होते." गृहस्थाश्रम न पतकरता ऐहिक आणि पारलौकिक एषणांचा म्हणजे कामनांचा त्याग करून वैराग्यवृत्तीने जन्मभर रहाणाऱ्या संन्यासी योग्यांचा निर्देश बृहदारण्यक उपनिषदात आला असून मुण्डकोपनिषदात ( ३.२.६ ) संन्यासयोगी यती मोक्षास जातात असे म्हटले आहे.

## वैदिक देवतावादाच्या पलीकडचा ब्रह्मात्मवाद

वेदातील यज्ञधर्म हा मुख्यत: बहुदेवतावादी आहे; परंतु हा बहुदेवतावाद ऋग्वेदामध्येच अखेरीस एकदेवतत्ववाद बनला आहे ( ऋग्वेद १०.८२ ) तेथे म्हटले आहे:– "सगळी भुवने आणि प्रकाशस्थाने जो आमचा पिता, जनक, विधाता जाणतो आणि जो देवांची नामे आणि रूपे निर्माण करतो, तो एकच आहे. अनेक माणसे त्याच्याबद्दल तो कोण आहे, अशी पृच्छा करीत असतात. स्वर्गाच्या पलीकडे, या पृथ्वीच्या पलीकडे, देवांच्या व असुरांच्या पलीकडे जे काही आहे, ते आदितत्त्व आहे. त्या आदितत्त्वाच्या केंद्रस्थानी सगळी भुवने गुंफलेली आहेत. ही भुवने ज्याने निर्माण केली, ते काही निराळे आहे. त्याला तुम्ही जाणत नाही. त्याच्यात व तुमच्यात अंतर आहे." पुढे एका ऋग्वेदाच्या सूक्तात (१०.१२१) पुढे जाऊन म्हटले आहे की, "जो प्राण आणि बल देतो, सर्व देव ज्याची आज्ञा पाळतात, ज्याची छाया अमृत व मृत्यू आहे, त्या कोणत्या देवाची आम्ही हवी अर्पण करून पूजा करीत असतो ? हा कुशल कर्म करणाऱ्या देवांच्या मध्ये सर्वांत श्रेष्ठ कुशल कर्म करणारा आहे." "विश्वाचे कल्याण करणारे आकाश व पृथ्वी हे युग्म त्याने निर्मिले आहे. शुभ संकल्प करून हे आकाश व पृथ्वी यांचे सुयोग्य रीतीने धारण करण्याकरता त्याने अविनाशी असे नियम बनविले आहेत" ( ऋग्वेद १.१६०.४ ). "इंद्र, मित्र, वरुण, दिव्य, पक्ष असलेला गरुड ( सूर्य ), अग्नी, यम, ईशान असे ज्यांचे बहुविध निर्देश ज्ञानी लोकांकडून केले जातात, ते सर्व म्हणजे एकच सत् तत्त्व आहे" ( १.१६४.४८ ).

परंतु हे एक मूळ तत्त्व काय आहे, याबद्दल ऋग्वेदातील एका सूक्तात ( १०.१२९ ) अज्ञेयवाद व्यक्त केला आहे, तो असा:– "ही विविध सृष्टी कोठून निर्माण झाली, हे खरोखर कोणास माहीत आहे ? याबद्दल नीट कोण सांगेल ? या सृष्टीच्या निर्मितीच्या नंतर देव निर्माण झाले आहेत ( तेही सांगू शकणार नाहीत ). मग हे कोठून प्रकट झाले, हे कोणास माहीत असणार ? ही सृष्टी ज्याच्यापासून झाली, ते सुद्धा आहे की नाही, याचे ज्ञान या विश्वाच्या परम आकाशात जो अध्यक्ष असेल त्याला सुद्धा खरोखर असेल की नाही, कोणास ठाऊक ?"

हे सृष्टीचे किंवा सबंध विश्वाचे गूढ उकलण्याकरता आणि यज्ञाचे रहस्य शोधण्याकरता उपनिषदांतील विचार सुरू झाला. वैदिक देवांकडे या उपनिषत् कालीन ऋषींनी पाठ फिरवून ते अध्यात्मवादाकडे वळले. शतपथ ब्राह्मणात ( ११.२.६. १३-१४)असा प्रश्न विचारला आहे : "देवयाजी (देवपूजक) चांगला, की आत्मयाजी (आत्मपूजक) चांगला? आत्मयाजीच चांगला, असे म्हणावे. एखाद्या श्रीमंताकडे दरिद्री माणसाने याचना करावी, वा राजाला वैश्याने नजराणा द्यावा, त्याचप्रमाणे देवयाजी करीत असतो. आत्मयाजी यज्ञ करतो ते आत्म्यावर चांगला संस्कार व्हावा म्हणून."

आत्माच ब्रह्म होय, हा अंतिम सिद्धान्त उपनिषदांनी स्थापन केला आहे. उदा. केनोपनिषदामध्ये मन, वाचा, नेत्र, श्रोत्र इ. इंद्रिये ज्याच्या प्रेरणेने कार्य करीत असतात, तेच ब्रह्म होय. श्वासोच्छ्वास ज्याच्या योगाने चालतो, तेच ब्रह्म होय. त्याच्या ज्ञानानेच अमरत्वाची प्राप्ती होते. हे आत्मरूप ब्रह्म होय. केनोपनिषदात यासंबंधी एक कथा सांगितली आहे: – "देव व असुर यांच्या युद्धामध्ये देवांना

अनुक्रमणिका

विजय मिळाला. देवांना जेव्हा असुरांवर विजय मिळाला, तेव्हा त्यांचा महिमा वाढला. तेव्हा त्यांना असे वाटले, की हा विजय व हा महिमा आपणच मिळविला आहे. परंतु एका यक्षाचे रूप घेऊन ब्रह्माने अग्नी, वायू आणि देवाधिदेव इंद्र यांच्या सामर्थ्याची कसोटी पाहिली. तेव्हा अग्नीला गवताची काडीही जाळता आली नाही; वायूला एक काडीही उडविता आली नाही; नंतर इन्द्र पुढे सरसावला आणि लगेच ब्रह्म अदृश्य झाले. इंद्राच्या लक्षात आले, की आपला हा विजय व महिमा म्हणजे ब्रह्माचाच विजय व महिमा होय; आपला नव्हे."

ही केनोपनिषदातील कथा, उपनिषत्कालीन ऋषी देवांना बाजूस सारून अन्तर्मुख होऊन व अध्यात्मचिंतनात रममाण झाले, याची सूचक आहे. बृहदारण्यक उपनिषदात (१.४.१०) म्हटले आहे:– "मी निराळा आणि देव निराळे, म्हणून देवांची जो उपासना करतो, त्याला आत्मज्ञान होत नाही. तो देवोपासक देवांचा पशू असतो. माणसाला आत्मज्ञान होऊ नये, अशी देवांचीही इच्छा असते. माणसाला आत्मज्ञान झालेले देवांना आवडत नाही. आपल्यापाशी अनेक पशू असतात. त्यातील एखादा पशूही कोणी घेऊन जाऊ लागला, तर ते आपणास आवडत नाही तसेच देवांचे असते. सगळे वैदिक यज्ञ देवांकरता करावयाचे असतात. वेदांमध्ये आत्मज्ञान नाही; केवळ देवज्ञान आहे; ही गोष्ट छांदोग्य उपनिषदाच्या सहाव्या अध्यायात सांगितलेल्या श्वेतकेतूच्या कथानकावरून सूचित होते. ते कथानक असे:– अध्यात्मवादी उद्दालक ऋषीचा पुत्र श्वेतकेतूनामक होता. त्याला पित्याने सांगितले, की आता तू बारा वर्षांचा झालास म्हणून ब्रह्मचर्याश्रमाचा स्वीकार करावा, अशीच आमच्या कुलाची रीत आहे. श्वेतकेतू वेदाध्ययनार्थ गुरुगृही गेला. तेथे वयाच्या चोविसाव्या वर्षापर्यंत त्याने वेदांचे पूर्ण अध्ययन केले. त्याला स्वतः विद्वान झालो असे वाटू लागले. पित्याकडे परत आला. पित्याने त्याला म्हटले, की तू स्वतःला विद्वान समजतोस, परंतु तू आपल्या गुरूला मी सांगतो तो महत्त्वाचा आदेश विचारलास काय ? जे जाणले असताना, कधी ऐकले नाही ते श्रुत होते; मनन केले नाही त्याचे मनन पूर्ण होते किंवा जे ज्ञात झाले नाही ते सर्व ज्ञात होते त्यासबंधी तुला काही ज्ञान आहे काय ? श्वेतकेतू यावर म्हणाला की भगवान, या प्रश्नाचे उत्तर काय आहे. ते मला माहीत नाही, काय आहे ते सांगा. पित्याने त्याला सर्व विश्वाचे मूलभूत, एकमेव अद्वितीय सत्तत्त्व विवरण करून सांगितले. "तेच सत्तत्त्व म्हणजे सर्व विश्वाचे अस्तित्व होय; तोच शाश्वत व अमर आत्मा; आणि 'तत्त्वमसि' तेच तू आहेस," असा अध्यात्मवादाचा मूलभूत सिद्धान्त अनेक दृष्टान्त देऊन समजावून सांगितला.

## उपनिषदांचा ज्ञानयोग

या श्वेतकेतूच्या कथेवरून हे सूचित झाले, की चार वेदांमध्ये जी यज्ञविद्या किंवा देवविद्या आहे, तिच्यामध्ये विश्वाच्या परम तत्त्वाचा विचार नीट रीतीने मांडलेला नाही. वेदांच्या पलीकडे असलेल्या परतत्त्व विद्येकडे खऱ्याखुऱ्या शाश्वत अमरत्वाच्या प्राप्तीकरिता, मोक्षाकरता वळले पाहिजे. देवविद्येने प्राप्त होणारे अमरत्व हे सापेक्ष आहे; त्याला मर्यादा आहे. इंद्र हा यज्ञविद्येतील श्रेष्ठ देवाधिराज आहे; परंतु तोसुद्धा अध्यात्मविद्येकरता सर्व देवांचा पिता जो प्रजापती ब्रह्मा त्याच्याकडे ब्रह्मचर्यव्रताचे पालन करून रहातो, असे छांदोग्य उपनिषदाच्या सहाव्या अध्यायात म्हटले आहे. तसेच शतपथ ब्राह्मणात (१०.५.४.१६) म्हटले आहे, की त्या परतत्त्वाकडे यज्ञाच्या दक्षिणा पोहोचत नाहीत. आणि खरीखुरी आत्मविद्या नसलेले म्हणजे अविद्वान तपस्वीही पोहोचत नाहीत. आत्मविद्येनेच त्या तत्त्वावर मुनी आरूढ होतात; तेथेच सर्व कामना पूर्ण होतात. .महाभारतात (१२.२१६) म्हटले आहे, की सर्व देवता आत्म्यातच समाविष्ट झाल्या आहेत. "त्या अक्षर तत्त्वाच्या ज्ञानानेच सर्व काही धर्माचरण शाश्वत फलदायी होते," असे बृहदारण्यक उपनिषदात (२.८.१०) म्हटले आहे.

## भगवद्गीतेचा नारायणी धर्म

प्राचीन उपनिषदांमध्ये ब्रह्मात्मसाक्षात्काराकरिता गृहस्थाश्रमात आचारावयाचा कर्मयोग उपयुक्त होतो, असे म्हटलेले असले, तरी बृहदारण्यक उपनिषद आणि मुण्डकोपनिषद यांच्यामध्ये संन्यासयोगाला अधिक महत्त्व दिले आहे किंवा असे म्हणता








येते, की प्रवृत्तिमार्गापेक्षा निवृत्तिमार्ग श्रेष्ठ ठरविला आहे. उपनिषदांच्या शेवटच्या कालखंडात म्हणजे इसवी सन पूर्व सहाव्या शतकात भारतामध्ये निवृत्तिमार्ग किंवा संन्यासयोगच मोक्षाचा एकमेव मार्ग होय, अशी विचारसरणी प्रबळ झाली. या विचारसरणीतून बौद्ध धर्माचा व जैन धर्माचा उदय झाला. या संन्यासधर्मास श्रमणधर्म म्हणतात. श्रमण-धर्माची परंपरा वेदपूर्व कालापासून भारतात दृढमूल झाली होती. समाधिस्थ पशुपती योगी याची मूर्ती वेदपूर्वकालीन सिंधुसंस्कृतीत सापडली आहे; त्यावरून असे अनुमान निघते. बौद्ध व जैन धर्मांत समाधि-मार्गाला प्राथम्य आहे. यावरून हा श्रमणमार्ग आर्य-भाषिक भगवान बुद्ध व तीर्थंकर महावीर यांनी या आर्यपूर्व श्रमणमार्गाला प्राधान्य दिले, असेही अनुमान करता येते. ऐहिक फलदायी व पारलौकिक फलदायी कर्मकांडाचा म्हणजे गृहस्थधर्माचा त्याग करणे आणि वैराग्यपूर्वक संन्यास पतकरून तपाने पाप-पुण्यकर्मांचा लेप धुवून टाकून मोक्षपदाला जाणे, हाच अंतिम उद्देश या श्रमणमार्गाचा आहे. परंतु वैष्णव नारायणीय धर्माची परंपरा इसवी सन पूर्व पाचव्या शतकापासून चालू होती, या परंपरेस श्रमणमार्गापेक्षा एकेश्वरवादी कर्मयोगच श्रेष्ठ वाटत होता. या नारायणीय धर्माला नवा उजळा भगवद्-गीतेने दिला आणि वैदिक कर्मयोग, उपनिषदातील ज्ञानयोग त्याचप्रमाणे श्रमणमार्गाचा समाधियोग किंवा संन्यासयोग यांचा समन्वय करण्याचा प्रयत्न केला. ऐहिक व पारलौकिक फलांच्या कामनेने भरलेले कामात्मे त्रैविद्य याज्ञिक लोक ऐहिक व पारलौकिक स्वर्गसुखाकरता धडपडतात त्यामुळे मोक्षापासून हे लोक वंचित होतात; परंतु वेदोक्त कर्मे म्हणजे यज्ञ, दान, तप ही कर्मे निष्काम बुद्धीने, ब्रह्मार्पण बुद्धीने केली, तर ती चित्तशुद्धीस कारण होतात असे म्हणून निष्काम कर्माचा म्हणजे कर्म-योगाचा पुरस्कार गीतेने केला आहे. उपनिषदांचा ज्ञानयोग हा कर्मयोगाला जोडला. संन्यासयोगातील वैराग्य हेही कर्मयोगाच्या विरुद्ध नाही. कर्म करीत अस-ताच आत्मानात्मविवेकपूर्वक वैराग्यवृत्ती प्राप्त होऊ शकते, म्हणून संन्यासाची मनोभूमिकाही कर्मयोगास पूरक आहे, असा विचार गीतेमध्ये मांडला आहे. उपनिषदातील ज्ञानयोगास सांख्ययोग अशी संज्ञा गीतेने दिली आहे व असा निष्कर्ष काढला आहे, की सांख्ययोगानें जसा मोक्ष प्राप्त होतो त्याचप्रमाणे कर्मयोगानेही प्राप्त होतो. तत्त्वतः दोन्ही योग सारखेच.

भारतीय तत्त्वज्ञानाचे ऐतिहासिक दृष्टीने चिंतन करणारे काही पश्चिमी विद्वान असे म्हणतात, की सांख्य तत्त्वज्ञान हे मुळात अवैदिक असून, ते आत्म-सात करण्याचा प्रयत्न प्राचीन उपनिषदांच्या काळा-मध्ये सुरू झाला. कठोपनिषद आणि श्वेताश्वतरोप-निषद यांच्यामध्ये सांख्य तत्त्वज्ञानाचे संदर्भ सापड-तात. आणि हे सांख्य तत्त्वज्ञान ब्रह्मविद्येशी सुसंगत करून घेण्याचा प्रयत्न केला. भगवद्गीतेने हे सांख्य तत्त्वज्ञान आपल्या एकेश्वरवादाशी जुळवून घेतले; म्हणून भगवद्गीतेत दोन मुख्य तत्त्वे सांगितली ती म्हणजे क्षेत्र म्हणजे प्रकृती आणि क्षेत्रज्ञ म्हणजे पुरुष ( जीवात्म्यांसह पुरुषोत्तम परमात्मा ). या द्वैताचा वारंवार निर्देश गीतेत आला आहे. त्रिगुणात्मक चैतन्यरहित प्रकृती म्हणजे क्षेत्र होय. या प्रकृतीशी संयोग पावलेले पुरुष म्हणजे जीवात्मे आणि पुरुषोत्तम म्हणजे परमात्मा यांच्यापासून विश्वाच्या उत्पत्ति-स्थिति-लयांचे चक्र सुरू राहते, असे भगवद्गीतेत म्हटले आहे. सांख्यांनी प्राचीन परंपरेने आलेली योग-विद्याही आत्मसात केली. या सांख्य विद्येचा आणि योगविद्येचा खोल प्रभाव भगवद्गीतेवर पडला आहे. म्हणूनच सांख्य आणि योग पृथक आहेत, असे बाल म्हणतात; पंडित म्हणत नाहीत, असे निक्षून भगवद्गीतेत म्हटले आहे.

भगवद्गीतेचा गाभा म्हणजे भक्तियोग होय. हा एकेश्वरभक्तिवादी संप्रदायसुद्धा मुळात अवैदिक होता; परंतु वेदातील यज्ञकर्म हे देवभक्तिपूर्वक चालत असते. वैदिक देवांच्या भक्तिपूर्ण स्तोत्रांनी ऋग्वेद भरलेला आहे. म्हणून सर्व देवांचाही देव भगवान विष्णू आणि त्याचा अवतार श्रीकृष्ण यांची भक्ती वैदिक परंपरेशी गीतेने जुळवून घेतली; आणि इतर देव दुय्यम ठरविले. त्याचप्रमाणे उपनिषदा-तील ब्रह्म-परमात्मा हाच परमेश्वर होय, असे म्हणून गीतेने उपनिषदांशी आपल्या तत्त्वज्ञानाचा समन्वय साधला आहे. सर्व जीवात्मे हे अमूर्त, अव्यक्त व सर्वव्यापी आणि त्रिगुणातीत परमेश्वरा-चेच अंश आहेत, असा विचार सांगून उपनिषदांशी

समन्वय पूर्ण केला. गीतेमध्ये उपनिषदातील जीवात्मा व परमात्मा यांचा अद्वैतवाद निश्चितपणे आहे; परंतु त्रिगुणात्मक प्रकृती व तिच्यातून निर्माण झालेले दृश्य विश्व ही भ्रमात्मक आभासरूप माया आहे की नाही, हे निश्चितपणे सांगता येत नाही. प्रकृतीचे माया हे पद विशेषण आणि प्रकृतीचेच माया हे पर्यायपद गीतेत निर्दिष्ट केले आहे. परंतु ही माया म्हणजे शंकराचार्यांच्या सिद्धांताप्रमाणे विश्वभ्रम निर्माण करणारे अज्ञानतत्त्व हे माया आहे की नाही, याबद्दल गीतेत काहीही सांगितले नाही. म्हणजे असे, की शंकराचार्यांचा मायावाद गीतेत कोठेही प्रतिपादिला नाही.

गीतेत अखेरीस भगवद्‌भक्तीचाच अंतिम निष्ठा म्हणून पुरस्कार केला आहे आणि कर्मयोगाला भक्तियोगाचे रूप दिले आहे, किंबहुना या एकेश्वर-भक्तिखाली उपनिषदातील ब्रह्मज्ञानही झाकोळले गेले आहे. गीते प्रमाणे हा भक्तियोग दैवी संपत्ती-शिवाय पूर्ण होत नाही; अभय, अन्तःकरणाची शुद्धी, ज्ञान व योग यांची साधना, दान, इंद्रियदमन, यज्ञ, स्वाध्याय, तप, ऋजुता, अहिंसा, सत्य, अक्रोध, त्याग, शांती, दुसऱ्याच्या दोषांची चर्चा न करणे, प्राण्यावर दया, विषयांची अभिलाषा न करणे, लाज, धावपळ न करणे, तेज, क्षमा, सहनशीलता, शुचिता, द्वेष न करणे, अभिमान न धरणे ही सर्व दैवी संपत्ती होय. ही संपत्ती असली तरच मोक्ष-प्राप्ती होते.

ज्ञानयोग, कर्मयोग, संन्यासयोग आणि समाधियोग यांचा समन्वय किंवा समुच्चय जसा भगवद्‌गीतेत दिसतो त्याचप्रमाणे या चार योगांपैकी कोणत्याही योगाने परमार्थप्राप्ती किंवा मोक्षप्राप्ती होते, असेही गीतेच्या विवरणावरून लक्षात येते. म्हणूनच भगवद्‌-गीतेचे आधुनिक पश्चिमी समीक्षक भगवद्‌गीतेत आंतर्विरोध आहे, असे म्हणतात आणि ते एका दृष्टीने खरेही आहे.

## चातुर्वर्ण्य व जातिव्यवस्था

गीतेमध्ये चातुर्वर्ण्याचे गुणधर्म विभागशः समर्थन केले आहे. सत्त्व, रज व तम या तीन गुणांच्या विविध कर्मांनी चातुर्वर्ण्य निर्माण मी केले आहे, असे भगवान म्हणतात. गीतेतील चातुर्वर्ण्याची ही संकल्पना जन्मसिद्ध जातिसंस्थेचे समर्थन करते, असे मात्र म्हणता येणार नाही. परंपरागत पुराणमतवादी यांचे यावर म्हणणे असे की, सत्त्व, रज व तम हे गुण माणसामध्ये जन्माबरोबरच वैषम्याने असतात, आणि त्यांच्या योगानेच माणसाची कर्मे स्वभावा-नुसार घडत असतात. स्वभाव म्हणजे त्रिगुणात्मक प्रकृती. म्हणून भवद्‌गीतेतील चातुर्वर्ण्यतत्त्व मनुयाज्ञ-वल्क्य इत्यादिकांनी सांगितलेल्या जातिव्यवस्थेचे समर्थन करते. यावर उत्तर असे की, जातिव्यवस्थेचे अवलोकन केले असता ब्राह्मणनामक जातीमध्ये सत्वगुणप्रधान व्यक्तीच्या ऐवजी रजोगुणप्रधान किंवा तमोगुणप्रधान व्यक्ती मोठ्या प्रमाणावर आढळतात आणि त्याचप्रमाणे वैश्य-शूद्रांमध्ये सत्त्वगुणप्रधान व्यक्तीही आढळतात. म्हणून मुळात गीता ही जाति-व्यवस्थेला प्राधान्य देणारी आहे, असे म्हणता येत नाही. अर्जुन हा वंशपरंपरेने म्हणजे जातीने क्षत्रिय असला, तरी तो गुणकर्मांनीही क्षत्रिय म्हणजे शूर आहे असे निश्चित सांगता येते. म्हणून गीता जाति-निष्ठ आहे, असे सिद्ध होत नाही. गीतेच्या प्रारंभी प्रथम अध्यायात वर्णसंकर वर्णांची अव्यवस्था निंदिली आहे. त्याचा एवढाच अर्थ, की युद्धाच्या शेवटी अनेक शूर मरण पावले असताना त्यांच्या स्त्रिया स्वैरिणी बनू शकतात, त्यामुळे वर्णसंकर होतो.

आमचे हे विधान अनेकांना संशयास्पद वाट-ण्याची शक्यता आहे; परंतु महाभारतामध्ये (१२.१८९) अनेक ठिकाणी विस्ताराने असे प्रतिपा-दिले आहे, की ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र हे जन्माने ओळखू नयेत, तर त्यांच्या आचार–विचारा-वरून ओळखावे. शूद्रात ब्राह्मणाचे लक्षण म्हणजे आचार–विचार आढळले, तर तो शूद्र नव्हे, आणि ब्राह्मणात योग्य आचार–विचार आढळले नाहीत, तर तो ब्राह्मण नव्हे. तात्पर्य असे, की भगवद्‌गीतेची (जातिविषयक) विचारसरणी ही जातिसंस्था स्थिर होण्याच्या पूर्वीची आहे. महाभारतामध्ये वारंवार भर पडत गेली आहे. त्यामुळे जातिसंस्था स्थिराव-ण्याच्या पूर्वीचे विचार जसे त्यात आढळतात, तसे जातिसंस्था स्थिरावल्यानंतरचेही विचार आढळतात. ऐतिहासिक दृष्टिकोन स्वीकारल्याशिवाय महाभार-तातील यासंबंधीची विसंगती नीट उलगडणार नाही.

अनुक्रमणिका






परंपरागत हिंदू धर्मामध्ये असा ऐतिहासिक दृष्टिकोन नाही त्यामुळे वेद, स्मृती, पुराणे व परंपरागत तथाकथित शिष्टाचार किंवा पवित्र मानलेल्या रूढी हाच धर्म म्हणून मान्यता पावला आहे. हे समाजाच्या मौलिक परिवर्तनाचे युग आहे. या युगामध्ये ऐतिहासिक दृष्टिकोन महत्त्वाचा ठरतो. या दृष्टिकोनानें हिंदू धर्माचे श्रुती, स्मृती, महाभारत व पुराणे यांची समीक्षा केल्यास असे आढळते की एक समय असा होता की त्यावेळी धर्माची विवेकवादी मीमांसा निर्माण झाली होती. पवित्र ग्रंथांचेच प्रामाण्य मानून धर्ममीमांसा न करता विवेकबुद्धीनेही धर्ममीमांसा केलेली आढळते. उदा. महाभारतात ( २५९ ) भीष्म सांगतात, की सदाचार म्हणजे पवित्र रूढी, स्मृती, वेद आणि (अर्थ) अर्थोत्पादक व्यवसाय यांच्यावरून धर्माधर्म ठरतात. असे ज्ञानी लोक म्हणतात ; परंतु त्यांच्यावरून ठरणारी जी धार्मिक कर्मे असतात, त्यामध्ये कोणता अधिक वरचा व कोणता अधिक खालचा धर्म होय, या बाबतीत मतभेद दिसतो. परंतु धर्मांचा नियम ह्या जगात लोकयात्रा नीट चालावी म्हणूनच केला आहे. धर्माने लोकयात्रा नीट चालली, म्हणजे तो धर्म ऐहिक व पारलौकिक सुखास कारण होतो. दुसरीकडे भीष्म म्हणतात ( महाभारत १२.१०९ ) "सत्य व असत्य काय किंवा धर्म आणि अधर्म काय, यासंबंधाने निश्चित गणित सांगता येत नाही. कुणी म्हणतात, की श्रुतीत म्हणजे वेदात जो सांगितला तो धर्म होय आणि कुणी म्हणतात की तसे काही म्हणता येत नाही. परंतु हे दोन्हीही सारखेच. त्यांच्यात आम्ही भेदभाव करीत नाही. खरे म्हणजे प्राण्यांच्या उत्कर्षाकरिता धर्माचे प्रवचन केलेले असते. जो उत्कर्ष देतो तो धर्म होय, असा निर्णय करावा लागतो. धारण करतो तो धर्म होय; धर्माच्या योगाने प्रजांचे धारण होते ; असा निर्णय निघतो. प्राण्यांच्या अहिंसेकरता धर्माचे प्रवचन केलेले असते. जो अहिंसायुक्त असेल, तोच धर्म होय, असा निर्णय करता येतो."

अहिंसार्थाय भूतानां धर्मप्रवचनं कृतम् ।
यः स्यादहिंसया युक्तः स धर्म इति निश्चयः ॥

महाभारत, शांतिपर्व अ. १०९
-श्लोक १४ (मुंबईप्रत)

## समाज, राज्य व राजधर्म :

समाज रक्षणार्थ म्हणजे धर्म, अर्थ काम आणि मोक्ष यांची साधना समाजातील व्यक्तींना करता यावी म्हणून क्षात्रधर्म आदिदेवाने प्रवृत्त केला ( महाभारत १२।६४।२१ ), सर्व व्यक्तींचे किंवा समाजाचे इतर धर्म हे क्षात्रधर्माचे अंगभूत आहेत. चार आश्रम आणि चातुर्वर्ण्य यांचे संरक्षण राजधर्माधीन आहे ( महाभारत १२।६३।२७ ) असा सिद्धांत हिंदूच्या सनातन धर्मामध्ये मूलभूत मानलेला आहे. आदर्श स्थितीमध्ये राज्य, राजा, दंड व दंडधारी नव्हता ; धर्माच्याच प्रभावाखाली सर्व प्रजा परस्परांचे रक्षण करीत होती ; परंतु मोहाचा पगडा माणसांवर पडला, माणसे लोभवश झाली, विवेक नाहीसा झाला, तेव्हा दंडनीती निर्माण झाली ( महाभारत १२।५९।५९ ) अशी ही कल्पना हिंदू धर्माच्या राज्यशास्त्रात प्रचलित आहे. दुसरा असा सिद्धांत की सामाजिक अर्थव्यवस्था सांभाळण्याकरिता दण्डशक्ती आवश्यक असते. (महाभारत १२।१५). अर्थव्यवस्था नीट असली म्हणजे धर्म, काम आणि मोक्ष या पुरुषार्थांची साधना व्यक्तींना नीट करता येते. अर्थव्यवस्था बिघडली म्हणजेच मात्स्यन्यायाने समाज विघटित होतो, म्हणजे लहान मासा मोठ्या माशास गिळतो; म्हणजे समाज नष्ट होतो. त्याकरिता दंडशक्ती माणसे निर्माण करतात; सामाजिक करार ( समयबंध ) होतो व समाज परिपालनाचे कार्य नीट सुरू राहते. दंड हाच धर्म, अर्थ आणि काम या पुरुषार्थांचे रक्षण करतो. ह्या तीन पुरुषार्थांना त्रिवर्ग अशी संज्ञा आहे. दंड हा त्रिवर्गरूप असतो ( महाभारत १२.१५ ). दंड ही शक्ती गणराज्य किंवा राजसत्ता यांच्या रूपाने अवतरत असते.

हिंदू धर्मांप्रमाणे राजा हा दोन प्रकारचा, धार्मिक व अधार्मिक. आत्मविजयी, आत्म्यावर म्हणजे स्वतःच्या मनावर व इंद्रियावर विजय मिळविलेला राजा हाच खरा राजा होय. त्या त्या वेळी जी जी अर्थव्यवस्था आणि धर्मव्यवस्था प्रजेने मान्य केलेली असते; कोणाच्याही न्यायार्जित संपत्तीचे संपूर्ण रक्षण होऊ शकते, कोणत्याही प्राण्याच्या जीवाला कसलाही धोका पोहोचत नाही अशी जी अर्थव्यवस्था व धर्मव्यवस्था असते, त्या अर्थव्यवस्थेचे व







रु. ४१–०६ गुंतवा

रु. १००–०० घ्या

– महाबँकेची –

# कॅश सर्टिफिकेटस्

* हाताशी असलेल्या छोटयाशा रकमेतही आपण ती खरेदी करू शकता.

* तरीही-ही एक फलदायी योजना आहे - कारण या योजनेतील परत फेड आकर्षक आहे.

* उदाहरणार्थ–आज रु. ४१–०६ पैसे भरून कॅश सर्टिफिकेट विकत घ्या आणि १२० महिन्यानंतर चक्क १०० रुपये परत घ्या.

* निरनिराळया मुदतींची आणि रु. २५/– पासून रु. १,००,०००/– पर्यंतच्या दर्शनी किंमतीची कॅश सर्टिफिकेटस् आमच्या कोणत्याहीं शाखेत मिळतात.

– आपल्या नजिकच्या आमच्या शाखेस भेट द्या –

## बँक ऑफ महाराष्ट्र

मुख्य कचेरी– पुणे

बँकिंग सेवा + व्यक्तिगत जिव्हाळा

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

धर्मव्यवस्थेचे परिपालन निःपक्षपातबुद्धीने करण्यात जो राजा समर्थ असतो तोच धार्मिक होय. माता, पिता, भ्राता, भार्या, पुत्र अथवा पुरोहित हे स्वधर्माचा अतिक्रम करू लागले तर त्याना अलिप्त बुद्धीने दंडन करणारा राजा हा धार्मिक राजा होय ( महाभारत १२।१२१ ) . राजा कोणत्याही वर्णाचा असला तरी तो धार्मिक पाहिजे. ज्या राजाच्या राज्यात प्रजा भुकेलेल्या वृत्तिहीन असतात, जो राजा स्वेच्छेने व अन्यायाने दंडन करतो तो राजा लोकांच्या वधास पात्र किंवा योग्य ठरतो ( महाभारत ४२।९२ ) अहिंसा धर्माचे पालन करणारा आणि प्रजेकडून या धर्माचे पालन करविणारा राजाच राज्याचा स्वामी होण्यास पात्र ठरतो. या तत्त्वावर हिंदू धर्माची राजनीती अधिष्ठित आहे. परंतु भारतीय राजनीतीने जातिनिष्ठ समाजव्यवस्था जेव्हा पूर्ण मान्य केली राजनीति स्थितिशील व अविवेकी बनली तेव्हापासून भारतीय राजसंस्थाही दुर्बळ होत गेली; ही गोष्ट भारतीय राजसंस्थेच्या इतिहासाने सिद्ध केली आहे.

### भगवद्गीतेनंतरचा तंत्रमार्ग

धर्माचरण परमेश्वराच्या कृपेकरिता करायचे असते. धर्माचरण हीच पूजा होय; परमेश्वराला शरण जाऊन ती करायची असते. या पूजेने ऐहिक व पारलौकिक अभ्युदय होऊन ती निष्काम बुद्धीने केल्यास मोक्षप्राप्ती होते. पूजा दोन प्रकारची, बाह्य पूजा आणि मानसपूजा. मानसपूजा करीत असता परमेश्वराचे योगमार्गात सांगितलेल्या पद्धतीने ध्यान करून समाधी प्राप्त करून घ्यावयाची: आणि समाधी पूर्ण सिद्धी झाली म्हणजे परमेश्वराचा साक्षात्कार होतो, असे गीतेनंतर भारतभर प्रसृत झालेल्या विविध तंत्रमार्गाचे मुख्य स्वरूप आहे. वैष्णव भक्तिपर पांचरात्र, शिवभक्तिपर शैव तंत्र, शिवाची शक्ती जी देवी तिच्या पूजेचे शाक्त तंत्र हे तीन मुख्य तंत्रमार्ग होत. त्याबरोबरच दत्तात्रेय, गणेश, स्कंद, भैरव इत्यादिकांच्या पूजेचे तंत्रमार्ग भारतात पसरले. एका अर्थी हे सगळे तंत्रमार्ग शाक्त तंत्रातीलच मंत्र, मुद्रा, मंडलादी रेखाकृती, मूर्ती, मंदिर इ. साधनांनी देवतेची पूजा करतात. मूर्ती, मंदिर इ. ची रचना, पूजाविधान हे सर्व तंत्रमार्गीच असते. भजन, गायन, वादन इत्यादिकांचा यामध्ये अंतर्भाव होतो. तीर्थयात्रा, तीर्थश्राद्ध इत्यादिकांचाही तंत्रमार्गात समावेश होतो. व्रते, उपवास, भक्ष्याभक्ष्याचे नियम, दीक्षा, मंत्रजप, पुरश्चरण, स्तोत्रांचे व पवित्र ग्रंथांचे पठन, कथा वा कीर्तन या सर्व गोष्टींची परंपरा वेद, स्मृती, पुराणे इत्यादिकांकडून आली आहे; त्यांचाही अंतर्भाव तंत्रमार्गात होतो.

ज्ञानयोगाची परंपरा उपनिषदांपासून सुरू झाली. या ज्ञानयोगाचेच मुख्य तत्त्व म्हणजे आत्मानात्मविचार होय. या ज्ञानयोगाचे आणि समाधियोगाचे मीलन झालेले असते. अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य आणि अपरिग्रह ही महाव्रते किंवा सर्व नैतिक, उच्च नियम योगसाधनेत अंतर्भूत होतात. या ज्ञानमार्गातच भारताची वेदान्त, सांख्य, न्याय-वैशेषिक, जैन व बौद्ध ही दर्शने निर्माण झाली आहेत. त्याचप्रमाणे शैव-वैष्णवांची अद्वैतवादी प्रत्यभिज्ञादर्शन, विशिष्टाद्वैत, शुद्धाद्वैत, द्वैत, द्वैताद्वैत इत्यादी तत्त्वज्ञानेही निर्माण झाली, या सर्वांचा उद्देश भौतिक विश्व आणि भौतिक देह किंवा त्रिगुणात्मक प्रपंच यांपासून शुद्ध आत्मतत्त्व पृथक् कसे आहे, हे सिद्ध करणे हा आहे आणि सर्व कर्माचा व भक्तीचा अंतिम उद्देश आत्मतत्त्वांचा किंवा परमात्मतत्त्वाचा साक्षात्कार करून घेऊन मोक्षाची प्राप्ती करणे हा होय. हे सर्व हिंदू धर्माचे सार आहे.

रा. ना. चव्हाण

# गु. केवलानंद सरस्वती व धर्मनिर्णयमण्डळाचे कार्य

---

वाईची कीर्ती दिगंत पसरविण्याचे मूलभूत श्रेय स्वामी केवलानंद यांच्याकडे जाते. स्वामींचे सर्व जीवनच धर्मकार्याला समर्पित होते. गुरु, समाज सुधारक, धर्मकोश कार्याचे संस्थापक म्हणून ते अजरामर आहेत. स्वामींना एकाचढीत एक शिष्य प्राप्त झाले. तर्कतीर्थ हे तर कळसच होत. ब्रह्मीभूत प्रज्ञानंद सरस्वती स्वामी हे नारायणशास्त्री मराठे याचे गुरु, प्राज्ञपाठशाळा ही प्रज्ञानंदांचे कार्यकर्ते असे जिवंत स्मारक ठरते. सतत चालू असलेला सरस्वती उत्सव नारायणशास्त्री (केवलानंद) ह्यानीच चालू केला. सात्विकता, अध्यापन व अध्ययन लालसा वगैरे अनेक दैवी गुण स्वामींच्या ठायी होते. वसतिगृह चालविणे हे कार्य अत्यंत जिकीरीचे असते, पण अनेक वर्षे प्राज्ञपाठशाळेचे विद्यार्थीगृह स्वामींनी चालविले. म्हणूनच नामवंत शिष्यांची परंपरा निर्मित झाली; छात्रवर्ग आजन्म ऋणी झाला.

प्राज्ञपाठशाळा ही १८६० नं. २१ च्या कायद्याप्रमाणे सन १९२० साली नोंदली गेलेली वाईतील पहिली महत्त्वाची संस्था होय. वैदिकधर्म व भारतीय संस्कृती, व एकूण संस्कृत विद्या यांच्या अध्यापनाची व अध्ययनाची स्वामीनी वाईत सोय केली. ही प्रा. पा. शाळा अखिल भारतात प्रसिद्ध होती व सर्वत्र ख्यातमान आहे. प्राचीन ज्ञान व वर्तमान परिस्थिती यांचा समन्वय करण्यात आला. वृद्धावस्थेतही मीमांसाकोषाचे कार्य स्वामीजीनी चालविले. स्वामी पंडित, ऋषी तसे पूर्वीपासूनचे कर्मवीर होते. पूर्वी विद्यावंतांची घरे वाईत होती; व ते खाजगीप्रकारे विद्यादान करीत होते. नारायणशास्त्री यांनी ह्या सर्व पूर्वपरंपरेला संस्थेचे घटनात्मक स्वरूप दिले आहे. नवीन कालानुसार असे करणे फारच जरूरीचे होते; जे करावयास पाहिजे तेच केले.

स्वामी फार पूर्वीपासून पूर्वेस कृष्णाकाठी असलेल्या भद्रेश्वराच्या दर्शनार्थ जात, उंच बांध्याचे बळकट शरीराचे, शुभ्र वस्त्र नेसलेले, तेजस्वी असे नारायणशास्त्री, गुजरआळीतून पुढे भद्रेश्वराकडे जात असताना मी विद्यार्थीदशेत वारंवार पाही. भद्रेश्वराच्या दर्शनासाठी ते येत जात असल्यामुळे वाईच्या पूर्वभागाला ते ज्ञात होत, व दर्शनही होई. ह्यामुळे मनावर ठसा उमटला, तो कायम आहे. अजूनही मन त्यांच्याकडे ओढते आहे.

स्वामींचे वाईवर केवढे मोठे उपकार आहेत. वाई ही अपरिवर्तनवादाचा पुरस्कार करण्यात अग्रेसर होती. सातारचे शेवटचे छत्रपती प्रतापसिंह यानी वेदोक्ताचा हट्ट धरला. ह्या प्रकरणात छत्रपती व मराठे यांना वेदोक्त हक्क नसावेत, अशी सनातनी भूमिका वाईकरांनी धरिली. ह्यामुळे सामाजिक व राजकीय दुष्परिणाम झाले सन १९४८ सालापासून केवलानंद यानी धर्मसुधारणेकडे जास्ती लक्ष पुरविले. त्यांच्या दर्शनार्थ मी ह्या साली मुद्दाम गेलो. म. गांधी यांच्या वधोत्तरानंतर जो उद्रेक येथे व इतरत्र झाला, त्याचे कारण समजावे, अशी स्वामीनी इच्छा व्यक्त केली. स्वामी म्हणाले की– तसा जगाचा व त्यांचा हल्ली संन्यासावस्थेत फारच कमी संबंध येत असे. उद्रेकाचे ठराविक कारण सांगणे सोपे नव्हते. लोकहितवादींच्याकडे पाठ झाली, म्हणून उद्रेक झाला, असे कारण सुचले व मी त्याना सांगितले. स्तब्ध व चिंतामग्न अवस्थेत त्यानी हे कारण ऐकिले. त्यांचाही शोध मनातून चालला असावा. धर्माच्या बाबतीत उदारता व कालमानस्वरूपाप्रमाणे शास्त्राधारे परिवर्तन, ही जी कामे त्यानी अगोवरच हाती घेतली होती, त्यांच्याकडे ते अधिकाधिक लक्ष केंद्रित करू लागले.






परिवर्तनवादाचा आविष्कार व प्रगटीकरण हा स्वामींच्या उत्तर आयुष्याचा कळस होय. धर्मसुधारणेच्या इतिहासात स्वामींचे कार्य महत्त्वाचे व चिंत्य आहे.

आज काळ फारच पालटला आहे. पूर्वी वाईत अनेक वादविवाद होत. ग्रामण्ये व बहिष्काराचे शस्त्र चालविले जाई. ऋग्वेदी व आपस्तंब ह्यांच्या दरम्यान वाईत मोठा वाद झाला. नारायणशास्त्री मराठे यानी हा शुष्क वाद मिटविण्याचा प्रयत्न केला. नारायणशास्त्री समकालीनापेक्षा विचाराने पुढे असत. असे होते तरी स्थानिक शिष्टाना घेऊन त्यानी प्राज्ञपाठशाळेचे संवर्धन केले. ममत्व व बंधुत्व निर्माण करणारे छात्रालय नारायणशास्त्री यानी वाईत कैक वर्षे चालविले. धर्मकोशाचे कार्य १९२५ सालापासून पुढे चालू झाले.

प्राज्ञपाठशाळा ही धर्मकार्याप्रमाणे राष्ट्रीय चळवळीचा बालेकिल्ला झाला. व प्रत्यक्ष सन १९४७ पासून भारत स्वतंत्र झालेलाही स्वामीजीनी उत्तर आयुष्यात पाहिला. म्हणूनही ते भाग्यवान ठरले.

पंडित परिषदा, ब्राह्मण–परिषदा, व हिंदुधर्म–परिषदा यांची अनेक अधिवेशने झाली, त्याचे वैचारिक नेतृत्व स्वामींनीच केले. वाई हेच केवळ स्वामींचे कार्यक्षेत्र नव्हते, तर सर्व महाराष्ट्र किंबहुना भारत ह्यावर स्वामींच्या धर्मसुधारणावादी कार्याचा परिणाम घडला.

सोनगीर येथील परिषद अत्यंत गाजली. पंडितात दोन पक्ष होते. पं. लक्ष्मणशास्त्री द्रविड, राजेश्वरशास्त्री द्रविड, अनंतकृष्णशास्त्री वगैरेंचा पक्ष स्मृत्युक्त धर्मशास्त्रात व चालू रूढीत कसलाही फेरबदल करू नये, असा सनातनी विचाराआचारांचा होता. कै. श्री. भाऊशास्त्री लेले ( सं. 'धर्म' वाई ) हे पूर्वी ह्याच पक्षाचे अध्वर्यू होते. यांचा नारायणशास्त्रीना विरोध असे. नारायणशास्त्री अगोदरपासूनच परिवर्तनवादाचे पुरस्कर्ते होते. त्यानी परिवर्तनवादी शास्त्रीपंडितांची संघटणा बांधली. देशकाल वेगवेगळ्या युगात धर्माचे स्वरूप बदलते, मूलभूत शाश्वत तत्त्वे कायम असतात, तरी त्यांचे नवे नवे संशोधन करावे लागते. नवा प्रकाश मांडावा लागतो. नेमके स्वामीनी हेच केले. वेद हे मनुष्यकृत व पौरुषेय आहेत. हे क्रांतिकारी मत स्वामी केवलानंदानी धाडसाने मांडिले. कोणत्याही धर्मसुधारकाचा छळ जगात होतो, तसा स्वामींचाही झाला. परिवर्तनवाद सिद्ध होण्यासाठी स्वामीनी जरूर ती सर्व किंमत दिली. क्षत्रियांचे अस्तित्व परिवर्तनवादी परिषदेने मान्य केले. नाहक पूर्वी माजलेले शुष्क सामाजिक वाद संपविले. अपरिवर्तनपक्ष नामोहरम ठरला. सन १९३३ साली म. गांधी यांनी येरवडा जेलमध्ये, अस्पृश्यता निवारणाच्या चळवळीवर विचारविनिमयार्थ उभयपक्षाचे पंडित बोलाविले. स्वामी केवलानंद यानी अस्पृश्यता निवारकांचा पक्ष घेतला व म. गांधींच्या ह्या कार्यास पुष्टी दिली. अखिल भारतीय अस्पृश्यतेचा प्रश्न स्वातंत्र्य आल्यानंतर पुढे तीव्र झाला आहे. म्हणूनही अस्पृश्योद्धाराचे स्वामीजींचे कार्य जनतेपुढे ठेवावे लागते. ह्या कार्यात व ह्या विचारात तर्कतीर्थांनी सक्रिय भर घातली आहे. अकोला येथे सन १९२७ साली भरलेल्या परिषदेत सर्वांना वेदाधिकार, अस्पृश्यता निवारण इ. पुरोगामी धर्मनिर्णय झाले. पंडित लक्ष्मणशास्त्री जोशी उपस्थित होतेच. त्यानी परिवर्तनवादी कार्यास महत्त्वाचा सतत हातभार लाविला. व वाईतच कायमचे वास्तव्य करून पूज्य नारायणशास्त्री मराठे यांच्या प्राज्ञपाठशाळेची सतत धुरा वाहिली आहे. एकादी चांगली संस्था बद्धमूल होऊन नांवारूपास येण्यास एक दोन पिढ्यांचे श्रम जरूर असतात.

गुरुवर्य नारायणशास्त्रीनी स. १९३१ साली संन्यास घेतला. तरी धर्मनिर्णय मंडळाचे कार्य पूर्वीपेक्षा जोमाने केले. संन्यास घेतल्यावरही ते भद्रेश्वरी येत. कृष्णेत हात पाय धुवून शंकराचे दर्शन घेतल्यावर, मग प्रदक्षणा घालीत. कळसाचे दर्शन शांत व गंभीरपणे घेताना, कधीं कधी त्यांच्यामागे उभा राहून मी स्तब्ध होई. मुनि अवस्थेतील त्यांचे जीवन ब्राह्मीभाव प्राप्त होईपर्यंत वाई क्षेत्रातच गेले. भद्रेश्वरी दर्शन झाल्यावर थोडा वेळ बसत, नंतर जात. फार अल्पवाक् होते. सतत कार्यावर भर देत. स्वामी ब्रह्मवादी होते, परंतु त्यानी नवा प्रकाश दिला. पुढे महर्षि शिंदे यांचा वाईशी १९३३ पासून संबंध आला. तरी स्वामीना त्यानी येरवड्यास व पूर्वीही पाहिले होते. परिवर्तनवादी–धर्मसुधारक केवलानंद ह्याना शिंदे जाणत असत. गुणवान गुणवानांना

ओळखतातच. अस्पृश्यता निवारक शिंदे यांना प्राज्ञपाठशाळेत चाललेले अस्पृश्योद्धाराचे कार्य पाहून आनंदच वाटला. राजगोपाळाचारी यांची कन्या व म. गांधी यांचा मुलगा यांच्या मिश्रविवाहाला पाठिंबा देऊन तर्कतीर्थांनी ह्या विवाहात पौरोहित्य केले. हे क्रांतिकार्य ठरते ; खळबळ उडाली ! सनातन्यांचा प्रक्षोभ तर्कतीर्थांच्या वाट्याला आला. पूर्वी लो. टिळक १९२० साली वाईत आले होते. नारायणशास्त्री यांनी त्यांचा सत्कार केला. टिळकांच्या प्रवृत्तीपर कर्मयोगी अर्थाला ( गीतारहस्याला ) नारायणशास्त्री यानी पाठिंबाच दिला.

स्वामी केवलानंदाना एकदा मी विचारले की– ब्राह्मसमाजाच्या धर्मसुधारणेत काय चूक आहे. स्वामींचे अध्ययन प्रायः प्राचीन शास्त्राचे होते. सनातनी पंडितानी ब्राह्मसमाजासंबंधी उलटच जास्ती लिहिले आहे. स्वामींचा आधुनिक सामाजिक सुधारणांच्या चळवळींचा अभ्यास सखोल होता. म्हणूनच सामाजिक व धार्मिक सुधारणांना शास्त्राधारे व ऐतिहासिक पद्धतीने पाठिंबा देणारे धर्मनिर्णय मंडळ त्यानी स्थापिले. आर्यसमाजाच्या पद्धतीत शब्दार्थाची ओढाताण होई. ह्या सर्व पूर्व दोषांची निवृत्ती करून स्वामीजीनी त्यांचे परिवर्तनवादी सिद्धांत पूर्व शास्त्राधारेच मांडिले. इंग्रजी झाल्यावर धर्मसुधारणांचे प्रबोधन झाले. पण जेत्यांच्या धर्मास मिळता जुळता धर्म बनविण्याची अटळ प्रवृत्ती त्या काळात दिसली. स्वामीनी हे सर्व कल सावरले. क्षेपणारा असा मध्यम –मार्ग काढला. मात्र कोणाचेच छिद्रान्वेषण मुळीच केले नाही. ब्राह्मसमाजात चूक नाही. असे स्वामी म्हणाले ; व त्यानी मी डॉ. भाण्डारकर यानी तयार केलेल्या विवाहविधीचा संक्षेप करून एक पुस्तिका तयार करून छापली. ती वाचून मला त्यानी शुद्धाशुद्ध दर्शविले. धर्मसुधारणेसंबंधीची त्यांची असामान्य आस्था मी अनुभवली. तर्कतीर्थानी तर राममोहन, फुले, रानडे–भाण्डारकर–मोडक वगैरे धर्मसुधारकांच्या कार्याचे नव्याने मूल्यमापन केले ; व त्यांची उपेक्षा थांबविली. पूर्वी समाजसुधारकांवर फार अन्याय झाले, त्यांना नव्याने न्याय देण्यात आला. ह्या गुरुशिष्यांचे कार्य एकमेकास पूरक आहे. केवलानंदांनी घालून दिलेल्या पायावर तर्कतीर्थ जोशी यानी नवी इमारत उभारली. केवलानंदानी पालटलेल्या काळाचा नवा अर्थ सन १९२७ च्या पूर्वीच ओळखला, व उत्तरोत्तर स्पष्ट केला.

केवलानंदानी प्राज्ञपाठशाळेच्या स्वयंपाकघरात अस्पृश्य मानिलेल्यास नेले. हिंदुमधील सर्व जाती धार्मिक व सामाजिक दृष्ट्या समान आहेत, विधवावपनबंदीला मान्यता दिली. हिंदुमध्ये सांस्कृतिक साम्य निर्माण व्हावे, ह्यासाठी नव्याने आचारधर्माची मांडणी केली, व सुधारणावाद उचलून धरिला. ग्रंथांचे सर्वप्रामाण्य दूर करून, बुद्धीची व तर्काची प्रतिष्ठा नव्याने प्रसृत केली. महाराष्ट्राच्या सामाजिक क्रांतीचा द्रष्टा, अध्वर्यू, असा हा आधुनिक काळी असामान्य ऋषी होऊन गेला. तत्त्वनिष्ठ परिवर्तनवादी परिषदेने व धर्मनिर्णय मंडळाने नवे समाजप्रबोधन घडवून आणिले. पूर्वी समाजसुधारक सामाजिक परिषदेच्याद्वारे धर्म व समाज ह्यासंबंधी प्रतिवर्षी विचार करून निर्णय घेत. पण जहाल परंतु परंपरावादी मंडळींच्या विरोधामुळे वरील परिषद खण्डीत झाली. ह्या काळात परंपरावादी म्हणजे अपरिवर्तनवादी लोक व पण्डित देखील, समाजसुधारक हे परप्रत्ययनेय आहेत, पाश्चात्यधर्म व सत्ता यांचा अनुनय करणारे आहेत, असे अनेक आरोप समाजसुधारकांवर करून, सुधारणावादाचा नवा प्रवाह थोपविण्याचा विशेष यत्न करीत. सुधारकांच्यापेक्षा सनातन्यांची शक्ती व संख्या मोठी होती. केवलानंदानी शास्त्राधारेच नवीन सुधारणा कालप्राप्त आहेत, असे घोषित केले. सनातन्यांच्याच घरी असे फार मोठे खिंडार पडल्यामुळे कालांतराने सनातनी हा शब्द देखील ऐकू येईनासा झाला. समाज सुधारणेच्या ऐवजी समाजपरिवर्तनवादी ही परिभाषा योजिली. आजही 'परिवर्तन' हा शब्द जास्तीपणे वापरला जातो. समाजसुधारणेचा रथ रोखिला जात असे, ह्या रथाची स्वामीनी वाट मोकळी केली. समाजसुधारकांना व धर्मसुधारकाना जय प्राप्त करून दिला; व त्यांच्या इच्छेचे पांग फेडले. चालू पिढीला विरोध राहिला नाही. धर्ममंडळाची चळवळ धर्मविचार निद्रिस्थ नाही, हे दाखविते.

आद्य शंकराचार्यानंतर धर्मनिर्णयाचे अधिकार पीठांच्याकडे गेले; ह्यामुळे धर्मसंकोच झाला. डॉ. कुर्तकोटी सोडल्यास बहुतेक सर्व शंकराचार्य पीठा-



अनुक्रमणिका

धिपती अपरिवर्तनवादी होते हे जाणून धर्मनिर्णयाचे अधिकार केवलानंद स्वामींनी शिष्ट व सूज्ञ अशा देशकाल वर्तमान जाणणाऱ्या पंडितांच्याकडे घेतले. आणि लोकशाहीपद्धतीची त्यांची तत्त्वनिष्ठ परिषद निर्माण केली. ही क्रांतीच म्हटली पाहिजे. या परिषदेने चर्चेतून निर्णय घेतले. निर्णय थोडक्यात व सूत्रबद्ध व रेखीव वाटतात.

मागे चहाग्रामण्य प्रकरणी रानडे–टिळकांच्या सारख्या सूज्ञानाही अपरिवर्तनवाद्यांच्याकडून फार त्रास झाला. लोकहितवादींचाही छळ झाला. सम्मतिवयाच्या चळवळीत डॉ. भाण्डारकर यांच्यासारख्या संस्कृत महापंडिताची अवहेलना झाली. केवलानंद सरस्वती स्वामींनी सर्वच हा इतिहास बदलून टाकला. पूर्वीच्या शास्त्राधारेच ह्या वरील सुधारणा धर्म्य ठरविल्या.

म्हणून धर्मनिर्णय मंडळाचे स्वरूप व कार्य सर्व सामाजिक कार्यकर्त्यांनी अभ्यासण्याजोगे खास आहे. दलित प्रश्नावर विवेक करणारांनी ह्या परिवर्तनवादाचे चिंतन जरूर करावे.

## तत्त्वनिष्ठ परिवर्तनवादी परिषदेच्या पूर्वी

भारताच्या धर्मेतिहासात कालानुरूप परिवर्तने होत आली आहेत, याची साक्ष पटते. शाश्वत धर्म हा कायमच राहतो. व आचाराविचारात फरक पडत असतो. किंवा फरक करणे अटळ होते. असा अनुभवही येतो, ह्या अनुभवाकडे दीर्घ काळ दुर्लक्षच झाले.

भारताचा पिंड हा धार्मिक व आध्यात्मिक आहे. म्हणून समाजप्रबोधने जी आजवर झाली, ती प्रायः धर्मसुधारणापर होती. येथील समाज व धर्म वेगळा करता येत नाही. धर्मसुधारल्याशिवाय सामाजिक सुधारणा अशक्य आहेत, असा आजवरचा अनुभव आहे. म्हणून येथील सामाजिक सुधारकांचे स्वरूप प्रायः धर्मसुधारकांच्या सारखे असते. धर्मपरिवर्तनाची गरज वारंवार मागे भासली, व वर्तमान आणि भविष्य काळातही ती भासेल. कारण धर्माला ग्लानी येते. ही ग्लानी दूर करण्याचे तत्वनिष्ठकार्य स्वामी केवलानंद सरस्वती यानी धर्मनिर्णय मंडळाच्याद्वारे केले. पण त्यांच्या अगोदर कोणती परिस्थिती होती ? धर्मसुधारणांचे स्वरूप कोणते होते ?

भारतावर आजवर पुष्कळ आक्रमणे आली, त्यात मुसलमानांचे व ख्रिस्त्यांचे आक्रमण फार मोठे ठरते. ही आक्रमणे फक्त राजकीयच नव्हती तर ती सांस्कृतिक देखील होती येथील धर्म नाहीसा करण्याचा त्यांचा इरादा होता. वरीलपैकी पहिले आक्रमण पुष्कळच पाशवी होते, असे म्हणावे लागते. परंतु ख्रिस्ती मिशनऱ्यांचे आक्रमण किंवा कार्य हे बरेच बुद्धीतून व समाजकल्याणात्मक उपक्रमातून चाले; नवी इंग्रजी विद्या शिकणाऱ्या पहिल्या पिढीवर बायबलाचा पुष्कळच परिणाम झाला. साहजिकपणे हिंदुधर्म व ख्रिस्तीधर्म यांची तुलना होऊ लागली. पाश्चात्य व्यासंगी विद्वान ख्रिस्तीधर्माचे श्रेष्ठत्व सांगण्यासाठी देखील वेदादी संस्कृत ग्रंथांचे अध्ययन करू लागले; व हेच ग्रंथ अव्वल इंग्रजीतील पहिल्या पिढीला जास्तीकरून उपलब्ध असत. कॉलेजेस व हायस्कुलामधूनही प्रथम प्रथम पाश्चात्य प्राचार्य व अध्यापक असत. अशाप्रकारचा परावलंबनाचा हा काळ होता. मिशनरी हिंदुधर्म व हिंदुसमाज यांच्या व्यंगावरच ज्यास्ती बोट ठेवीत. पण ह्यामुळे देशी विवेकवंत जागे झाले. ही इष्टापत्ती मानावी लागते.

मुसलमानी आक्रमणाच्या काळात वरीलसारखी बौद्धिक जाग आली नव्हती. हा काळ मध्ययुगाचा होता. अर्वाचीन वरील काळात नव्या शिक्षणात विज्ञानांचा व भूगोलांचा समावेश झाला. सर्व जगाची माहिती झाली. व जेते जे इंग्रज त्यांच्या व एकूण युरोपियनांच्या इतिहासाची नवी जाणीव झाली; व आत्मपरीक्षणाच्या द्वारे परवशतेची कारणे शोधिली जाऊ लागली; व गेलेले स्वातंत्र्य पुनः मिळविण्यासाठी समाजातील दोष नाहीसे केले पाहिजेत; असे सर्व हिंदी लोकांना वाटू लागले. येथे प्रबोधने आक्रमण झाल्यावर होतात.

मुसलमानांचे आक्रमण थोपविण्याचे कार्य संतांनी केले. संत हे मर्यादित अर्थाने का होईना धर्मपरिवर्तनवादी होते. त्यांच्यात समन्वय व धर्मसुधारणा यांची बीजे दिसतात. परंतु संतांना संस्कृत पारखे होते. साधुसंत झाले नसते तर यावनी आक्रमणाला सर्व वाटा मोकळ्या झाल्या असत्या व अव्वल इंग्रजी आल्यावर जे नवे प्रबोधन घडले त्यालाही पाया मिळाला नसता. मर्यादित अर्थाने म्हणजे संतांचा

अनुक्रमणिका

काळ विचारात घेऊन संतांना परिवर्तनवादी व तत्त्वनिष्ठ म्हणावेसे वाटते. संतांचे परिवर्तन फारसे सामाजिक नव्हते तर ते ज्यास्ती करून पारमार्थिक व अध्यात्मिक समतेचे होते. यापूर्वी जैनबुद्धांनी वेगळाच धर्म स्थापून परिवर्तनाचा स्वतंत्र मार्ग धरिला. संतांनी स्वधर्म व प्राचीन परंपरा यामध्येच राहून मर्यादित अर्थाने धर्मपरिवर्तन केले. त्यांच्या काळात सामाजिक सुधारणेची व समाजरचनेच्या बदलाची गरज फार कमीच भासली. तरी त्यांनी जन्मजातीला व वर्णभेदांना गौण मानिले. 'यारे यारे लहान थोर। भलत्या याती नारी नर ॥ असे आव्हान संतांनी केले. प्रत्येक काळात परंपरावादी व परिवर्तनवादी यांचा झगडा जुंपतो. संतांनाही धर्म-मार्तंडाना तोण्ड द्यावे लागले. तुकाराम व एकनाथ यांची चरित्रे ही ग्वाही देतात. तरी 'एकमेका साह्य करू। अवघे धरू सुपंथ ॥' ह्या न्यायाने सर्वसामान्य जनतेची आध्यात्मिक भूक संतांनी भागविली. नाहीतर ही जनता धर्मांतरित झाली असती. संतांनी कित्येक निवाडे केले आहेत. धर्मनिर्णय दिले आहेत. धर्मा-धर्माचा विचार मांडला आहे. नव्या व्याख्या केल्या आहेत. या सर्वावरून, असे म्हणता येते की-प्रत्येक काळात परिवर्तनाचे कार्य चालू होते व करावे लागते. केवलानंदांचा प्रयत्न शास्त्रीय, स्वतंत्र, स्वावलंबी व अपूर्व वाटतो. त्यानी साधुसंतांप्रमाणे भजनीवारकरी पंथ दाखविला नाही. ईश्वरालाही 'मध्यस्थ' करणे हे स्वामीना अभिप्रेत नव्हते.

## आधुनिक समाजप्रबोधन

यज्ञीय हिंसा बंद करण्यासाठी जैन-बौद्धांचे परिवर्तन अवतरले. ह्या हिंसेने धर्मग्लानी आणली होती; यज्ञीय हिंसा मागे पडली, ह्या अर्थाने जैन-बुद्ध विजयी झाले, असे म्हणावेसे वाटते. साधु-संतांच्या भागवत धर्मावर जैनबुद्धांचा परिणाम आढळतो. अहिंसेचा पुरस्कार करून संतानी यज्ञयाग व इतर कर्मकांड गौणच ठरविले. जैन व बौद्धांचे स्वतंत्र धर्म झाले तरी हे प्रयत्न मूलतः धर्मशुद्धीचे व धर्मसुधारणांचे होते. उपनिषदे व गीता यांनीही यज्ञीय हिंसा व सकाम कर्मकाण्डे निषेधार्य मानिली. जैन व बुद्धांचे त्यांच्या त्यांच्या सुरवातीचे प्रयत्न देखील धर्मपरिवर्तनवादी म्हणावे लागतात. कारण ह्यांच्या काळात परकीयांची आक्रमणे नव्हती. हे स्वधर्म सुधारणांचे प्रयत्न होते. महावीर व बुद्ध हे फार मोठे धर्मसुधारक झाले व आजही हे दोन पुरुषोत्तम जागतिक कीर्तीचे आहेत. ही सर्व प्राचीन समाज प्रबोधनेच होत. धर्माला ग्लानी आली म्हणजे धर्म व समाज प्रबोधनाची नवी नवी गरज त्या काळानुसार भासली व भासते. अव्वल इंग्रजी सर्व देशभर झाल्यावर समाजप्रबोधनाची उत्कट गरज भासली; व राजा राममोहन राय यांच्याद्वारे आधुनिक समाजपरिवर्तन साकार झाले. ह्या परिवर्तनाला आधुनिक समाजप्रबोधन म्हटले जाते. हे सर्वांगीण होते. कारण ह्यातूनच राष्ट्रीय सभेचा राजकीय जन्म पुढे झाला हिंदी लोकांच्या काही हक्कांची व गरजांची मागणी करण्यास राम-मोहन यांनी सुरुवात केली होती. मुद्रणस्वातंत्र्य व विचारस्वातंत्र्य यांचा त्यानी हिरीरीने पुरस्कार केला. ह्याही प्रबोधनाचे स्वरूप धर्मपर होते. सती-बंदीचा कायदा करून घेणे, म्हणजे एक परिवर्तनच होते. स्त्रीशिक्षण, पुनर्विवाह इत्यादी धर्मसुधार-णांची मागणी नंतर चालू झाली. याकाळी ब्राह्मो-समाज व प्रार्थनासमाज वेगळे निघाले. स्वामी केवलानंदानी पूर्वपरंपरेतीलच ऐतिहासिक परिवर्तन-वाद सिद्ध केला.

## शास्त्राधार

समाजसुधारणांना व धर्मसुधारणांना शास्त्राधार दाखविण्याची पद्धत वरील सामाजिक प्रबोधनात देखील अंशतः होती. ईश्वरचंद्र विद्यासागर, यानी पुनर्विवाहाला पूर्वसंस्कृत ग्रंथातील पुरावे दाखविले. राममोहन राय हे तर वेदांतवादी होते. ब्रह्मवादी होतेच. मायावाद, कर्मविपाक व परंपरेत शिर-लेला निवृत्ति-संन्यासवाद हा त्यानी वगळला. प्रवृत्तिवादाचे त्यानी मंडण केले म्हणजे कर्मयोगाला महत्त्व दिले. विवेकानंदानी देखील त्यांच्याच दृष्टीत भर घातली. प्राचीनयुग व अर्वाचीनकाळ यांचा संगम करण्याची नवी पद्धत चालू झाली. ह्या मुळे देशाची अस्मिता टिकली. धर्मांतर न करता धर्म शुद्ध करण्याची पद्धत ब्राह्मोसमाज, आर्यसमाज वगैरे तत्सम नवयुग समाजांनी चालू केली. मागे संतांनी स्वदेशीधर्म टिकविला, त्याचप्रमाणे आर्य-समाजासह वरील नवसमाजानी नवी धर्मधारणा करून मिशनऱ्यांच्या ख्रिस्ती धर्मप्रसाराला खीळ

घातली. ह्या सर्व धर्मसुधारकांपुढे प्रायः हिंदूसमाज व हिंदुधर्मच होता. रानडे-भांडारकर यांनीही नव्या समाजसुधारणांना शास्त्राधार दाखविले. त्याकाळी लोकांची समजूत घालण्यास, असे करणे जरूर होते. सामाजिक सुधारणांना अखिल भारतीय व प्रांतिक म्हणजे स्थानिक इतिहास आहे. महाराष्ट्राचा हा इतिहास पाहिल्यास दादोबा पांडुरंग, महात्मा फुले, लोकहितवादी, आगरकर, भाऊ दाजी, जगन्नाथ शंकरशेट, बाळशास्त्री जांभेकर वगैरे वगैरे मोठमोठे सुधारक झाले. त्यांच्यावेळी कार्यकर्त्यांत निष्ठा व धडाडी होती. विविध समाजसुधारकांत समाजधारणेसंबंधी एकमत होते. महर्षि शिंदे व डॉ. आंबेडकर हे दोघे समाजसुधारक धर्मसुधारकच ठरतात. डॉ. आंबेडकर यांनी शूद्र कोण होते ? ह्या इंग्रजी पुस्तकात शूद्र मूळचे क्षत्रिय होते, हा सिद्धांत सिद्ध करण्यास मागील पौराणिक व इतर संस्कृत ग्रंथाचे आधार व पुरावे घेतलेच. म. गांधी यानाही अस्पृश्यता निवारणाला शास्त्राधार पाहिजे होते. तत्त्वनिष्ठ धर्मपरिवर्तनवादी पंडितांनी आधार दाखविले. वर्तमान व भविष्य काळ यांचे नाते भूतकाळाशी अतुट असू शकते. हे तत्त्वनिष्ठ परिवर्तनवादी परिषदांनी सिद्ध केले, ही परिषद व ह्यातून निर्मित झालेले धर्मनिर्णयमंडळ ह्या कार्यांत केवलानंदांचा सिंहाचा वाटा होता. धर्मनिर्णयमंडळाच्या चौदा प्रस्थापक सदस्यांच्या मालिकेत केवलानंदांचे आद्य स्थान होते. मुख्य प्रेरक, स्फूर्तिदाते व मार्गदर्शक केवलानंदच होते. धर्मात सुधारणा करावयाची झाल्यास, आतापर्यंत पूर्वी अनेकांनी स्वतंत्र धर्म स्थापिले, अलीकडील काळात नवीन समाज निर्माण केले. पण धर्मनिर्णय मंडळ हा नवा धर्मपंथ नाही किंवा उपासनामार्गही नाही. अथवा स्वतंत्र नवा धर्मही नव्हे.

### धर्मनिर्णय मंडळाची पूर्वपीठिका

धर्मसुधारणा व धर्मजागृती ही दोन कार्ये सन १९३४ पासून धर्ममंडळाने चालू केली. उपेक्षा, उपहास व विरोध यांचे तडाखे सोसावे लागले. सामाजिक प्रकारे पाहाता ह्या काळात पंडितांमध्ये दोन वर्ग होते. पुष्कळसे पंडित परंपरावादी म्हणजे सनातनी होते. परिवर्तनवादी पक्षाकडील पंडितांची संख्या कमी होती, पण परिवर्तनवादी पंडित निवडक होते. कै. पं. रघुनाथशास्त्री कोकजे यांचे नाव अवश्य नमूद करावे लागते. त्यानी आमरण धर्मनिर्णय मंडळाचे कार्य चालविले. सन १९३४ ते १९३७ अखेर पर्यंत तत्वनिष्ठ-परिवर्तन-वादी परिषद असे नांव होते. धर्मनिर्णय मण्डळ हे नंतर घेतलेले समर्पक नाव-ध्येय व उद्देश सूचित करिते, म्हणून ते कायम झाले आहे. मंडळाचा सुरुवातीचा काळ पाहाता, त्या काळात म. गांधींचे सत्याग्रही लढे पुढे चालू होते. राऊंड टेबल परिषदेचाही काळ होता. डॉ. आंबेडकरानी वेगळ्या मतदार संघाचा आग्रह धरिला होता. म. गांधी यानी यासाठी आमरण उपवास आरंभिला. डॉ. आंबेडकरानी आग्रह मागे घेतला, तरी धर्मांतर करणार, व हिंदु म्हणून मरणार नाही, अशी घोषणा आरंभिली. म. गांधी यांचा 'हरीजन सेवक संघ' व 'हरीजन' पत्र चालू होते. धर्मनिर्णय मंडळाच्या सुरुवातीचा काळ असा सामाजिक, धार्मिक व अस्पृश्योद्धारक चळवळीचा होता. अशा समयी धर्माधर्म सांगण्यासाठी विद्वान व पंडित जबाबदार मंडळी एकत्र येणे व आणणे साहजिक होते. पुढे सन १९५६ साली डॉ. आंबेडकर यांनी बौद्धधर्माचे पुनरुज्जीवन केले. ह्याही संबंधात धर्मनिर्णय मंडळाला त्याचे मत प्रकट करावे लागले. धर्मांतर हा शब्द मंडळाला मान्य नव्हता. पहिला मोठा धर्मसुधारक बुद्ध हा भारतीयच होता. त्याची मातृभू, पितृभू, पुण्यभू हिंदूस्थानच.

ख्रिस्तीधर्मांतराचा प्रश्न तेव्हाही होता व आजही आहे. धर्मांतर नोंदणीचा कायदा व्हावा असा धर्मनिर्णय मंडळाच्या दहाव्या अधिवेशनात ठराव पास झाला. अजूनही हा कायदा प्रसार व्हावयाचा राहिला आहे. हा केव्हा होणार? डॉ. भवानी शंकर नियोगी यांच्या नेतृत्वाखाली मागेच एक समिति नेमली होती.

### मंडळाची वाटचाल

" हिंदुधर्मात बरीच व्यंगे आहेत म्हणून यहुदी, महंमदी, ख्रिस्ती किंवा अशाच प्रकारच्या दुसऱ्या एखाद्या धर्माचा अंगिकार करणाऱ्या मनुष्यास विचारी ही संज्ञा देता येणार नाही... ज्या देशात आपले शेंकडो पूर्वज जन्मास आले, वाढले व मरण पावले, ज्या देशातील हजारों पिढ्यानी अनेक गोष्टीत मोठ्या कष्टानें केलेल्या अनेक सुधारणांचे फळ आपणास आयतेच प्राप्त झाले, अशा देशातील

अनुक्रमणिका

धर्माचा, रीतिरिवाजांचा व लोकांचा सर्वथैव त्याग करणाऱ्या मनुष्यास खऱ्या सुधारकाची पदवी कधीही शोभणार नाही... याच्या उलट जे वर्तन करतात ते सुधारणा करीत नाहीत तर फक्त शृंखलांतर करतात ! " आगरकरांच्या ह्या आदेशाप्रमाणे धर्मशुद्धीचे व धर्मसुधारणेचे कार्य धर्ममंडळाने सतत केले. सन १९५९ साली पुण्यास वाजपेय यज्ञ झाला. यज्ञातील पशुहिंसा धर्ममंडळाने त्याज्य ठरविली. वायुपुराण अध्याय ५७ मधील पुरावा दिला :–

**नायं धर्मो ह्यधर्मोऽयं न हिंसा धर्म उच्यते ॥**

ब्राह्मोसमाजी व आर्यसमाजी लोकगणनेत 'हिंदु' म्हणून न नोंदता, त्यांच्या समाजाचे नांव नोंदवीत. परंतु स्वामींचे प्रयत्न हिंदूधर्मात राहूनच झाले.

## महत्त्वाचे निर्णय

राममोहन ते गांधी यांच्या अखेरपर्यंत झालेले धर्मसुधारणेचे प्रयत्न सर्व धर्मसमन्वयातून झाले. सर्वधर्मांतर्गत धर्म व सर्वधर्मरहस्य व सर्वधर्मसमभाव यांना विश्वधर्माच्या पायावर प्राधान्य दिले होते.

समाजाची धारणा व उत्कर्ष व्हावा, एतदर्थ श्रुति, स्मृति व शिष्टाचार यांच्या साहाय्याने आपल्या आचारात परिवर्तन करणे हे तत्वनिष्ठ परिवर्तनवादी परिषदेने ठरविलेले नवे ध्येयच धर्ममंडळाने पुन: कायम केले. धर्मनिर्णयमंडळाची निर्णयपद्धती ऐतिहासिक आहे. तरी मागील राममोहन राय यांच्यापासून चालू झालेल्या वरील प्रबोधनाला व त्यामधून पुढे आलेल्या सामाजिक सुधारणांना, धर्मनिर्णयमंडळाचे कित्येक निर्णय पुष्टी देतात. म्हणूनही धर्मनिर्णयमंडळ व त्याचे प्रेरक केवलानंद यांचे धर्मसुधारणेच्या आधुनिक इतिहासात महत्त्वाचे स्थान आहे. ( अ ) अनुभव आणि तर्करूपी मनुष्याची बुद्धीच धर्माधर्मनिर्णयाचे साधन होय ( आ ) मानवाचे उच्चतम कल्याण आणि पारलौकिक कल्याण ही परस्पर पोषक आहेत. ( ई ) आचारधर्मामध्ये वेळोवेळी परिवर्तन होत असते. ( उ ) पूर्वकालीन शिष्ट जनानी असे परिवर्तन वेळोवेळी केले आहे. धर्मनिर्णयमंडळाचा हा पाया होय. ही सूत्रे होत.

राममोहन ते गांधी यांच्या पर्यंतच्या समाजसुधारकांनी सामुदायिक प्रार्थनेचा पुरस्कार व उपक्रम केला, ह्याचप्रमाणे धर्मनिर्णयमंडळाची प्रार्थनापद्धती हिंदुधर्मातील प्राचीन व अर्वाचीन एकेश्वरी उपासना पंथाना देखील उपयोगी होणारी आहे. हा एकेश्वरी प्रार्थनाप्रयोग श्री. केवलानंद सरस्वती यांनी तयार केला; कारण सामुदायिक समान सांघिक प्रार्थना संघटणेस उपयुक्त होते.

हिंदु समाजातील आचारविचारांत जातिभेदामुळे जे दोष शिरले आहेत, त्यांचे उच्चाटन करून धार्मिक–सामाजिक समानता प्रस्थापित करणे, हे धर्मनिर्णय मंडळाचे कार्य अद्याप पुरे झालेले नाही. ह्यासाठी सर्वांनी यत्न करण्याचा पुन: काळ आला आहे. जगन्मिथ्यावाद–नैराश्यवाद धर्मनिर्णय मंडळाने त्याज्य ठरविला. ऐहिक सामाजिक कर्तव्ये व सामाजिक नीती यांचे महत्त्व सांगितले. पोटजातींच्या एकीकरणावर भर दिला. सगोत्र व सप्रवर विवाह सापिंड्याचा विचार करून ग्राह्य समजावे. असे पुरोगामी निर्णय दिले.

अस्पृश्यतेचा प्रश्न बिकट होता व अद्यापीही खेड्यापाड्यात आहेच. सर्व जातीजमातीमधील सनातनी लोकांचा व पंडितांचा धर्मनिर्णयमंडळाच्या स्थापनेच्या काळात अस्पृश्यता निवारणाला फार कडवा विरोध होता. विविध स्मृतींचा ऐतिहासिकदृष्टया कालानुक्रम पाहता परिस्थित्यनुरूप काही स्मृतिकार अस्पृश्यता निवारणास आनुकूल्य दर्शवीत गेले. हे पाहून परिवर्तनवादी परिषदेने अस्पृश्यवर्गाची अस्पृश्यता सर्वथैव नष्ट व्हावी असा ठराव पास केला.

स्वामीजीनी धर्मसुधारणा फार व्यापक केली.

आर्यसमाजाने वेदप्रामाण्य मानिले होते. पण धर्मनिर्णय मंडळाने अनुभव व तर्क मिळून मनुष्याची बुद्धी होय. ही बुद्धीच धर्माचे प्रमाण होय असा क्रांतिकारक निर्णय घेतला. स्त्रीपुनर्विवाहासही मान्यता दिली. धर्मांतरित झालेल्यांना शुद्ध करून परत घ्यावे असाही नगर येथे झालेल्या परिषदेत प्रस्ताव मंजूर केला; व यासाठी स्वतंत्र शुद्धीचा प्रयोगही उपलब्ध केला. परिवर्तनवादी भूमिकेवरून आर्यसमाजाच्या शुद्धीकार्यास पुष्टीच दिली.

धर्मनिर्णयमंडळाचे कार्य रचनात्मक, विधायक होते; आचारधर्म सुधारण्यावर भर दिला. लोणावळे येथे झालेल्या चौथ्या अधिवेशनातील ठराव अधिक पुरोगामी ठरतात. प्रत्येक हिंदूला द्विजत्वाचा

अधिकार आहे. उपनयन संस्काराचा अधिकार प्रत्येक हिंदूस आहे. सकेशाविधवांना मंगल धार्मिक कृत्यात अशुभ, हीन व अपवित्र समजू नये, असे निर्णय नव्याने घेतले.

मागे सत्यशोधक समाज श्रेष्ठ कनिष्ठ भाव नाहीसा करण्यासाठी निघाला होता. प्रार्थनासमाज, ब्राह्मोसमाज व आर्यसमाज यानीही त्या अगोदर मनुष्याची योग्यता त्याच्या जन्मावरून ठरवू नये असा कटाक्ष धरिला होता. बदलापूर येथील पाचव्या अधिवेशनात, "कोणतीही जात जन्मतः श्रेष्ठ अथवा कनिष्ठ समजू नये" असा ठराव ऐतिहासिक निर्णयपद्धतीतून केला. मागील समाजसुधारकांना ह्याप्रमाणे पाठिंबा दिला गेला.

पूर्वी समुद्रगमनासंबंधी विरोध होता. लो. टिळकानाही प्रायश्चित्त घ्यावे लागले. "समुद्रयान निषिद्ध नसल्यामुळे ते प्रायश्चित्तार्ह तर नाहीच, उलट विद्यार्जनादि राष्ट्रहितोपयोगी कार्यासाठी उत्तेजनार्ह आहे." असा निर्णय परिवर्तनवादी पंडितानी वर्धा येथे दिला. मागे श्री शिवाजीमहाराजांचे क्षत्रियत्व वादग्रस्त मानिले गेले; क्षत्रियाचे व वैश्यांचे देखील अस्तित्व कलियुगात नाही असे पुष्कळ जुने पंडित व शास्त्री मानीत असत. "कलियुगात क्षत्रिय–वैश्य नाहीत असे काही विद्वान घोषित करतात ते अयथार्थ आहे. असा प्रस्ताव धर्मनिर्णय मंडळाने सम्मत केला.

छ. शिवाजी यांच्यापासून वेदोक्त प्रकरणे अनेक झाली होती. कोल्हापूरच्या वेदोक्त प्रकरणामुळे सत्यशोधक चळवळीला धार आली होती. धर्मनिर्णय मंडळाने वेद व वेदोक्त सर्वांना खुले केले; ब्राह्मण अब्राह्मण वादाला झालेली ही कारणे समूळ दूर केली. या कार्याचे श्रेय धर्मनिर्णय मंडळाला देखील द्यावे लागते.

मंडळाने मान्य केलेली ऐतिहासिक पद्धती म्हणजे मागील अनुभव लक्षात घेऊन कालानुरूप परिवर्तन करण्याचा मार्ग होय. धर्मनिर्णय मंडळाने विशेषतः आचारधर्मासंबंधी विवेक करून महत्त्वाचे निर्णय घेतले. हिंदुकोड बिल व पंचांग सुधारणा आणि मुहूर्तविवेक ह्या महत्त्वाच्या विषयावर धर्मनिर्णय मंडळाने पुरोगामी विवेक केला. स्त्रियांना धार्मिक व सामाजिक अधिकार पुरुषाच्या बरोबरीचे आहेत. स्त्रियांची आर्थिक उन्नती देखील करणे आवश्यक आहे. मुलीचे दत्तविधान व उपनयन होऊ शकते. हा निर्णय क्रांतिकारक होय.

स्वामी केवलानंद अहमदनगर येथे सन १९३६ मध्ये झालेल्या व लोणावळे येथे सन १९३८ मध्ये झालेल्या अधिवेशनाचे अध्यक्ष होते. सर्व अधिवेशनाच्या अध्यक्षांची व स्वागत अध्यक्षाची भाषणे एकत्र छापली गेली तर झालेली धर्मचर्चा पुढील पिढ्यांना मार्गदर्शक ठरेल.

## प्रभाव व परिणाम

स्वातंत्र्य पूर्वकाळात आधी सामाजिक की आधी राजकीय हा वाद महाराष्ट्रात चालू होता. पंडितांत सनातनी व सुधारक पंडित असे दोन विभाग होते. सनातनी पंडित पूर्वी संघटित असत. 'वर्णाश्रम स्वराज्य संघ' अशी त्यांची संघटना होती. सर्व समाज व धर्म सुधारकांना त्यांचा कडवा विरोध असे. खुद्द वाईचे उदाहरण घेतल्यास येथे कै. श्री. भाऊशास्त्री लेले हे महापंडित झाले. परंतु त्यांचा सर्व नव्या मताला व परिवर्तनांना कठोर विरोध असे. ते अपरिवर्तनवादी होते. त्यांच्या प्रमाणे वाई क्षेत्रात अनेक सनातनी अपरिवर्तनवादी होते. ह्याच क्षेत्रात परिवर्तनवादाचा उदय व्हावा, हे अपूर्व व महत्त्वाचे ठरते. श्री. केवलानंद व तर्कतीर्थ यांचे धर्मसंशोधन फारच चित्य वाटते. तर्कतीर्थांनी वाई सोडण्याचे अनेक प्रसंग आले असतानाही, त्यांकडे पाठ केली; व केवलानंद यांच्या कार्याच्या संवर्धनार्थ ते वाईतच राहिले. म्हणूनही हे धर्मकार्य वर्धमान आहे.

केवलानंदाना श्रीधरशास्त्री पाठक, प्रो. पां. वा. काणे, रा. स. भागवत, रावसाहेब चाफेकर, महादेवशास्त्री दिवेकर, डॉ. दप्तरी, वगैरे अनेक नामवंत परिवर्तनवादी विद्वान प्राप्त झाले. कै. ज. स. करंदीकर, कै. जयकर, न्या. मू. गजेंद्रगडकर वगैरे अनेक जबाबदाराचे विवेकवंताचा पाठिंबा मिळाला.

## पुरोगामी निर्णय

धर्मांत ईश्वर देखील बदल करू शकणार नाही, असे सनातनी व अपरिवर्तनवाद्यांचे मत होते. राजारामशास्त्री भागवत, विष्णूबुवा ब्रह्मचारी व विष्णुशास्त्री पंडित सुधारणांना शास्त्रातील आधार






दाखविले. तरीही परंपरावाद्यांच्या पक्षाने त्याना जुमानले नाही. नारायणशास्त्री यानी ग्रंथप्रामाण्यासंबंधी वेगळा दृष्टिकोन मांडला. पूर्वधर्मग्रंथातील तत्त्वांच्याकडे त्यानी लक्ष वेधले. सर्व ग्रंथाची एकवाक्यता व ते समन्वयपद्धतीने सारखेच प्रमाण मानण्याची अपरिवर्तनवाद्यांची हट्टी व जुनी पद्धती खंडित केली. धर्मशास्त्रांचा विचार करून अनेक वेळोवेळी झालेली आचारातील परिवर्तने दाखवून दिली. धर्म हा समाजासाठी आहे, समाज हा धर्मांकरिता नाही. हा परिवर्तनवादी पक्ष केवलानंदानी सिद्ध करून सनातन्यांवर मात केली. सनातन्यांच्या आग्रही वृत्तीचे निरसन करण्याचा मागे खूप प्रयत्न झाला होता, पण तो वाया गेला. हा अनुभव पाहून केवलानंदानी सर्व हिंदुबांधवांसाठी स्वतंत्र वाट दाखविली; व ह्या परिवर्तनवादी तत्त्वनिष्ठ पक्षाला पूर्व ग्रंथातील आधारही दाखविले. हा एक विक्रम होता. धर्म मासिकाचे संपादक कै. भाऊशास्त्री लेले व नारायणशास्त्री हे प्रज्ञानंद स्वामींचेच शिष्य पण दोघात किती फरक पडला हे जाणणे मोठे कुतूहलजनक आहे. दोन टोके अभ्यासता येतात.

"हिंदी सरकार विशिष्ट धर्मातीतच राहील, या हिंदुस्थानचे पंतप्रधान पं. नेहरू यानी घोषित केलेल्या धोरणास ही परिषद मान्यता देते" हा पुणे अधिवेशनातील ठराव तत्त्वनिष्ठ परिवर्तनवाद्यांची व्यापक दृष्टी दाखवितो, म्हणून महत्त्वाचा वाटतो. निधर्मी लोकशाहीला मंडळाने पाठिंबा दिला:–

"आज आम्हास लोकशाहीच उपयुक्त आहे."

"व्यक्तीने उत्पन्न केलेल्या संपत्तीचे स्वामित्व आणि त्याचा उपभोग यांचा विचार करता संपत्तीच्या राष्ट्रस्वामित्वाची कल्पना वैदिक धर्मांच्या मूल तत्त्वाना धरूनच आहे."

"लोकशाही शासनपद्धती आणि राष्ट्रस्वामित्व यांच्या यशस्वितेसाठी लोककल्याणाशी सुसंगत अशा रीतीने राजकीय आणि आर्थिक विकेंद्रीकरणाच्या तत्त्वांचा स्वीकार करणे योग्य होईल."

हे निर्णय आजही ताजे वाटतात.

हिंदु कायदा ज्यास लागू पडतो अशा कोणत्याही हिंदु व्यक्तींचा मिश्र विवाह बेकायदेशीर समजला जाऊ नये." हा निर्णयदेखील पुरोगामी आहे.

परिवर्तनवादी पक्षाचे मत दर्शविणारे कित्येक ग्रंथ उपलब्ध करण्यात आले. गु. स्वामी केवलानंद सरस्वती अभिनंदन ग्रंथ, धर्मनिर्णयमंडळ रौप्यमहोत्सवी वृत्तांत, धोरण आणि कार्य इ. वाङ्मय अभ्यसनीय आहे. १० व्या अधिवेशनात झालेले डॉ. गो. वि. देशमुख यांचे व्याख्यान आजही ताजे वाटते. पूर्वधर्मग्रंथातील विषमता टिकविणाऱ्या वचनांचा समाजात प्रत्यक्ष असलेल्या रुढ विषमतेस, मागील स्मृत्या आधार देतात. म्हणून फुले–आंबेडकर यांनी ग्रंथातील विषमतेवर हल्ले चढविले. गु. नारायणशास्त्री यानी पूर्व ग्रंथातील समता पुरस्कार करणारे आधार निदर्शनास आणिले, व विषमता दूर केली. बॅ. सावरकर यांच्या सामाजिक सुधारणांना देखील आधार मिळाला.

## शेवटी

धर्म हे मनुष्यकृत असतात; व माणसानीच त्यात निर्माण झालेली विकृती दूर केली पाहिजे. "ऐहिक कल्याणाच्या साधनामध्ये पारलौकिक कल्याणाच्या साधनांचा अंतर्भाव होतो. ज्या त्या काळातील शिष्टांना त्या परिस्थितीला अनुसरून परिवर्तन करण्याचा अधिकार आहे." असा नवा पवित्रा धर्मनिर्णयमंडळाने घेतला.

वाईत किंवा अन्यत्र विद्वान जमत पण त्याना कालानुरूप परिवर्तन करण्याची बुद्धी झाली नाही, हे दुर्दैव होते. इ. स. १८२६ साली वाई येथे प्रसिद्ध सुधारक कै. जगन्नाथ शंकरशेट हव्य कव्य करण्यास आले होते; त्यावेळी येथील क्षेत्रस्थानी त्यांचे वैदिक अधिकार नाकारले. राजर्षि शाहूमहाराज यांच्या वेदोक्त हक्काबद्दल निर्णय घेण्यास येथील विद्वान जमले. व त्यानी निर्णय घेतला की– शाहूमहाराज शूद्र आहेत व त्याना जर वेदोक्त हक्क दिले तर ते चाण्डाल होतील 'धर्म' मासिकाचे जुने अंक पाहिल्यास ही सर्व अपरिवर्तनीय सामाजिक अवस्था कोणासही दिसू शकते. स्वामी केवलानंद यानी अपरिवर्तनवादाचे दुष्परिणाम पाहिले होते. अनुभविले होते. त्यानी बदललेल्या काळाचा अर्थ बिनचूक जाणला.

गुरुवर्यांचा जन्म ता. ८ डिसेंबर १८७७ साली रोहे (कुलाबा) येथे कोकणातील एका शेतकरी

अनुक्रमणिका

घराण्यात ते वाढले. अध्ययन, संचार-प्रवास दीर्घ-वाचन वगैरेमुळे त्यांची दृष्टी व्यापक झाली होती. ह्याच काळात त्यांचा वाईतच जन्म झाला असता व पूर्ववय येथेच गेले असते तर ते परिवर्तनवादी झालेही नसते !

सोरटी सोमनाथाचा जीर्णोद्धार करून, त्यानी अस्पृश्यांसह हिंदूना व अहिंदुनाही देवालय प्रवेश खुला केला. धर्मनिर्णय मंडळाच्या द्वारे 'संस्कार प्रयोग' ( अनावश्यक भाग वगळून जेवढा मंत्रभाग पाहिजे तेवढाच ठेवून ) नव्याने उपलब्ध केले. सर्व हिंदूना समान संस्कार व्हावेत अशी त्यांची इच्छा होती, व पौरोहित्याचे कार्य कोणीही सूज्ञाने करावे, असेही स्वातंत्र्य त्यानी दिले. आज पुनः धर्माच्या बाबतीत समाज परंपरावादी होत आहे. स्वामींचे कार्य व चरित्र पाठ्य पुस्तकात देखील गोविले जावे.

श्री. गु. स्वामी केवलानंद सरस्वती हे ब्रह्मवादी होते, तरी त्यानी धार्मिकतेचे अवडंबर किंवा प्रदर्शन कधीच केले नाही. यांच्या दर्शनातून व सहवासातून सात्विकतेचा लाभ होई.

प्राज्ञपाठशाळेबरोबर धर्मनिर्णय मंडळाचेही कार्य चालू ठेविण्यास विद्वानांना सामर्थ्य प्राप्त होवो.

---



अनुक्रमणिका

## जिद्द आणखी हिंमत ह्यांचा
## संगम येथे घडे
## सुरू आमुचा प्रवास अविरत
## ध्येयमंदिराकडे...

**सर्वेऽत्र सुखिनः सन्तु...**

सारी जनता सुखी व्हावी. प्रत्येकाला न्याय मिळावा. समतेची भावना सर्वत्र अनुभवास यावी. सर्वांना सुरक्षितता लाभावी. प्रत्येकाला आपले हक्काचे मानाचे जीवन जगता यावे. ह्या मूलभूत मूल्यांनी प्रेरित होऊनच महाराष्ट्र शासनाची धोरणे आखली जातात...

परिणामतः राज्याच्या सर्वांगीण सामाजिक-आर्थिक प्रगतीच्या किंबहुना संपूर्ण विकासाच्या कार्यक्रमाचा केंद्रबिंदू सहजच ठरतो समाजातील आजवर उपेक्षित राहिलेला दीनदुर्बल घटक, गरीब सर्वसामान्य माणूस...

मागासवर्गियांना प्राथम्याने जमीनवाटप, बेघरांसाठी घरे, झोपडपट्ट्यांची सुधारणा, आर्थिकदृष्टया दुर्बलांना सवलती, आदिवासी कल्याणासाठी खास उप-योजना, शेतीसाठी स्वस्त वीजपुरठा, कृषिउत्पादनाला वाजवी दामाची हमी, शेतमजुरांसाठी किमान वेतन, ग्रामीण रोजगार हमी योजना, सुशिक्षित बेकारांसाठी अधिक रोजगारांची निर्मिती, स्वयंउद्योगांच्या उभारणीस मदत अशा अनेक क्रांतिकारी अन् पुरोगामी योजनांची मालिकाच महाराष्ट्रात सुरू झाली आहे...

सतत चार वर्षे रोजगार न मिळू शकलेल्या अगर आपला उद्योगव्यवसाय कारणपरत्वे उभारू न शकलेल्या सुशिक्षित बेकारांना दरमहा १०० रुपये निर्वाहवेतन देण्याचा शासनाचा निर्णयही ह्यापैकीच एक होय...

ही सर्व अन् अशीच इतर अनेक क्रांतिकारी अन् पुरोगामी धोरणे कसोशीने राबविण्याचा शासनाचा निर्धार आहे. मात्र त्यांच्या यशस्वी अंमलबजावणीसाठी हवा जनतेचा संपूर्ण अन् सक्रिय सहभाग...

**माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, महाराष्ट्र शासन.**

**नवनिर्मितिचे**
**घुमती पडघम**
**राज्य चालले**
**पुढे पुढे...**

अनुक्रमणिका

एम्.

# म. जोतिबा फुले यांचा सार्वजनिक सत्यधर्म

जे पुस्तक आपण वाचलेले नसले तरी आपण ते वाचलेले असणार अशी ज्याच्याविषयी आपली समजूत असते त्या पुस्तकाला अभिजात पुस्तकाचा ( classic ) दर्जा प्राप्त झालेला असतो असे म्हटले गेले आहे. ह्या निकषाला अनुसरून म. जोतिबा फुले यांचे 'सार्वजनिक सत्यधर्म पुस्तक' अभिजात पुस्तकांच्या मालिकेत निश्चितपणे मोडेल. ह्या पुस्तकात जोतिबांनी मांडलेल्या धर्मविषयक विचारांचा परिचय करून देणे हे ह्या लेखाचे उद्दिष्ट आहे.

पुस्तक संवादाच्या स्वरूपात रचण्यात आले आहे. यशवंत जोतीराव फुले, बळवंतराव हरी साकवळकर, गुंडीराम धोंडीराम प्रवासी, इ. मंडळी जोतिबांना अनेक प्रश्न विचारतात. आणि त्यांची उत्तरे जोतिबा विस्ताराने देतात. पण ह्या संवादाचे स्वरूप प्लेटोने रचलेल्या संवादासारखे नाही. प्लेटोच्या संवादाचा साधारण घाट असा असतो की कुणीतरी एखादे मत, एखादा सिद्धांत मांडलेला असतो, आणि इतर, मुख्यतः सॉक्रेटिस, त्याच्याविषयी अनेक प्रश्न उपस्थित करतात आणि प्रश्नोत्तरांच्या ह्या झटापटीतून त्या सिद्धांताचा आशय आणि त्याच्यातील उणीवा आणि विसंगती स्पष्ट होत जातात आणि मग त्या सिद्धांताला मुरड घालण्यात येते किंवा तो मागे घेण्यात येऊन त्याच्याजागी दुसरा सिद्धांत पुढे करण्यात येतो. जोतिबांच्या ह्या संवादाला असा नाट्यमय विकास आढळून येत नाही. इतर मंडळी जोतिबांना जे प्रश्न विचारतात ते त्यांनी जिज्ञासेने विचारलेले असतात. ह्या प्रश्नांची उत्तरे जोतिबांना अगोदरच माहीत आहेत आणि ते ती देतात. त्यांचे परीक्षण करण्यासाठी कुणी प्रश्न विचारीत नाही.

संवादाची सुरुवात यशवंत जोतीराव फुले यांच्या प्रश्नाने होते. प्रश्न असा की 'मानवप्राणी एकंदर सर्व जगात कशाने सुखी होईल ? ह्यावर जोतिबांचे उत्तर असे की "**सत्य वर्तन** केल्याशिवाय मानवप्राणी जगात सुखी होणार नाही, याविषयी प्रमाण देतो.

॥ अखंड ॥

॥ सत्य सर्वांचे आदी घर ॥
॥ सर्व धर्मांचे माहेर ॥ धृ० ॥
॥ जगांमाजीं सुख सारे ॥
॥ खास सत्याची तीं पोरें ॥ १ ॥
॥ सत्य सुखाला आधार ॥
॥ बाकी सर्व अंधकार ॥
॥ आहे सत्याचा बा जोर ॥
॥ काढी भंडाचा तो नीर ॥ २ ॥
॥ सत्य आहे ज्याचे मूळ ॥
॥ करी धूर्ताची बा राळ ॥
॥ बळ सत्याचे पाहुनी ॥
॥ बहुरुपी जळे मनीं ॥ ३ ॥
॥ खरे सुख नटा नोव्हे ॥
॥ सत्य ईशा वर्जू पाहे ॥
॥ जोती प्रार्थी सर्व लोकां ॥
॥ व्यर्थ डंभा पेटूं नका ॥ ४ ॥ "*

* पृ. ३५१, महात्मा फुले : समग्र वाङ्मय, संपादक : धनंजय कीर, स. गं. मालशे, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृति मंडळ, १९६९, पुढील पृष्ठसंदर्भही ह्याच पुस्तकाच्या पृष्ठांचा निर्देश करतात.

आता, सत्य वर्तन केल्याशिवाय मानवप्राणी जगात सुखी होणार नाही ह्याचे प्रमाण जोतिबांनी ह्या अभंगात दिलेले नाही हे उघड आहे. त्याच्यात त्यांनी हाच सिद्धांत ठासून परत मांडला आहे. पण थोड्याच वेळानंतर जोतिबा स्वतःच विचारतात. 'असे कोणते क्षुल्लक सार्वजनिक सत्य आहे की, त्याचे आचरण केल्याने मानवप्राणी दुःखी होतो ?' ह्याचे उत्तर यशवंतराव असे देतात : 'सत्यास स्मरून एकंदर सर्व सार्वजनिक सत्य, मग ते क्षुल्लक का असेना, पण त्याचे आचरण केल्याने कोणताही मानव प्राणी दुःखी होणार नाही, असे शोधांती समजून आले ... (पृ. ३५२) पण आपण कोणता शोध घेतला आणि त्याच्यापासून वरील निष्कर्ष कसा निघतो हे यशवंतराव स्पष्ट करीत नाहीत.

तेव्हा 'सार्वजनिक सत्य' म्हणजे काय हे अजून गूढच राहते. पण वरील प्रश्नोत्तरांवरून एक गोष्ट स्पष्ट झाली आहे. जोतिबांना अभिप्रेत असलेले सत्य हे जाणून घ्यायचे, ज्ञानाच्या किंवा सत्य विधानांच्या स्वरूपाचे सत्य नाही. ते आचरणात आणण्याचे, ज्याला अनुसरून आपण आपले वर्तन केले पाहिजे असे सत्य आहे. हे सत्य म्हणजे एक जीवनमार्ग आहे, म्हणून तो सत्यधर्म आहे. दुसरी गोष्ट अशी की ह्या सत्याला अनुसरून वागणारी व्यक्ती, सत्याला अनुसरून वागल्यामुळे सुखी होते. जोतिबांचा सत्याविषयी दुहेरी सिद्धांत दिसतो. सत्यधर्माने वागला नाही तर माणूस सुखी होणार नाही; आणि सत्यधर्माने वागला तर माणूस सुखी होईल. म्हणजे सत्यधर्माने वागणे ही सुखी होण्याची पुरेशी आणि आवश्यक अट आहे.

हे सत्य किंवा हा सत्यधर्म कोणत्या अर्थाने 'सार्वजनिक' आहे ? ह्याचा उलगडा जोतिबांच्या पुढील विधानांपासून होऊ शकेल : "ह्या पृथ्वीच्या पृष्ठभागावर जेवढी म्हणून मानवांनी धर्मपुस्तके केली आहेत, त्यांपैकी एकही ग्रंथात आरंभापासून शेवटपर्यंत सारखे **सार्वजनिक** सत्य नाही. कारण प्रत्येक धर्मपुस्तकामध्ये काहीएक व्यक्तींनी त्या वेळच्या प्रसंगास अनुसरून हेकडपणा केल्यामुळे, ते धर्म एकंदर सर्व मानवी प्राण्यांस सारखे हितकारक न होता, सहजच त्यामध्ये अनेक फळ्या होऊन त्या एकमेकांचा मनापासून हेवा व द्वेष करू लागतात.

दुसरे असे की **निर्माणकर्ता** जर आपण सर्व मानवांचा **निर्मीक** आहे, तर एकंदर सर्व मानवी प्राण्यांपैकी प्रत्येक व्यक्तीस त्याने कृपाळू होऊन एकंदर सर्व उत्पन्न केलेल्या **मानवी अधिकारांचा** यथायोग्य उपभोग घेता यावा, असे घडून येत नसल्यामुळे त्यास अनेक प्रकारच्या दुःसह अडचणी सोसाव्या लागतात." (पृ. ३५३, जाड ठसा मूळात.)

ह्याचा अर्थ असा की एखादा धर्म ज्या जीवनमार्गाचा आदेश करतो तो जीवनमार्ग जर त्या धर्माने मानवजातीच्या एखाद्या विभागापुरता मर्यादित केला असेल, सर्व मानवजातीसाठी म्हणून, प्रत्येक माणसासाठी म्हणून जर त्या जीवनमार्गाचा आदेश करण्यात आला नसेल तर तो धर्म सत्यधर्म असू शकत नाही. तसेच, सत्यधर्म ज्याप्रमाणे प्रत्येक माणसाला विहित असला पाहिजे त्याप्रमाणे त्याचे उद्दिष्ट सर्व मानवजातीचे सुख साधणे. मानवजातीच्या एका विभागाचे नव्हे तर सर्व मानवजातीचे सुख साधण्याच्या ह्या उद्दिष्टाचे स्पष्टीकरण जोतिबांनी असे केले आहे : सर्व सृष्टीचा व म्हणून सर्व माणसांचा एक निर्माणकर्ता आहे. ह्या निर्मीकाने प्रत्येक मानवी व्यक्तीला काही मानवी अधिकार देऊन निर्माण केले आहे. ह्या मानवी अधिकारांचा उपभोग घेण्यात व्यक्तीचे सुख असते. तेव्हा ज्या रीतीने वागले असता प्रत्येक व्यक्तीला तिच्या मानवी अधिकारांचा निर्वेधपणे उपभोग घेता येणे शक्य होईल अशा रीतीने वागणे म्हणजे सत्यधर्माने वागणे; आणि प्रत्येक व्यक्तीने ह्या सत्यधर्माला अनुसरून वागले पाहिजे. हा सत्यधर्म प्रत्येक व्यक्तीला विहित आहे; ह्या रीतीने वागण्याचा आदेश सत्यधर्म प्रत्येक व्यक्तीला करतो.

सत्यधर्माचे अधिक तपशिलवार वर्णन जोतिबांनी पुढे केले आहे. (पृ. ४११) त्याचा आशय असा : सृष्टीच्या निर्माणकर्त्याने सर्व स्त्रीपुरुषांस जन्मतःच स्वतंत्र आणि कित्येक मानवी अधिकारांचे धनी म्हणून निर्माण केले आहे असे सत्यधर्माच्या अनुयायाने मानले पाहिजे. निर्मीकाची आराधना करण्याचा सत्यमार्ग म्हणजे प्राणिमात्रांच्या उपभोगासाठी म्हणून निर्मीकाने ज्या वस्तू निर्माण केल्या आहेत त्यांचा, निर्मिकाविषयी कृतज्ञता बाळगून,

उपभोग घेणे आणि इतरांना असा उपभोग घेऊ देणे. तेव्हा सत्यधर्मीच्या अनुयायाने कुणाही प्राण्याला निरर्थक त्रास देता कामा नये आणि इतर कुणाही माणसांचे हक्क, त्यांचे धार्मिक व राजकीय स्वातंत्र्य हिरावून घेऊन त्यांच्यावर बळजबरी करता कामा नये. निर्मीकाच्या जागी एखाद्या मूर्तीची स्थापना करून तिची देव म्हणून पूजा करणे किंवा देवाचे पोकळ नामस्मरण करणे हा निर्मीकाची आराधना करण्याचा योग्य मार्ग नव्हे; असे वागणे सत्यधर्माला सोडून आहे.

निर्मीकाने सर्व प्राणिमात्रांना निर्माण केले असल्यामुळे सर्व स्त्रीपुरुषांनी परस्परांशी बंधुत्वाच्या नात्याने, 'बहीण भावंडांप्रमाणे' आचरण करावे. (हे तत्त्व मांडताना जोतिबांनी विशेष खबरदारी घेतली आहे. प्रत्येक नवऱ्याने आपली बायको वजा करून आणि प्रत्येक बाईने आपला नवरा वजा करून सर्व स्त्रीपुरुषांशी त्या अनुक्रमे आपल्या बहिणी आणि भाऊ आहेत अशा रीतीने वागावे असे त्यांनी म्हटले आहे.) प्रत्येक व्यक्तीला निर्मीकाकडून विचार-स्वातंत्र्य आणि आविष्कारस्वातंत्र्य लाभले आहे. तेव्हा सत्यधर्माच्या अनुयायाने इतरांच्या स्वातंत्र्याची कदर केली पाहिजे, धार्मिक किंवा राजकीय मतां-वरून कुणाचा छळ करता कामा नये. पण ह्याबरो-बरच स्वतःच्या स्वातंत्र्याचा वापर करताना इतरांचे नुकसान होणार नाही अशी खबरदारी त्याने घेतली पाहिजे. सत्यधर्माच्या अनुयायाने जन्मजात श्रेष्ठत्व किंवा कनिष्ठत्व मानता कामा नये. ज्ञान हे सर्वां-साठी असते आणि म्हणून प्रत्येक माणसाला ज्ञानाचा समान अधिकार असतो हे त्याने मान्य केले पाहिजे. कुणाला ज्ञानापासून वंचित करता कामा नये आणि सर्वांना ज्ञान प्राप्त करून घेण्याची समान संधी उप-लब्ध करून देण्याचा प्रयत्न त्याने केला पाहिजे. व्यक्तींना सामाजिक अधिकाराच्या जागा त्यांच्या योग्यतेनुरूप मिळाल्या पाहिजेत हे जसे सत्यधर्मीयाने मानले पाहिजे त्याप्रमाणे अशी योग्यता प्राप्त करून घेण्याची कुवत ज्या कुणा व्यक्तीच्या ठिकाणी असेल तिला ती प्राप्त करून घेण्याची सोय असली पाहिजे हेही त्याने मान्य केले पाहिजे.

सर्वांसाठी समान न्याय असला पाहिजे आणि न्याय देताना पक्षपात करता कामा नये. श्रमाला प्रतिष्ठा दिली पाहिजे. जे कष्ट करून उपयुक्त वस्तू निर्माण करतात आणि समाजधारणेला साहाय्य करतात, ते कोणत्याही प्रकारचा धंदा करीत असोत, त्यांचा मान राखला पाहिजे. उलट जे अंधश्रद्धा निर्माण करतात किंवा टिकवून धरतात आणि तिचा स्वतःच्या फायद्यासाठी वापर करतात त्यांचा धिक्कार केला पाहिजे. कुणीही व्यक्ती विशिष्ट धंदा करते किंवा विशिष्ट प्रकारचे अन्न खाते म्हणून तिला अशुद्ध मानून दूर राखणे किंवा तिच्याशी शुद्ध भावनेने व्यवहार न करणे सत्यधर्माला सोडून आहे. सत्यधर्माने जे अपंग, दुबळे आहेत त्यांना साहाय्य केले पाहिजे व वृद्ध मातापित्यांचा व इतर वृद्ध व्यक्तींचा परामर्ष घेतला पाहिजे. त्याने व्यसनाधीन बनता कामा नये, हत्या करता कामा नये, इतरांचे नुकसान करून आपला स्वार्थ साधण्यासाठी असत्य बोलता कामा नये, चोरी, व्यभिचार करता कामा नये, द्वेषाने इतरांच्या मालमत्तेचा विध्वंस करता कामा नये आणि अखेरीस, न्याय्य घटनेला अनुसरून राज्य करणाऱ्या सत्ताधाऱ्यांविरुद्ध बंड करता कामा नये.

जोतिबांचा हा जो सत्यधर्म आहे त्याची काही वैशिष्ट्ये ध्यानात घेण्याजोगी आहेत. एकतर त्याच्यामागची प्रेरणा 'इहवादी' आहे. इहवादी ह्या अर्थाने की माणसाला ऐहिक जीवनात सुखी होता येते, निर्मीकाने जगाची आणि मानवी प्रकृतीची घडण अशी केली आहे की माणूस योग्य रीतीने जगला तर त्याला आपले सुख साधता येते हा सिद्धांत जसा जोतिबा स्वीकारतात त्याचप्रमाणे माणसाने आपले सुख साधण्याचा प्रयत्न करणे योग्य आहे, माणसाने आपले सुख साधावे ह्यासाठीच निर्मीकाने माणसांना आणि जगाला निर्माण केले आहे हा सिद्धांतही जोतिबा स्वीकारतात. जोतिबा परलोक मानीत नाहीत आणि सर्व माणसांचे ऐहिक जीवनातील सुख ह्यापलीकडचे कोणतेही साध्य मान्य करीत नाहीत. निर्मीकाने माणसासाठी म्हणून निर्माण केलेल्या वस्तूंचा उपभोग घेऊन माणसाने आपल्या इच्छा तृप्त करण्यात सुख असते अशीच आहे. माणसाला अन्न मिळावे म्हणून दयाळू निर्मीकाने फळे, धान्ये, भाज्या, कंदमुळे निर्माण केली आहेत, 'वस्त्रप्रावरणांचा पुर-वठा व्हावा म्हणून, पल्हाटी, ताग वगैरेंची झाडे केली आहेत व त्या सर्वांची मनःपूर्वक आपण सर्वांनी रात्रं-दिवस मेहनत, मशागत करून त्यांची सर्वप्रकारे जत-

अनुक्रमणिका

णूक करून, आपण स्वत: श्रमाने थकल्यावर त्यांचा सर्वोपरी उपभोग घेतांना चांपा, पारिजात, कांचन, कदंब, केवडा, केतकी, गुलछबू, पाच, मरवा, चमेली, मोतिया, गुलाब, मधुमालती, कांटेशेवती, रेवती, मदणबाण, मोगरा, जुई, जाई वगैरे नानाप्रकारच्या सुवासिक फुलांचा या जगद्रूप मळ्यात मानव माळिणी माळ्याने सुवास घेऊन चिरकाल आराम आनंदांत रहाण्याकरितां तीं निर्माण केलीं आहेत." (पृ. ३७६–३७७)

ह्यामुळे जोतिबा रामदासांच्या 'जगीं सर्व सूखी असा कोण आहे, विचारी मना तूंच शोधूनी पाहे' ह्या म्हणण्याला आक्षेप घेतात. सुखदु:खावर माणसाचा ताबा नसतो, पूर्वकर्माप्रमाणे ह्या जीवनातील सुखदु:खे माणसाच्या वाट्याला येतात ही विचारसरणी चूक तर आहेच पण आपमतलबीही आहे. 'देशस्थ आर्य रामदास भट्टजीबुवांनी या श्लोकावरून निर्मीकाने निर्माण केलेल्या पवित्र जगाविषयी व संसाराविषयी अज्ञानी शूद्रादि अतिशूद्रांचे मनांत वीट भरवून तो सर्व व्यर्थ आहे, म्हणून त्यांनी निरिच्छ व निरश्रम होवून परित्याग केल्याबरोबर धूर्त आर्य भट्टांनी त्यांवर **झोड उठवावी**; यास्तव ह्रा श्लोक बुद्धया केला असावा.' निर्मीकाने निर्माण केलेले हे जग 'पवित्र' आहे; म्हणजे ते अमंगळ, दुष्ट नाही; ते मानवी सुखाला अनुकूल असे जग आहे. मग माणसाने सुखी होण्याचा मार्ग कोणता? एकतर माणसाने श्रम करून उपभोग्य वस्तूंची वाढ केली पाहिजे; 'आपण सर्वांनी रात्रंदिवस मेहनत, मशागत' केली पाहिजे, निर्मीकाने निर्माण केलेल्या वस्तूंची 'जतणूक' केली पाहिजे. शिवाय निर्मीकाने निर्माण केलेल्या पदार्थांचे स्वरूप नीट समजून घेऊन माणसांच्या गरजांचे समाधान करण्यासाठी ह्या ज्ञानाचा उपयोग करून घेतला पाहिजे. थोडक्यात वैज्ञानिक ज्ञान कमवून मानवी कल्याणासाठी त्याचे उपयोजन केले पाहिजे. 'निर्मीकाने एकंदर सर्व पदार्थ उत्पन्न केले आहेत. त्यांपैकी प्रत्येक पदार्थाचा कोणकोणत्या ठिकाणीं कसा कसा उपयोग करावा, याविषयीं रात्रंदिवस खटपट करून ध्यानस्थ होऊन त्याविषयी विचार करीत बसल्याने निर्मीकाची **अगाध शक्ति, अगाध चातुर्य व अगाध लीला** होणार आहे.' म्हणजे सृष्टीचे स्वरूप समजून घेऊन वैज्ञानिक ज्ञानाचा उपयोग माणसाची स्थिती सुधारण्यासाठी करणे हा निर्मीकाच्या आराधनेचाच प्रकार आहे. पण याहून महत्त्वाची गोष्ट अशी की माणसाने, म्हणजे मानवजातीने जर सुखी व्हायचे असेल तर प्रत्येकाने न्यायाने वागले पाहिजे. न्यायाने वागले पाहिजे ह्याचा अर्थ असा की स्वत:चे सुख साधण्याचा प्रत्येकाचा जो निर्मीकदत्त समान अधिकार असतो त्याच्याशी सुसंगत ठरेल अशा रीतीने वागले पाहिजे.

निर्मीकाने सर्व मानवी व्यक्तींना काही समान आणि अविच्छेद्य (inalienable) अधिकार प्रदान केले आहेत व म्हणून सर्व मानवी व्यक्तींचा दर्जा समान असतो हे ओळखणे आणि इतरांच्या समान अधिकारांना बाधा येणार नाही अशा रीतीने स्वत:चे सुख साधण्याचा प्रयत्न करणे म्हणजे सत्यधर्माचे पालन करणे. अशा न्याय्य आचरणात सत्यधर्माचे जवळ जवळ सबंध सार व्यक्त होते. 'जवळ जवळ सबंध सार' असे म्हणण्याचे कारण हे की सत्यधर्माचे जे सार आहे त्याच्यात आणखी एक महत्त्वाचा घटक आहे अशी कल्पना करूया की एका समाजात सर्व व्यक्तींचे समान स्वातंत्र्य व समान अधिकार मान्य करण्यात आले आहेत, त्यांच्याशी सुसंगत अशी राज्यघटना बनविण्यात आली आहे, ह्या राज्यघटनेला अनुसरून राज्यकारभार करण्यात येत आहे आणि सर्व कायदे सार्वजनिक हितासाठी म्हणून करण्यात आले आहेत. अशा राज्याचा एखाद्या चांगल्या नागरिकाच्या म्हणजे राज्याचे सर्व कायदे शब्दाबरहुकूम आणि त्यांच्यामागची उद्दिष्टे ध्यानात घेऊन पाळणाऱ्या नागरिकाच्या आचरणाने सत्यधर्माचे बरेचसे क्षेत्र व्यापले जाईल. पण सर्व क्षेत्र नाही. कारण कायद्यांच्या कक्षेत न मोडणारे असे वर्तनाचे क्षेत्र उरेल. एखादा नागरिक ह्या क्षेत्रात सुद्धा इतरांच्या समान अधिकारांची कदर करीत असेल आणि त्यांच्याशी सुसंगत ठरेल अशा रीतीने आपले सुख साधण्याचा प्रयत्न करीत असेल. अशा माणसाला 'न्यायी माणूस' म्हणूया. न्यायी माणूस ह्या चांगल्या नागरिकापेक्षा सत्यधर्मीयांच्या अधिक जवळ येतो. पण एखादा केवळ न्यायी माणूस आणि सत्यधर्मीय यांच्या मध्येही एक महत्त्वाचा भेद आहे. सत्यधर्मीय ह्या

केवळ न्यायी माणसापेक्षा अधिक काहीतरी असतो. तो निर्मीकाचे अस्तित्व मानतो, एकाच निर्मीकाने सर्व मानवांना निर्माण केले असल्यामुळे सर्व मानव बांधव आहेत हे तत्त्व तो स्वीकारतो, ह्या तत्त्वाला अनुसरून तो सर्वांशी बंधुत्वाची वृत्ती धारण करतो आणि त्याप्रमाणे त्यांच्याशी वर्तन करतो. जो माणूस केवळ न्यायी असतो तो इतरांवर अन्याय करून स्वतःचे सुख साधण्याचा प्रयत्न करणार नाही, स्वतःच्या अधिक सुखाची किंमत इतरांना द्यायला लावणार नाही. ह्याच्यापलीकडे जाऊन स्वतःच्या सुखाची किंमत देऊन इतरांचे सुख साधण्याचा प्रयत्न करण्याचेही त्याला कारण नसते. किंबहुना इतरांच्या सुखाविषयी आस्था बाळगण्याचेही त्याला कारण नसते. उलट इतरांशी बंधुत्वाने वागणे म्हणजे इतरांच्या सुखाविषयी आस्था असणे, इतरांचे सुख हे स्वतःच्या सुखाचे साधन म्हणून नव्हे तर त्याच्या स्वतःसाठीच इष्ट असणे किंवा अधिक परिचित भाषेत इतरांच्या सुखात स्वतःचे सुख मानणे आणि त्यासाठी झटणे. ह्या बंधुत्वाच्या वृत्तीवर जोतिबांनी भर दिला आहे.

'परा लाभ होतां संतोष मानीतो ॥
साह्य देतो घेतो ॥ सद्गुणाचे ॥ १ ॥
विद्वान करीतो पंगु जगाप्रत ॥
पाळी सदा व्रत ॥ घरामध्ये ॥ २ ॥

तेव्हा निर्मीकाचे अस्तित्व मानणे, सर्व माणसे एकाच निर्मीकाची निर्मिती असल्यामुळे त्यांच्यामध्ये भावाबहिणींचे नाते असणे हे ओळखणे आणि ह्या नात्याला अनुसरून 'आत्मौपम्य' वृत्तीने सर्वांशी वागणे हा सत्यधर्मांचा अतिशय महत्वाचा भाग आहे. सत्यधर्म हा धर्म जो ठरतो, केवळ सामाजिक न्यायाच्या आदर्शापेक्षा अधिक काहीतरी असणारा असा धर्म तो ठरतो, तो ह्या घटकांमुळे. पण आपण ही गोष्टसुद्धा ध्यानात घेतली पाहिजे की 'निर्मीकाची अगाध शक्ती, अगाध चातुर्य व अगाध लीला' ह्याविषयी अतीव पूज्यभाव बाळगणे, त्याने माणसाच्या सुखासाठी म्हणून ह्या जगाची रचना केली आहे आणि सुखाचा उपभोग घेण्यासाठी आवश्यक असलेल्या शक्ती माणसाला दिल्या आहेत हे ध्यानात घेऊन निर्मिकाविषयी आत्यंतिक कृतज्ञताबुद्धी बाळगणे आणि सर्व माणसांविषयी बंधुभाव बाळगणे ह्याशिवाय आणखी कोणत्या भावना सत्यधर्मात आढळणार नाहीत. पारंपरिक धर्मांत कित्येक भावनांचा उत्कट आविष्कार आढळून येतो आणि धार्मिक अनुभवाचा आणि जीवनाचा गाभा ह्या भावनांचा मिळून बनलेला असतो. उदा. स्वतःच्या पापमयतेची तीव्र जाणीव. ही जाणीव व्यक्तीच्या सबंध जीवनाला, जीवनाच्या आनंदात विष कालविल्यासारखी व्यापून रहाते. स्वतःच्या प्रयत्नांनी स्वतःला पापापासून मुक्त करता येत नाही अशी असहायतेची जाणीवही ह्या पापाच्या जाणिवेत अंतर्भूत असते. ह्यातून व्यक्ती ईश्वराला शरण जाते, त्याची करुणा भाकते, त्याच्या 'प्रसादाची' वाट पहात रहाते. ईश्वराचे सान्निध्य प्राप्त झाल्याचा अनुभव हा अतीव, अनुपम शांतीचा, आनंदाचा अनुभव असतो. ईश्वरापासून आपण दुरावलो आहोत ह्या जाणिवेतून निर्माण होणारी आर्तता आणि विव्हलता, आणि ईश्वराने आपल्याला जवळ केले आहे ह्या जाणिवेतून निर्माण होणारी शांती आणि आनंद ह्या भक्तिमार्गी धर्मातील वैशिष्ट्यपूर्ण धार्मिक भावना होत. पण दुसऱ्या वळणाच्याही धार्मिक भावना आपल्याला परिचित आहेत. उदा. 'संसार असार आहे' ही जाणीव आणि ह्या भंगुर संसारापलीकडल्या चिरंतन तत्त्वाशी एकरूप होण्यात जीवनाचे परमश्रेय मानणे. आता पारंपरिक धर्मांप्रमाणे अशा धार्मिक भावनांवर आधारलेल्या धार्मिक साधनेला—उपासनेला, आराधनेला, ध्यानधारणेला—व्यक्तीच्या जीवनात मध्यवर्ती आणि मूलभूत स्थान असते. धार्मिक व्यक्तीला नैतिक साधनाही करावी लागते, आपले नैतिक आचरण अतिशय शुद्ध राखावे लागते. नैतिक स्खलनामुळे धार्मिक साधनेचाही भंग होतो. पण नैतिक साधना ही धार्मिक साधनेची पूर्वतयारी आणि तिचे एक अनिवार्य अंग असले तरी धार्मिक साधना ही नैतिक साधनेहून अधिक काहीतरी असते. तिचे स्वतःचे असे एक साध्य असते व म्हणून धार्मिक जीवन हे नैतिक जीवनाहून अधिक काहीतरी असते. उदा. भजनपूजनात दंग होऊन सर्व वृत्ती ईश्वराच्या ठिकाणी एकाग्र कराव्या, ईश्वराशी एकांतात साक्षात् नाते जोडावे. नामस्मरणात तल्लीन होऊन ईश्वराच्या सान्निध्याचा, ईश्वराशी झालेल्या एकरूपतेचा आनंद





अनुक्रमणिका

घ्यावा, ह्या आनंदाच्या संस्काराने शुद्ध, टवटवीत झालेल्या चित्ताने जगाच्या उलाढालीत भाग घ्यायला परत सज्ज व्हावे अशी भक्तिमार्गी साधना आणि भक्तिमार्गी जीवन असते. किंवा एखादा बौद्ध आपल्या वासनांना संयमाची शिस्त लावून, ध्यानमार्गाचा अवलंब करून निःसत्व आणि विनाशी 'धर्मां'च्या अनुभवांनी जी विचलित आणि दूषित होत नाही अशी 'निर्वाणावस्था' प्राप्त करून घेण्यासाठी झटेल.

जोतिबांच्या सार्वजनिक सत्यधर्मात अशा उत्कट धार्मिक भावनांच्या आविष्काराला फारसे स्थान नाही. अजिबात नाही असे म्हणणे गैर ठरेल, एकतर आपणा सर्वांच्या निर्मीकाविषयी पूज्यभावाची आणि कृतज्ञतेची वृत्ती सत्यधर्मीयाने बाळगली पाहिजे. पण तुलनेने पाहता ह्या दोन भावनांपैकी मानवजातीविषयीची बंधुत्वाची भावनाच सत्यधर्मीयात अधिक उत्कटतेने वास करताना आढळेल. इस्लामचे प्रणेते महमंद पैगंबर यांनी एकेश्वरवादाची जी स्थापना केली तिच्यामागे विश्वाच्या एकमेव निर्मात्याच्या आणि चालकाच्या अनंतत्वाचे, केवळ प्रभुत्वाचे, ईश्वरापुढील माणसाच्या क्षुद्रत्वाचे एक उत्कट दर्शन आहे. म्हणून ईश्वराला अनन्यभावे शरण जाण्यात त्याचे सार्वभौमत्व पूर्णपणे मान्य करून त्याच्या इच्छेशी एकरूप होण्यात जे, जे घडते ते, ते ईश्वराच्या आज्ञेने घडते हे जाणून त्याचा शांतपणे स्वीकार करण्यात सश्रद्ध मुसलमानाच्या जीवनाचे सार्थक होते. निर्मीकाविषयीचे असे उत्कट दर्शन जोतिबांच्या सत्यधर्मात नाही व म्हणून निर्मीकाविषयी एक विशिष्ट वृत्ती स्वतःच्या अंतरात्म्यात खोल रुजविण्यात, ह्या वृत्तीच्या प्रभावाने आपल्या सर्व प्रेरणांचे रूपांतर घडवून आणण्यात, तिच्यापासून न ढळण्यात सत्यधर्मीयाला आपल्या जीवनाचे परमश्रेय लाभत नाही. निर्मीक हा बराचसा अमूर्त, रूपरंगहीन असा पदार्थ ( entity ) रहातो. त्याच्याशी वैयक्तिक नाते जोडण्यात जीवनाचे साफल्य नसते. थोडक्यात असे म्हणता येईल की निर्मीकाविषयी पूज्यभाव आणि कृतज्ञताबुद्धी बाळगली की त्यापुढे निर्मीकाविषयीच्या अशा कर्तव्याला किंवा व्यवहाराला सत्यधर्मात स्थान नाही.

पण सर्व माणसांविषयीच्या बंधुतेच्या भावनेला सत्यधर्मात अनन्यसाधारण स्थान आहे. कारण व्यक्तीला अशी भावना वाटत असणे आणि तिला अनुसरून व्यक्तीने सर्व माणसांशी मनःपूर्वक आचरण करणे ही सत्यधर्माप्रमाणे धार्मिकतेची कसोटीच आहे. तेव्हा सत्यधर्माप्रमाणे धार्मिक आचरण हे केवळ इतर माणसांशी करण्यात येणारे योग्य प्रकारचे आचरण असते. ह्याहून धार्मिक आचरणाचा असा वेगळा, स्वतंत्र प्रांत नसतो. ह्यामुळे पूजा, नामस्मरण इ. धार्मिक कृत्ये सत्यधर्माच्या दृष्टीने व्यर्थ असतात. उदा.–

"प्र०– आपण निर्मीकास नैवेद्य दाखवून त्यास कसे तृप्त करावे ?

उ०– एकंदर सर्व पोकळीतील अनंत सूर्यमंडळांसह त्यांच्या ग्रहोपग्रहांसहित पृथ्वीवरील सर्व पदार्थ मानवाच्या निर्वाहाकरिता जर निर्माणकर्त्याने आपल्या स्वेच्छेने उत्पन्न केले आहेत, तर त्यांपैकी आम्ही कोणत्या पदार्थांचा उलटा **नैवेद्य** त्यास अर्पण करावा ?

प्र०– तर यावरून निर्मीकास संतुष्ट करण्यासाठी पदार्थाचा आम्ही काय व कसा उपयोग करावा ?

उ० – एकंदर आपल्या कुटुंबाचे स्वकष्टाने पाळणपोषण करून ज्या सत्पुरुषांनी जगाच्या कल्याणासाठी आपले सर्व आयुष्य खर्ची घातल्यामुळे त्यांस यदाकदाचित वृद्धापकाळी विपत्ति आली अथवा ते कांही संकटात पडले, तर त्यांस अथवा जगातील पंगु लोकांस अथवा पोरक्या मुलांस निर्मीकाच्या नांवाने स्वशक्त्यनुरूप मदत करावी, म्हणजे त्यास नैवेद्य अर्पण केल्याचे श्रेय मिळेल."

तेव्हा कर्तव्ये ही केवळ माणसांविषयीची असतात. आपण पाहिले आहे त्याप्रमाणे ही कर्तव्ये, सर्व माणसांविषयी वाटणाऱ्या बंधुतेच्या भावनेचा आविष्कार करणारे आचरण दुहेरी असते. प्रत्येक व्यक्तीचे समान स्वातंत्र्य, स्वतःचे सुख साधण्याचा तिचा समान अधिकार मान्य करणे, स्वतःचे सुख साधताना इतर कुणाही व्यक्तीच्या स्वातंत्र्याला आणि अधिकाराला बाधा न आणणे, इतरांवर आक्रमण न करणे, त्यांचे हक्क हिरावून न घेणे, इ. हे अशा आचरणात अंतर्भूत असते. आणि त्याची अधिक विधायक बाजू म्हणजे इतरांचे सुख हे जणू काही स्वतःचेच सुख आहे असे मानून त्यासाठी झटणे. "कोणत्याहि प्रकारचा भेदाभेद न करिता

एकंदर सर्व मानवांपैकी जो कोणी आपल्या कुटुंबाचे पोषण करून जगाच्या कल्याणासाठी सतत रात्रंदिवस झटत आहे" त्याची थोरवी जोतिबांनी वारंवार गायिली आहे. स्त्री ही पुरुषापेक्षा श्रेष्ठ आहे असे जे मत जोतिबांनी मांडले आहे त्याचेही कारण स्त्रियांमध्ये पुरुषांपेक्षा इतरांच्या सुखाविषयीची आस्था स्वाभाविकपणे अधिक असते असे त्यांना वाटते हेच आहे. "स्त्री आपल्या बहिणभावंडास आवडणारी असल्याकारणाने ती त्यांचा निरापेक्षबुद्धीने पाठराखेपणा करिते."

इस्लामी धर्मश्रद्धा विश्वाच्या एकमेव निर्मात्याच्या आणि चालकाच्या अनंत सामर्थ्यांच्या उत्कट दर्शनावर आधारलेली आहे असे आपण वर म्हटले. हा जो एकमेव खरा देव आहे त्याच्या अनन्यतेला, अनंतत्वाला यत्किंचितही उणेपणा येईल अशी देवाविषयीची कोणतीही कल्पना इस्लामला सहन होत नाही. म्हणून खऱ्या देवाच्या जागी अन्य देवांची स्थापना करणाऱ्या मूर्तिपूजेला इस्लामचा कडवा विरोध आहे. जोतिबांची अशी कडवी भावना निर्मीकाविषयी नाही; ती बंधुतेविषयी व मानवी समतेविषयी आहे. एकमेव खऱ्या देवाच्या जागी खोटे देव स्थापन करणारे धर्म नष्ट करण्याचा प्रयत्न इस्लामने जितक्या प्रखरपणे केला तितक्याच प्रखरपणे जोतिबांनी मानवी बंधुता आणि समता नाकारणाऱ्या धर्मांवर हल्ले केले. हा धर्म म्हणजे हिंदू धर्म. निर्मीक हाच एकमेव खरा देव असताना 'आर्यभट्ट' ब्राह्मण स्वतःला 'भूदेव' म्हणवून घेतात ह्या 'नास्तिकपणा'चा जोतिबांनी धिक्कार केला आहे. पण त्याचेही कारण भूदेव म्हणून ते स्वतःला इतर माणसांपेक्षां श्रेष्ठ मानतात व विशेषाधिकाराचा दावा करतात हेच आहे.

म्हणून जोतिबांनी मानवी समतेचा उद्घोष केला. "स्त्री आणि पुरुष एकसारखे एकंदर सर्व **मानवी अधिकारांचा उपभोग घेण्यास पात्र असतां** स्त्रियांस एक तऱ्हेचा नियम लागू करणें व लोभी धाडस पुरुषांस दुसरा नियम लागू करणे हा **निव्वळ पक्षपात होय**" (पृ. ३६२). वर्णाश्रमधर्म आणि जातिभेद जोतिबांनी समूळ नाकारला. "मानवप्राण्यांत त्यांच्या गुणांवरून जातिभेद ठरविता येणार नाही... सद्‌गुण व दुर्गुण हे काही पिढीजादा स्वभाव नाहींत... अतिशूद्र चांभारांची मुलें सद्‌गुणी निवडल्यास शंकराचार्यांच्या तोलाचे महामुनि होणार नाहींत, असें न्यायी पुरुषाच्याने म्हणवणार नाही" (पृ. ३६७). समाजाची धारणा व्हायची तर वेगवेगळ्या व्यक्तींना वेगवेगळ्या प्रकारची कामे करावी लागतात. पण ह्याचा अर्थ असा नव्हे की ही माणसे मूलतः भिन्न प्रकारची असतात आणि व्यक्ती ज्या प्रकारची असते त्या प्रकारापासून तिने कोणते काम करावे हे निश्चित होते आणि हे काम करणे हा तिचा धर्म असतो. धर्म ही कल्पनाच येथे अनुचित व असंबंधित आहे. कपडे धुणे हा परिटाचा धर्म नव्हे, तो त्याचा व्यवसाय आहे. म्हणजे समाजधारणेसाठी आवश्यक असलेले हे एक प्रकारचे काम आहे आणि ते करून ती व्यक्ती आपला निर्वाह करते. आपणही जेव्हा स्वतःचे कपडे धुतो तेव्हा परीट जे काम व्यवसाय म्हणून करीत असतो तेच काम आपणही करीत असतो. पण ह्यावरून आपण परीट ह्या प्रकारचे माणूस आहोत असे निष्पन्न होत नाही. सर्व माणसे एकाच, समान प्रकारची आहेत, ती **माणसे** आहेत आणि त्यांचे व्यवसाय भिन्न असले तरी धर्म एकच असतो. तो म्हणजे निर्मीकाविषयी कृतज्ञताबुद्धी बाळगून सर्व माणसांशी बंधुत्वाने वागणे.

पण जोतिबांनी श्रुतिस्मृतिप्रणीत वर्णाश्रमधर्माचे प्रामाण्य नाकारले एवढेच नाही. वर्णभेद आणि श्रेष्ठत्व–कनिष्ठत्व मानणारा हा धर्म अंधश्रद्धेवर व गैरसमजुतीवर आधारलेला आहे असे दाखवून देऊन त्याचे खंडन करण्याचे काम तर त्यांनी केलेच. पण त्यांचा पुढे आरोप असा होता की आर्यभट्ट ब्राह्मणांनी श्रुतिस्मृतिपुराणादि धर्मग्रंथ स्वतःच्या स्वार्थासाठी कावेबाजपणे रचले, ब्राह्मणांचा वर्ण श्रेष्ठ व शुद्ध आहे व इतर वर्ण कनिष्ठ व अशुद्ध आहेत ह्या कल्पनेला धार्मिक प्रामाण्य दिले, अज्ञानी शूद्रातिशूद्रांच्या गळी कल्पना उतरवून स्वतःसाठी काही विशेषाधिकार राखून ठेवले, अनेक धार्मिक विधी, संस्कार यांची योजना करून आणि त्यांचा अधिकार स्वतःकडे ठेवून ते करण्यासाठी शूद्रांकडून दक्षिणा आणि भोजने उकळली, त्यांचे शोषण केले आणि आपले हे कारस्थान लोकांच्या ध्यानात येऊ नये, आपल्या स्वार्थाला अनुकूल असलेली ही व्यवस्था

सुरक्षितपणे चालू रहावी म्हणूने ब्राह्मणांनी इतरांना धर्मज्ञान आणि इतर ज्ञान नाकारले, लोक सदैव अज्ञानात रहातील अशी घडी बसविली. वैदिक वर्णाश्रमधर्मामागे केवळ अज्ञान व अंधश्रद्धा एवढेच आहे असे नाही. त्याच्यात ब्राह्मणांचे ' वर्णहित ' गुंतलेले आहे. हा धर्म ' कृत्रिम ' आहे, म्हणजे बनावट आहे असा त्याचा जोतिबांनी वारंवार धिक्कार केला आहे. दोन्ही अर्थांनी बनावट. जाणून-बुजून बनविलेला आणि लोकांना फसवून त्याचा फायदा उठविण्यासाठी बनविलेला. वैदिक धर्म हे सर्वसामान्य शूद्राविरुद्ध आर्यभट्ट ब्राह्मणांनी रचलेले कारस्थान आहे.

जोतिबांनी वर्णयुद्धाचा पुकार केला. वैदिक धर्माने प्रतिष्ठित केलेली वर्णाश्रमव्यवस्था ब्राह्मणांच्या स्वार्थासाठी रचण्यात आणि टिकवून धरण्यात आली आहे, ती बहुसंख्य शूद्रांच्या हिताच्या विरोधी आहे आणि शूद्रांनी आपले न्याय्य हित साधण्यासाठी ती उलथून टाकली पाहिजे असे त्यांचे आवाहन होते. " शूद्रादि अतिशूद्रांस दास करण्यासंबंधी ग्रंथ जर धूर्त आर्यभट्टांनी समूळ नाहीसे केले नाहींत, तर ईश्वर परमन्यायी असून सर्व समर्थ आहे, यास्तव तोच थोड्या दिवसांत शूद्रादि अतिशूद्रांच्या हातून परस्पर धूर्त आर्यभट्टांचा व त्यांच्या पाखंडी ग्रंथाचा धिःकार करवील असे मी भविष्य करितों." (पृ. ३७० ). शिवाय प्रचलित धर्मात आर्यभट्ट ब्राह्मणांचे स्वार्थी हितसंबंध गुंतले असल्यामुळे त्याच्या जागी सार्वजनिक सत्यधर्माची स्थापना करण्याच्या कामी ते मनापासून साहाय्य करतील असे नाही. '... त्यांतून महाराष्ट्रांतील इंग्रजी शिकलेले काही आर्य ब्राह्मण जरी शुद्ध अंतःकरणाचे नाहींत, तरी नाईलाजास्तव वरकांती तुमच्या मताला मिळतील, असा संभव आहे आणि शेकडो शूद्रादि अतिशूद्र सत्यास स्मरून निःसंशय तुमच्या मताला साह्य देतील, अशी माझी पक्की खात्री आहे. यास्तव धूर्त आर्य भटांच्या वेदात भट पडो. तुम्ही भटांसह त्यांच्या वेदांची पर्वा न करिता एकंदर सर्व धूर्त आर्यभट ब्राह्मणांच्या मागील व हल्लींच्या आचरणावरून व ईश्वरप्रणित सार्वजनिक सत्याची तुलना केल्याबरोबर बहुतेक अज्ञानी शूद्रादि अतिशूद्रांची समजूत होऊन त्यांचें बरें होणार आहे. ( पृ. ४०० ).

मार्क्सने वर्गयुद्ध हे एक ऐतिहासिक सत्य म्हणून मांडले पण शिवाय वर्गयुद्धाचा प्रत्यक्ष कार्यक्रमही कामगारवर्गापुढे ठेवला. आजपर्यंत होऊन गेलेल्या प्रत्येक ऐतिहासिक समाजाचा इतिहास हा त्या समाजात जे परस्परविरोधी हितसंबंधाचे वर्ग होते त्यांच्यामधील कलहांचा इतिहास आहे ह्या सिद्धांतामुळे तत्कालीन भांडवलशाही समाजात जो सुप्त वर्गविरोध होता तो स्पष्ट झाला आणि स्पष्ट झाल्यामुळे त्याला धारही चढली. पण ह्याशिवाय मार्क्सने जाणीवपूर्वक कामगारवर्गाला वर्गलढ्याचे आवाहन केले आणि ह्यासाठी त्याने कामगार-वर्गाच्या वर्गीय 'अस्मिते'चा, वर्गीय स्वाभिमानाचा परिपोष करण्याचा प्रयत्न केला. " तुम्ही कंगाल आहात पण त्याचे कारण तुमचे अन्यायाने शोषण होत आहे हे आहे. पण तुम्ही बहुसंख्य आहात, तुम्ही इतके बहुसंख्य आहात की तुम्ही केवळ एक वर्ग नाही; मूठभर भांडवलदार सोडले तर तुम्ही म्हणजे सबंध समाजच आहात. ह्या सबंध समाजाच्या वतीने मानवी इतिहासातील शोषण करणारा अखेरचा वर्ग नष्ट करून न्याय्य आणि एकसंध मानवी समाजाची स्थापना करणे हे तुमचे इतिहासदत्त कार्य आहे. इतिहास तुमच्या पाठीशी आहे आणि उज्वल भवितव्य तुमच्या पुढे आहे. उठा आणि लढा. " ह्याच स्वरूपाचे आवाहन ज्योतिबांनी 'शूद्रादि अतिशूद्रां'ना केले. " तुम्ही शूद्र नाही, कनिष्ठ वर्णाचे, अशुद्ध, ज्ञानाचा अधिकार नसलेले असे तुम्ही नाही. तुम्ही असे आहात अशी जी तुमची समजूत आहे ती ब्राह्मणांनी आपमतलबाने आणि कपटाने रचलेल्या धर्मग्रंथामुळे झाली आहे. पण हे धर्मग्रंथ हे एक थोतांड आहे. तुम्ही माणसे आहात, इतर कुणाही माणसाइतकाच स्वातंत्र्याचा आणि सुखाचा अधिकार असलेली माणसे तुम्ही आहात. स्वतःचे हे स्वरूप तुम्ही ओळखले की तुमच्या ' कृत्रीमी ' बेड्या गळून पडतील, तुम्ही मुक्त व्हाल व सुखी व्हाल."

पण ह्या आवाहनात जोतिबांनी एक वेगळा सूर मिसळला होता. त्यांचे आवाहन केवळ माणुसकीच्या अधिकारांपासून वंचित करण्यात आलेल्या माणसांना नव्हते; आणि 'तुमच्यावर लादलेल्या अज्ञानापासून आणि गैरसमजुतीपासून मुक्त व्हा आणि स्वतःचे स्वाभाविक अधिकार प्राप्त करून

घ्या ' एवढेच सांगण्यापुरते नव्हते. त्यांचे पुढे असें म्हणणे होते की 'तुम्ही शूद्रातिशूद्र, ह्या देशातील बहुसंख्य लोक, तुम्ही ह्या देशाचे मूळ रहिवासी आहाच. भारत हे बळिस्थान आहे. तुम्ही, ह्या बळिस्थानातील मूळ रहिवासी, मूळ क्षत्रिय होता, पण इराणी आर्यांनी तुमच्यावर स्वारी केली, शस्त्रबळाने आणि कपटाने तुम्हाला जिंकिले, तुम्हाला शूद्र बनविले, कृत्रिम धर्मग्रंथ रचून तुम्हाला विद्या शिकू दिली नाही. आणि तुम्हाला गुलाम बनविले. आर्यभट ब्राह्मण हे ह्या देशात उपरे आहेत. तुम्हाला स्वतंत्र व्हायचे आहे ते ह्या उपऱ्या ब्राह्मणांपासून,' ( पृ. ३६८–३६९, ) तेव्हा शूद्रातिशूद्रांचा ब्राह्मणांविरुद्ध चाललेला लढा हा केवळ माणुसकीच्या हक्कांसाठी चाललेला लढा नव्हता. 'बळिस्थाना' तील जनतेने परकीय, 'इराणी' आक्रमणाविरुद्ध स्वतःच्या स्वातंत्र्यासाठी चालविलेलाही तो लढा होता. लढणारे ही केवळ ज्यांचे माणुसकीचे हक्क हिरावून घेण्यात आले आहेत अशी माणसे नव्हती. ज्यांना परक्यांनी शूद्र बनविले होते असे ते क्षत्रिय होते.

एकोणिसाव्या आणि विसाव्या शतकांत बळिस्थानातील शूद्रांनी ( म्हणजे भारतातील बहुसंख्य जनतेने ) समान मानवी हक्कांसाठी ब्राह्मणांच्या सामाजिक सत्तेविरुद्ध चालविलेला लढा हा काही अंशी परक्या लोकांनी ( इराणी आर्यभटांनी ) केलेल्या आक्रमणाविरुद्ध करण्यात येणारा लढा होता असे जर मानले तर भारतात स्थापन झालेल्या ब्रिटिश सत्तेकडे पाहण्याचा दृष्टिकोनच बदलतो. ब्रिटिशांचे राज्य ह्या देशात प्रस्थापित झाल्यामुळे भारतीय जनतेचे राजकीय स्वातंत्र्य संपुष्टात आले, तिला राजकीय पारतंत्र्य प्राप्त झाले असे मानणे गैर ठरेल. कारण बहुसंख्य भारतीय जनतेला कोणतेच स्वातंत्र्य नव्हतें; सामाजिक स्वातंत्र्य नव्हतें आणि राजकीय स्वातंत्र्यही नव्हते. तेव्हा बहुसंख्य भारतीय जनतेच्या दृष्टीने ब्रिटिश राज्य स्थापन झाल्यामुळे घडले ते एवढेच की एक परकीय सत्ताधीश जाऊन दुसरा आला. शिवाय हा दुसरा परकीय सत्ताधारी आपल्या सत्तेचा वापर शूद्रादि अतिशूद्रांचे विमोचन करण्यासाठी म्हणून आला आहे. "... त्याने ( निर्माणकर्त्याने ) प्रत्यक्ष अतिरानटी देशेपासून इंग्लिश लोकांस उदयास आणून शौर्यादि गुण त्यांचे अंगी देऊन, त्यांस पंगु शूद्रादि अतिशूद्रांस धूर्त आर्यभट्टांच्या **दासत्वापासून मुक्त करण्याकरितां या देशांत मुद्दाम पाठविलें आहे.** त्यांपैकी कांहीं सज्जन इंग्रज लोक त्यांच्या धर्मातील एका सत्पुरुषाच्या सद्बोधावरून शूद्रादि अतिशूद्रांस आर्यभट्टांच्या **कृत्रिम दासत्वापासून मुक्त करण्याचे कामीं मनःपूर्वक सतत प्रयत्न करीत आहेत.**" ( पृ. ३६९–७० )

ज्योतिबांची भूमिका साररूपाने अशी मांडता येईल : जेव्हा कधी प्राचीन काळी भारतात वर्णभेद आणि वर्णवर्चस्व यांच्यावर आधारलेला समाज अस्तित्वात आला आणि शूद्रांना ज्ञानापासून दूर ठेवण्यात आले तेव्हापासून ह्या बळिस्थानातील बहुसंख्य जनता– येथील मूळची जनता– गुलामगिरीच्या खोड्यात अडकलेली आहे. शिवाय ही गुलामगिरी त्यांच्यावर परकीयांनी, भारतीयेतरांनी, 'आर्यां'नी लादलेली गुलामगिरी होती. तेव्हा फार पूर्वीपासूनच भारतीय जनता 'राष्ट्रीय,' राजकीय स्वातंत्र्य आणि सामाजिक स्वातंत्र्य ह्या दोहोंनाही मुकलेलीच होती. पुढे जेव्हा मुसलमानांनी ह्या देशावर स्वारी करून आपला अंमल बसविला तेव्हा भारतीय जनतेच्या दृष्टीने एक परकीय राजवट जाऊन दुसरी आली. पण ही दुसरी, मुसलमानीं राजवट जनतेच्या दृष्टीने अधिक हितकर होती; किंबहुना भारतीय जनतेचे सामाजिक विमोचन घडवून आणण्याचें पवित्र व ऐतिहासिक कार्य मुसलमानांनी केले. हें कार्य करायला मुसलमान पात्र होते आणि हे कार्य ते करू शकले ह्याचे कारण असे की सर्वांचा निर्माणकर्ता एक आहे, त्याने निर्माण केलेली सर्व माणसे एकमेकांची भावंडे आहेत आणि हे धर्मज्ञान प्राप्त करून घेऊन त्याप्रमाणे आचरण करण्याची मोकळीक सर्वांना आहे हे इस्लामचे मूलभूत सिद्धांत आहेत. " कृत्रिमी आर्य भूदेव नटांच्या आपमतलबी बनावट धर्माच्या पाशांत सापडलेल्या बहुतेक अज्ञानी मूर्तीपूजकांचे कल्याण होण्यासाठी कित्येक धार्मिक जाहामर्द मुसलमानांनी आपल्या हातावर शिरें घेऊन तलवारीच्या जोरानें त्यांनी आपल्यासारख्या त्यांच्या सुंता करून त्यांस 'बिसमिल्ला हिर रहिमान् निरंहिम' असा महापवित्र

कलमा पढवितात व त्यास आपल्या सर्वांच्या सरळ सत्य धर्ममार्गावर नेतात. कारण महंमदी लोकांच्या पवित्र कुराणांत एकंदर सर्व प्राणीमात्रांचा निर्माणकर्ता खुद्द खासा एक आहे आणि याच कारणामुळें त्यास खुदा म्हणतात व त्या खुदाने निर्माण केलेल्या मानवांस एकमेक भावंडांप्रमाणे मानितात. त्याचप्रमाणे एकंदर सर्व मानवांस त्यांचे पवित्र कुराण वाचून पाहण्याची व त्यांचप्रमाणे आचरण करण्याची मोकळीक आहे, तसेच ते सर्वांस आपल्या बरोबरीचे हक्क देऊन त्याजबरोबर रोटी व बेटी व्यवहार सुरू करण्याची मोकळीक देतात, आणि अखेरीस त्या सर्वांस आपल्या सर्वांच्या खुद्द निर्मीकाचे आभार मानण्याकरिता महिझीतींत आपल्याबरोबर घेऊन बसतात." (पृ. ३८३). शूद्र माणूस धर्म पालटून मुसलमान झाला की हिंदू धर्माने त्याच्यावर लादलेली धार्मिक गुलामगिरी नष्ट होते, आणि समान आणि स्वतंत्र माणसाचा सामाजिक दर्जा त्याला प्राप्त होतो. शूद्राला सक्तीने मुसलमान बनविले तरी त्याच्यात त्याचे विमोचन असते; मुक्त व्हायला त्याला भाग पाडण्यात आले आहे एवढाच त्याचा अर्थ असतो.

पण हे पवित्र कार्य मुसलमानांनी अर्धवटपणे पार पाडले. ह्यामुळे ह्या देशांतील शूद्रांचे पुरते विमोचन करण्यासाठी इंग्लिश लोकांना ह्या देशात पाठविणे निर्मीकाला भाग पडले. भारतातील ब्रिटिश राज्य हे भारतीय शूद्र जनतेच्या, म्हणजे खऱ्याखुऱ्या भारतीय जनतेच्या धार्मिक आणि सामाजिक विमोचनाचे ईश्वरी साधन आहे. शूद्रांना ज्ञान मिळविण्याचे स्वातंत्र्य आणि संधी देऊन, सामाजिक अधिकाराची स्थाने त्यांच्यासाठी खुली करून, राज्यव्यवस्थेतून जातिभेद वर्ज्य करून ब्रिटिश राज्यकर्ते हे सामाजिक विमोचन घडवून आणीत होते. आता शूद्रांना हजारो वर्षे अज्ञानात ठेवले गेल्यामुळे परंपरेने शिक्षित असलेल्या लोकांच्या पातळीपर्यंत यायला त्यांना वेळ लागेल. "... त्यांच्यांत मामलेदाराच्या कचेरींत खालच्या कारकुनाचेंसुद्धा काम चालविण्यापुर्ती एकास विद्या आली नसतां (पृ. ४०८)" जर ब्रिटिशांनी 'एतद्देशीयां'ना समान राजकीय हक्क दिले असते तर शूद्रांना ह्या अधिकारांचा काही उपयोग झाला नसता, ते केवळ औपचारिक अधिकार राहिले असते आणि हे राजकीय स्वातंत्र्य फक्त आर्यभटांच्या पदरात पडले असते. म्हणून, भारताच्या राष्ट्रीय स्वातंत्र्यासाठी चळवळ करणाऱ्या किंवा भारतीयांना अधिकाधिक राजकीय हक्क मिळावे, लोकशाही रुजविणाऱ्या म्युनिसिपॅलिटीसारख्या संस्था येथे निर्माण व्हाव्या, भारतीयांना त्यांच्या पात्रतेनुसार सरकारात अधिकाराच्या जागा मिळाव्या ह्यासाठी प्रयत्न करणाऱ्या इंडियन नॅशनल काँग्रेस किंवा सार्वजनिक सभा ह्यासारख्या संस्थांना जोतिबांनी कडाडून विरोध केला. भारतीय जनतेच्या नावाने चाललेल्या ह्या चळवळीमागे वर्णीय, जातीय हिताची प्रेरणा होती अशी त्यांची खात्री होती. '... मोघम नांव हिंदूंचे आणि उपभोग घेणारे एकटे ब्राह्मण ! वाहावा रे सभा !' (पृ. ४०७). '... न्याशनल काँग्रेसांत समंजस असा शूद्रादि अतिशूद्र कधींच सभासद होणार नाहीं, असें मी खात्रीनें सांगतों. कारण, तसें केल्यानें आमच्या मायाळू इंग्रज सरकारचें शूद्रादि अतिशूद्रांविषयीं मन विटणार आहे." (पृ. ४०७) ब्राह्मसमाज व प्रार्थनासमाज ह्यासारख्या पारंपरिक धर्माची सुधारणा करू पाहणाऱ्या चळवळींनाही त्यांनी विरोध केला. 'अज्ञानी शूद्रादि अतिशूद्रांच्या परिश्रमाच्या करपट्टींतून धूर्त आर्य भटब्राह्मणांची मुलें जेव्हां शाळांनीं विद्वान झालीं तेव्हां त्यांच्या पूर्वजांनीं बाह्यात्कारी धर्मसंबंधीं, परंतु आंतून शुद्ध राजकीय, रचलेल्या ब्रह्मगारुडावर केवळ झांकण घालण्याकरितां कपटानें सध्या आपला बचाव करण्यास्तव आपल्या डोळ्यांवर कातडीं ओढून मोठ्या धांदलीने त्यांनीं ब्रह्मसमाज व प्रार्थनासमाज उभारले आहेत व त्यांनीं त्या समाजांत एकंदर सर्व ख्रिस्ती धर्माचें उष्टेंमाष्टे चोरून छापून गोळा केलें आणि त्यांनीं आपल्या कल्पित ब्रह्माजीच्यापुढें डोळे झांकून बाकीच्या अज्ञानी शूद्रादि अतिशूद्रांच्या मनांत पुनः एक तऱ्हेचा ब्रह्मघोळ करण्याची खटपट सुरू केली आहे." ब्राह्मसमाज व प्रार्थनासमाज ह्यांच्यामागच्या प्रेरणांचे जोतिबांनी केलेले हे वर्णन अनुदार तर आहेच पण त्याच्यात आर्यभटांविषयीचा आकसही दिसून येतो. जोतिबांनी इंग्रजसरकारला निःपक्षपाती पण भोळसट म्हटले आहे. इंग्रज राज्यकर्त्यांना हे वर्णन अतिशय समाधानकारक आणि








उपयुक्त वाटले असणार. कावेबाज माणसाला जर आपण भोळसट आहोत अशी इतरांची कल्पना करून देता आली तर ते त्याचे सर्वात श्रेष्ठ यश आहे असे म्हटले पाहिजे. चातुर्वर्ण्याच्या सामाजिक रचनेला धार्मिक प्रामाण्य देण्यामागील ब्राह्मणांचा स्वार्थ आणि 'कावा' जोतिबांनी बरोबर हेरला पण आधुनिक पाश्चात्य साम्राज्यशाहीमध्ये वांशिक उद्दामपणा आणि अरेरावी, निर्घृण स्वार्थ आणि दुटप्पीपणा होता त्याची कल्पनाच त्यांना आली नाही. किंवा पाश्चात्य संस्कृतीशी झालेल्या परिचयातून भारतीयांना विवेकवादी विचारांची जी ओळख झाली होती त्यांत वैचारिक परिवर्तन घडवून आणण्याचे, सामाजिक व्यवस्थेत क्रांतिकारक बदल घडवून आणू पहाणाऱ्या शक्ती मोकळ्या करण्याचे केवढे सामर्थ्य होते हेही त्यांना समजले नाही. सामाजिक परिवर्तन घडवून आणण्याच्या कामात कोण आपले प्रामाणिक साथीदार होऊ शकतील हे त्यांना हेरता आले नाही. न्याय्य समाज सर्व व्यक्तींच्या समान प्रतिष्ठेवर आधारला असला पाहिजे हा विचार जोतिबांनी 'शूद्रां'ना देऊन भारतीय समाजाची पुनर्रचना करण्याचे एक परिणामकारक आयुध त्यांच्या हाती दिले. पण ब्राह्मण हे परके, अभारतीय, 'आर्य,' इराणी आहेत ह्या गोष्टीवर सतत भर देऊन सामाजिक पुनर्रचनेच्या कार्याला वांशिक कलहाचे रूपही दिले आणि ब्राह्मणद्वेषाचे कोलितही त्यांनी 'शूद्रां'च्या हाती दिले. नेहमी घडते त्याप्रमाणे विधायक आयुधापेक्षा विनाशक कोलित अधिक प्रभावी ठरले.

ह्या संदर्भात आणखी एक मुद्दा ध्यानी घेणे आवश्यक आहे. वर्गविहीन समाज निर्माण करण्याची प्रेरणा आणि कुवत कामगारवर्गाच्या ठिकाणीच असते असे मार्क्स जे म्हणतो त्याचे कारण असे की कामगारवर्ग सर्व गमावून बसलेला असतो, एक विशिष्ट वर्ग म्हणून त्याचे स्वतःचे असे हित असत नाही व म्हणून तो समाजाशी एकात्मता पावू शकतो. जोपर्यंत कोणत्याही वर्गाला एक विशिष्ट वर्ग म्हणून आपले स्वतःचे हित साधता येणे शक्य असते तोपर्यंत तो आपल्या वर्गीय हिताचा परिपोष करण्यासाठी झटत असतो आणि त्याचे वर्गीय हित आणि समाजहित ह्यांच्यात भेद असतो. प्रसंगी हे वर्गीय हित समाजहिताशी संवादी ठरते, प्रसंगी विरोधी ठरते पण ही दोन हिते भिन्न असतात. कामगारवर्गाचे ऐतिहासिक स्थान वैशिष्ट्यपूर्ण असते कारण सामाजिक विकासाच्या एका टप्प्यावर त्याचे स्वतःचे असे वर्गीय हित साधण्याची शक्यताच उरत नाही आणि म्हणून सामाजिक हित व वर्गीय हित यांमधील भेद लोप पावतो. आता ह्याच न्यायाने असे म्हणता येईल की चातुर्वर्ण्याच्या चौकटीत ज्या वर्णाला प्रतिष्ठा पूर्णपणे नाकारलेली असते त्या वर्णाला माणूस म्हणूनच आपली प्रतिष्ठा प्रस्थापित करावी लागते आणि ह्यासाठी त्याला चातुर्वर्ण्याची चौकट फोडावी लागते. आणि माणूस म्हणून जेव्हा व्यक्तीची प्रतिष्ठा प्रस्थापित होते तेव्हा सर्व व्यक्तींची माणूस म्हणून समान प्रतिष्ठा असते हे तत्त्वही प्रस्थापित होते. पण चातुर्वर्ण्याच्या चौकटीत ज्या वर्णाला विशिष्ट प्रतिष्ठा असते तो आपली प्रतिष्ठा सांभाळण्याचा व वाढविण्याचा प्रयत्न करील आणि हा प्रयत्न चातुर्वर्ण्याच्या चौकटीत होत असल्यामुळे ह्या चौकटीला त्याच्यामुळे मजबुतीही येईल. उदा. क्षत्रियांची प्रतिष्ठा ब्राह्मणांच्या प्रतिष्ठेपेक्षा कमी असली तरी वैश्यांच्या प्रतिष्ठेपेक्षा अधिक असते. तेव्हा क्षत्रिय ब्राह्मणांची श्रेष्ठ प्रतिष्ठा नाकारण्याचा प्रयत्न करतील व ह्यापुरते त्यांचे व वैश्यांचे जुळेलही. परंतु वैश्यांच्या स्वतःची प्रतिष्ठा वाढविण्याच्या प्रयत्नांना ते विरोध करतील पण हे सर्व सहकार्य व विरोध चातुर्वर्ण्याच्या चौकटीतच होत राहतो. आता जोतिबांनी 'शूद्रादि अतिशूद्रांस' माणूस म्हणून स्वतःचे समान अधिकार व स्वातंत्र्य प्रस्थापित करा एवढेच आवाहन केले नाही. त्यांच्या मूळच्या 'क्षत्रियत्वा'चीही त्याना आठवण करून दिली. 'बलिस्थानांतील मूळच्या क्षत्रियांस म्हणजे शूद्रादि अतिशूद्रांस **आर्यांनी विद्या देण्यास प्रतिबंध केला.**' (पृ. ३६८). 'परंतु बलिस्थानांतील लोक एकंदर सर्व प्रजेस क्षत्रिय म्हणत असत' (पृ. ३६९). अर्थात् हे 'क्षत्रियत्व' म्हणजे केवळ क्षेत्रस्थ असणे होते. जोतिबांच्या म्हणण्याप्रमाणे 'क्षत्रिय' शब्दाचे दोन मूळ दोन अर्थ होते. 'आर्य' समाजातील 'शिपायांचा धंदा' करणारे ते क्षत्रिय आणि बलिस्थानातील मूळचे रहिवासी, 'क्षेत्रस्थ' जे होते ते क्षत्रिय. शूद्रादि अतिशूद्र हे दुसऱ्या

अर्थाने क्षत्रिय होते. 'क्षत्रिय शब्दाचे मूळ दोन अर्थ होत असल्यामुळे धूर्त आर्यांस अशा तऱ्हेचा गोंधळ कल्पितां आला' असे जोतिबांनी म्हटले आहे. (पृ. ३६९). पण ह्या गोंधळाचा फायदा घेऊन शूद्रांतील एखाद्या वर्गाला, म्हणजे जातीला, आपण पहिल्या अर्थाने क्षत्रिय होतो, चातुर्वर्ण्यांतर्गत क्षत्रिय होतो, पण ब्राह्मणांनी आपल्याला शूद्र बनविले असे मानण्याचा मोह झाला तर तेही समजण्यासारखे होते. ब्राह्मणेतर चळवळीत पुढे ज्या विकृती निर्माण झाल्या त्याचे मूळ काहीसे जोतिबांच्या विवेचनात आहे.

सर्व जगाचा आणि म्हणून सर्व माणसांचा निर्माण-कर्ता एक आहे, सर्व माणसे एकाच निर्मीकाची अपत्ये असल्यामुळे ती एकमेकांची भावंडे आहेत आणि म्हणून सर्व माणसांनी एकमेकांशी बंधुभाव बाळगला पाहिजे व त्याला अनुसरून वागले पाहिजे हे सार्व-जनिक सत्यधर्माचे मूलभूत सिद्धांत आहेत. जगाचा निर्मीक आहे ह्याला जोतिबा कोणते प्रमाण देतात? ह्याचे उत्तर असे आहे की ते ह्याला कोणतेच प्रमाण देत नाहीत, जगाचा निर्मीक असला पाहिजे ही गोष्ट ते गृहीत धरून चालतात. यशवंतराव फुले जो प्रश्न उपस्थित करतात तो असा की 'तर आपल्या या सूर्यमंडळासह आपण वस्ती करणाऱ्या पृथ्वीचा निर्माणकर्ता कोण आहे?' ते ह्याहीपेक्षा प्राथमिक असलेला प्रश्न, 'पृथ्वीचा निर्माणकर्ता असा कुणी आहे का?' हा प्रश्न उपस्थित करीत नाहीत. निर्मीकाचे साक्षात् दर्शन, साक्षात् ज्ञान कुणाला होऊ शकत नाही असे जोतिबांचे ठाम मत आहे. तेव्हा निर्मीकाच्या अस्तित्वाचे आणि स्वरूपाचे ज्ञान केवळ तर्काने होऊ शकेल.

तार्किक ज्ञान प्रमाण कधी असते ह्याचे जोतिबांनी विवेचन केले आहे. "तर्क या शब्दाचे तीन प्रकारचे अर्थ होतात. १ ला प्रकार – प्रत्यक्ष कर्त्यावरून कर्माचे आणि कर्मावरून कर्त्याचे ज्ञान होते. २ रा-प्रकार–पदार्थांच्या लक्षणदर्शनांवरून कर्मांचे जे ज्ञान होते ते. ३ रा प्रकार – अनेक गोष्टींविषयी अनेक प्रकारचे मात्र अंतःकरणाचे आकार म्हणजे तरंग होतात, ज्यामध्यें निश्चयरूपता असत नाही.

प्र. – १ ला प्रकार कर्त्यांवरून कर्मांचे आणि कर्मांवरून कर्त्यांचे ज्ञान होते ते कसे?

उ.– कातणीनें जाळें केलें, पाकोळीनें कोठें बांधिलें, आणि मनुष्यानें शस्त्र केलें या वाक्यात जाळें, कोठें आणि शस्त्र, यांचे कर्ते कातन, पाकोळी आणि मनुष्य व त्याचप्रमाणे कातन, पाकोळी आणि मनुष्य यांचें कर्म जाळें, कोठें आणि शस्त्र होत, असें ज्ञान होतें.

प्र.– २ रा प्रकार– पदार्थांच्या लक्षण दर्शनावरून कर्माचें जें ज्ञान होतें, तें कसें?

उ.– आपणांस कर्त्यांच्या लक्षणावरून कर्माचें ज्ञान होतें. यावरून त्यांचे कर्ते अदृश्य असावेत असें अनुमान होते. जसें– वायूनें जहाज बुडालें, विजेनें मनुष्य मेला व मनानें कुतर्क घेतले, या वाक्यांत जहाज, मनुष्य व कुतर्क यांचे कर्ते वायु, विज व मन होत व त्याचप्रमाणे वायु, विज आणि मन ह्यांचे कर्म जहाज, मनुष्य आणि कुतर्क होत, असें ज्ञान होतें.

प्र०– ३ रा प्रकार– अनेक गोष्टींविषयीं अनेक प्रकारचे जे अंतःकरणाचे आकार म्हणजे तरंग होतात, ज्यामध्यें निश्चयरूपता असत नाही त्याविषयीं कसें?

उ०– ज्यामध्यें कर्त्यावांचून कर्म असतें व त्याच्या साक्षात्काराविषयीं अथवा लक्षणांविषयीं काहीच ज्ञान होत नाही. (पृ. ३८५,३८६).

ह्याचा अर्थ असा स्पष्ट करता येईल: एखादा माणूस शस्त्र घडवीत असताना आपण प्रत्यक्ष पाहू शकतो. तेव्हा एखाद्या ठिकाणी जर आपल्याला एखादे शस्त्र आढळले तर कुणातरी माणसाने ते बनविलेले असणार असा तर्क आपण करू शकतो, हा पहिल्या प्रकारचा, प्रत्यक्षानुभवावर आधारलेला तर्क होय. पण एखाद्या माणसाला शस्त्र घडवीत असताना आपण जसे प्रत्यक्ष पाहू शकतो त्याप्रमाणे वीज कुणाला तरी धक्का देऊन ठार मारीत आहे हे आपण प्रत्यक्ष पाहू शकत नाही. आपण वीज प्रत्यक्ष पाहू शकत नाही. आपण केवळ विजेची कल्पना करू शकतो. विज्ञानात अशा इंद्रि-यातीत, म्हणजे ज्यांचे आपण साक्षात् निरीक्षण करू शकत नाही अशा, पदार्थांची आणि शक्तींची कल्पना आपण करतो. अशा इंद्रियातीत पदार्थांची व शक्तींची कल्पना करून त्यांच्या साहाय्याने निरीक्ष-णाने माहीत झालेल्या घटनांचा उलगडा आपण विज्ञानात करतो. इलेक्ट्रान, वीज, चुंबकीय आकर्षण हे असे विज्ञानात कल्पिण्यात आलेले इंद्रियातीत







FOUR SQUARE KINGS

**All the taste, all the way**

India's largest-selling kingsize filter cigarettes.

STATUTORY WARNING: CIGARETTE SMOKING IS INJURIOUS TO HEALTH

LINTAS-FSK.G.42

अनुक्रमणिका








# How an international bank born and bred in India helps Indian business grow at home and abroad



Grindlays. Partners in India's progress for the last hundred and twenty years. With 56 branches in 14 cities in India. Grindlays offer comprehensive banking services, financial assistance and advice to industry.




With branches and associates in 33 other countries, our Export Information Services can help locate new markets for your products, so the country earns valuable foreign exchange.



Our Merchant Banking Division offers complete corporate and finance advisory and consultancy services to industries large and small.



Helping Indian business in more than one way has always been our credo— while we and the country grow.

In India—Amritsar, Bangalore, Bombay, Calcutta, Cochin, Darjeeling, Delhi, Gauhati, Hyderabad, Kanpur, Madras, New Delhi, Simla, Srinagar, Tuticorin. And in 33 other countries.



**Grindlays Bank Limited**

Incorporated in the United Kingdom. The liability of members is limited.

## The international bank at the nation's service

ASP/R 1075/4UA










पदार्थ व शक्ती होत. पाण्याचा प्रवाह जसा आपल्याला प्रत्यक्ष दिसतो तशी एखाद्या तारेतून वीज वहात जाताना दिसत नाही. विजेची आपण केवळ कल्पना केलेली असते. पण विज्ञानात अशा कल्पना करताना आपण एक विशिष्ट बौद्धिक शिस्त पाळीत असतो. विजेच्या स्वरूपाची आपण निश्चित कल्पना केलेली असते. म्हणजे वीज म्हणजे अमुक अमुक विशिष्ट धर्म अंगी असलेला पदार्थ अशी कल्पना आपण केलेली असते. पुढे विजेच्या ठिकाणी हे विशिष्ट धर्म असल्यामुळे विजेचा प्रवाह जर अमुक प्रकारच्या परिस्थितीत वहात असेल तर पुढील इंद्रियगोचर, (निरीक्षणगम्य), परिणाम घडून येतील असे अनुमान आपण करतो. विजेच्या ठिकाणी ज्या धर्मांची कल्पना आपण करतो, ते ज्यांच्यावर अशी अनुमाने आधारता येतील, असे असावे लागतात. म्हणजे अमुक वर्णनाच्या परिस्थितीत जर विजेचा प्रवाह वहात असेल तर अमुक, अमुक इंद्रियगम्य परिणाम घडून येतील, वेगळ्या प्रकारच्या परिस्थितीत जर विजेचा प्रवाह वहात असेल तर अमुक, अमुक इंद्रियगम्य परिणाम घडून येतील ह्या प्रकारची अनुमाने ज्यांच्यावर आधारता येतील असे हे धर्म असावे लागतात. मग अशा वेगवेगळ्या परिस्थितीत विजेचा प्रवाह वहात असताना हे अनुमान केलेले इंद्रियगम्य परिणाम घडून येतात की नाहीत ह्याचा प्रत्यक्ष निरीक्षणे करून आपण पडताळा घेतो. जर अनुमान केलेले हे सर्व परिणाम घडून येतात असे आपल्याला आढळून आले तर आपण कल्पना केलेला वीज असा पदार्थ आहे, आपण कल्पना केलेले धर्म त्याच्या ठिकाणी आहेत असे मानायला आधार आहे असा निर्णय आपण करतो. अशा इंद्रियातीत पदार्थांची व शक्तींची कल्पना करणे हा वैज्ञानिक अभ्युपगमाचा ( hypothesis ) एक प्रकार आहे आणि अशा अभ्युपगमांपासून निष्कर्ष काढून निरीक्षणाने त्यांचा पडताळा घेणे आणि ह्या कसोटीला ते उतरले तर ते प्रस्थापित झाले असे मानणे असे वैज्ञानिक पद्धतीचे स्वरूप असते. म्हणून वैज्ञानिक पद्धतीचे अभ्युपगम-निगामी (hypothetics-deductive) असे वर्णन करण्यात येते.

प्रत्यक्षाधिष्ठित तर्क आणि वैज्ञानिक तर्क ह्या दोन्ही प्रकारच्या तर्कांचे प्रामाण्य जोतिबा मान्य करतात. पण तिसऱ्या प्रकारचा तर्क, म्हणजे माणसाने निरंकुश, मुक्त रीतीने केलेला कल्पनांचा खेळ, ह्या स्वरूपाचा तर्क, अनुभवाच्या कसोटीवर ज्याचे परीक्षण करण्याचा मार्ग नसतो असा तर्क, त्यांना अमान्य आहे. उदा. ह्या दृश्य जगामागे आनंदमय असे अनंत ब्रह्म आहे हा तर्क अशा प्रकारचा आहे. जोतिबांच्या मते ब्रह्म हे केवळ 'ब्रह्मगारुड' आहे.



पण निर्मीक आहे हा तर्क कोणत्या प्रकारचा आहे ? तो पहिल्या प्रकारचा नाही हे उघड आहे. कुंभाराला मडके बनविताना आपण अनेकदा पहातो. पण निर्मीकाला जग घडविताना कुणी कधी पाहिलेले नाही. मग हा दुसऱ्या प्रकारचा तर्क आहे काय ? निर्मीक आहे असे अनुमान करायला काय आधार आहे हे जोतिबांनी स्पष्ट केलेलेच नाही असे आपण वर म्हटले आहे. पण जगाचा निर्मीक आहे असा निष्कर्ष सिद्ध करू पाहणारे युक्तिवाद तत्त्वज्ञानात अनेकदा मांडण्यात आले आहेत. हे साधारणपणे दोन प्रकारांत मोडतात. एक प्रकार असा : हे जग 'यादृच्छिक' ( contingent ) आहे. म्हणजे ते प्रत्यक्ष अस्तित्वात असले तरी ते अस्तित्वात नसणेही शक्य होते अशा स्वरूपाचे ते आहे. तेव्हा ते अस्तित्वात का आले ह्याचे त्याच्या पलीकडचे असे कारण असणार आणि हे कारण म्हणजे ज्याचे अस्तित्व स्वतः सिद्ध आहे असे असणार. नाहीतर जगाच्या अस्तित्वाविषयी जो प्रश्न उपस्थित झाला तो ह्या कारणाच्या अस्तित्वाविषयीही उपस्थित होईल. जगापलीकडचे जगाचे जे स्वतःसिद्ध असे कारण आहे तो निर्मीक. दुसऱ्या प्रकारचा युक्तिवाद जगात आढळणाऱ्या सहेतुक रचनेवर आधारलेला असतो. जगात हेतुपूर्ण अशी रचना आढळते. जोतिबांच्या शब्दांत, "एकंदर सर्व प्राणीमात्रांस पाण्याचा यथास्थित पुरवठा व्हावा, म्हणून निर्माणकर्त्याने याच पृथ्वीच्या पृष्ठभागावर जागोजाग महासागरांची योजना करून ठेविली आहे. व त्या सागरांतील पाणी खराब होऊन सडूं नये यास्तव त्यांत क्षारादाखल मीठ मिसळविलें आहे व चंद्राच्या आकर्षणाच्या योगाने त्यास दिवसांतून एकदा भरतीच्या अथवा ओहोटीच्या संबंधाने चलनवलन होण्याची योजना केली आहे ... ... याशिवाय मानव प्राण्यांचा जन्म झाल्यानंतर त्यांचे बालपणीं निर्वाह होण्याकरिता त्यांच्या मातेच्या

अनुक्रमणिका

स्तनांत तीन दिवसांच्या आत त्यांस दूध पोहचविण्याची योजना केली आहे ... " इ. कित्येक हेतू, उद्दिष्टे, प्रयोजने स्वाभाविकपणे साध्य होतील अशी जी जगाची रचना दिसते ती यांत्रिकपणे कार्य करणाऱ्या अंध निसर्गशक्तींचे फलित असणे शक्य नाही. ही रचना जाणीवपूर्वक, सहेतुकपणेच निर्माण करण्यात आली असली पाहिजे. तेव्हा जगाचे सचेतन, प्राणीमात्रांच्या हिताविषयी आस्था असणारे असे कारण असले पाहिजे. हे जगत्कारण म्हणजे निर्मीक.

ह्या दोन्ही प्रकारच्या युक्तिवादांतील फोलपणा ह्यूम आणि कांट ह्या तत्त्ववेत्त्यांनी निर्णायकपणे स्पष्ट केला होता. पण ह्या युक्तिवादांचा आधार जोतिबांनी घेतलेलाच नाही. ते फक्त निर्मीक आहे असे प्रतिपादन करतात. जगात हेतुपूर्ण रचना आहे ह्यावरून कनवाळू निर्मीकाचे अस्तित्व सिद्ध होते असे अनुमान ते मांडीत नाहीत. निर्मीक आहे असे ते गृहीत धरतात आणि जगात ज्याअर्थी माणसाच्या हिताला अनुकूल अशी सहेतुक रचना आढळते त्याअर्थी निर्मीक कनवाळू आहे हे स्पष्ट होते असे ते मानतात. निर्मीकाविषयी जोतिबांनी स्वीकारलेले सिद्धांत थोडक्यात असे मांडता येतील : ( १ ) निर्मीक आहे. ( २ ) तो अनंत विश्वाचा निर्माता, म्हणून अनंत असल्यामुळे सान्त मानवी बुद्धीला त्याच्या स्वरूपाचे यथार्थ आकलन होणे अशक्य आहे. ( ३ ) तो कनवाळू आहे. ( ४ ) शिवाय तो जगाच्या घडामोडीत हस्तक्षेप करतो. सृष्टीची निर्मिती केली, ज्या नियमांना अनुसरून सृष्टीतील घटना घडत राहिल्या की त्या प्राणिमात्राच्या हिताला उपकारक ठरतील ते सामान्य नियम बसवून दिले आणि नंतर सृष्टीपासून निवृत्त झाला असा जोतिबांचा निर्मीक नाही. तो जगाच्या इतिहासात भाग घेतो. भारतातील शूद्रांना गुलामगिरीच्या जोखडात अडकविणाऱ्या धूर्त आणि आपमतलबी आर्यांचे पारिपत्य करण्यासाठी निर्मीकाने प्रथम 'जहांमर्द' मुसलमानांची योजना केली आणि ते भोगलोलुप झाल्यामुळे ह्या निर्मीकदत्त कार्याची हेळसांड करतात असे जेव्हा त्याला आढळून आले तेव्हा त्याने 'यशवंत ह्या महासत्पुरुषाचे' अनुयायी असलेल्या शूर इंग्रज लोकांना ह्या देशात हे सत्कार्य करण्यासाठी पाठविले.

(इतिहासावरून निर्मीकाच्या स्वरूपाविषयी अनुमान करायचे तर तो बराच आळशी आणि भोळसट असला पाहिजे असे म्हणावे लागते. कारण आर्यांनी शूद्रादि अतिशूद्रांना चातुर्वर्ण्याच्या गुलामगिरीत अडकविल्यानंतर अनेक शतके हा निर्मीक स्वस्थ राहिला, 'जहांमर्द' मुसलमानांना ह्या देशावर पाठवायला त्याने खूपच वेळ घेतला. आणि भारतात सामाजिक समता प्रस्थापित करण्यासाठी त्याने जर 'जहांमर्द' मुसलमानांची निवड केली असेल तर तो भोळा असला पाहिजे, जगाच्या व्यवहाराचे नियमन करण्यासाठी आवश्यक असलेला शहाणपणा त्याच्या ठिकाणी नाही हे स्पष्ट होते. )

पण जोतिबांना आणखी एका कारणासाठी निर्मीकाची आवश्यकता होती असे असणे शक्य आहे. 'सर्व माणसांनी एकमेकाशी भावंडांप्रमाणे वागावे' हे नैतिक तत्त्व ते 'सर्व माणसे एकाच निर्मिकाने निर्माण केली आहेत' ह्या ( आरोपित ) वस्तुस्थितीवर आधारतात. पण ह्या वस्तुस्थितीचा ह्या नैतिक तत्त्वाला काही आधार मिळू शकत नाही. समजा, भावंडांना सर्वसामान्यपणे एकमेकाविषयी आपुलकी वाटते, एकमेकांच्या हिताविषयी आस्था असते अशी वस्तुस्थिती असते हे मान्य केले. ह्याची काही कारणे असतील. उदा. आईबापांची आपल्या अपत्यांवर स्वाभाविकपणे माया असते आणि अपत्ये ह्या मायेला तितक्याच स्वाभाविकपणे प्रतिसाद देतात. ह्यामुळे आपल्या आईबापांची ज्यांच्यावर माया असते त्यांच्यावर—म्हणजे आपल्या भावंडांवर— अपत्ये माया करू लागतात. कुटुंबसंस्थेमुळे आपल्या कुटुंबातील व्यक्तीविषयीची एक विशिष्ट निष्ठा माणसांच्या ठिकाणी जडते, इ. पण अशा काही कारणांमुळे किंवा स्वाभाविक प्रवृत्ती म्हणून जरी माणसांना आपल्या भावंडांविषयी आपुलकी वाटते, त्यांच्या कल्याणाविषयी आस्था वाटते अशी वस्तुस्थिती असली तरी तिच्यामुळे जोतिबांना जे साधायचे आहे त्याला काही साहाय्य होत नाही. 'सर्व माणसांनी एकमेकाविषयी आपुलकी बाळगावी, अशी वृत्ती त्यांना योग्य आहे' हे नैतिक तत्त्व जोतिबांना प्रस्थापित करायचे आहे. आणि एकाच निर्मीकाने सर्व माणसांना निर्माण केले असल्यामुळे ती एकमेकांची भावंडे आहेत ह्या वस्तुस्थितीपासून

ते, ते निष्पन्न करू पहातात. पण ही निष्पत्ती घडून येऊ शकत नाही. 'अ ह्या एकाच पित्याची ब आणि क ही अपत्ये आहेत ' ह्या वस्तुस्थितिनिदर्शक विधानापासून 'ब आणि क ह्यांनी परस्परांवर प्रेम करावे' हे नैतिक-मूल्यात्मक-विधान निष्पन्न होत नाही.

पण जोतिबांना दुसऱ्या एका मार्गाने निर्मीकाची गरज भासली असणे शक्य आहे. चांगल्या नैतिक आचरणाची दोन अंगे असतात हे जोतिबांचे मत आपण वर नमूद केले आहे. सर्व माणसांच्या हितासाठी झटणे हे एक अंग. हे माणसांमधील बंधुत्वाच्या नात्यावर आधारलेले आहे. दुसरे अंग असे की प्रत्येक माणसाला निर्मीकाने काही अविच्छेद्य अधिकार दिलेले आहेत हे ओळखून स्वतःचे सुख साधताना कुणाच्याही अधिकारांवर अतिक्रमण न करणे. ह्यावर अर्थात् ' निर्मीकाने प्रत्येक व्यक्तीला असे अधिकार दिले आहेत हे आपल्याला कसे कळते ?' हा प्रश्न उपस्थित होतो. तो बाजूला सारू. दुसरा प्रश्न असा की समजा निर्मीकाने प्रत्येक व्यक्तीला हे अधिकार दिले असले तरी माझे सुख साधताना मी त्यांच्यावर अतिक्रमण का करू नये ? ह्या प्रश्नाचे एक उत्तर असे की असे अतिक्रमण मी करू नये कारण ते माझ्या अहिताचे ठरेल. इतरांच्या अधिकारांवर मी अतिक्रमण केले तर निर्मीक मला शासन करील व म्हणून अतिक्रमण करून माझ्या सुखात मी जेवढी भर घालीन त्याहून अधिक दुःख निर्मीकाने केलेल्या शासनामुळे मला भोगावे लागेल. नीतिशास्त्रातील एक परिचित भूमिका अशी की नीतीने वागणे म्हणजे ईश्वराने दिलेल्या आदेशांना अनुसरून वागणे, आणि असे वागणे योग्य असते कारण ते वागणाऱ्याच्या हिताचे असते. आपण नीतीने वागलो तर ईश्वर आपल्याला बक्षीस देतो आणि अनीतीने वागलो तर शिक्षा करतो. तेव्हा, एकंदर हिशोब केला तर, नीतीने वागल्यामुळे जे सुख टाळावे लागते आणि अनीतीने वागून सुखात जी भर घालता येणे शक्य होते ते सारे जमेस धरून सुद्धा नीतीने वागणे व अनीतीने न वागणे व्यक्तीच्या फायद्याचे असते. आता अनीतीने वागणाऱ्यांना नेहमीच आणि त्यांच्या अनीतीच्या प्रमाणात दुःख भोगावे लागते आणि नीतीने वागणारांना अशाच नियमाला अनुसरून सुख लाभते असे प्रत्यक्ष जीवनात आढळून येत नाही. ह्यामुळे ह्या भूमिकेचे पुरस्कर्ते 'परलोका' चा आश्रय घेतात. ऐहिक जीवनात व्यक्तींना लाभणाऱ्या सुखदुःखाचे प्रमाण कसेही असले तरी मृत्यूनंतर व्यक्तीच्या आत्म्याला ईश्वर तिने ऐहिक जीवनात केलेल्या नैतिक आणि अनैतिक कृत्यांच्या प्रमाणात सुखदुःखांचा अनुभव अनिवार्यतेने देतो. आणि मेल्यानंतर ईश्वराच्या निवाड्याप्रमाणे जी सुखदुःखे अटळपणे आपल्या वाट्याला येतील त्यांचा विचार केला असता नीतीने वागणे हेच व्यक्तीच्या हिताचे असते.

ही भूमिका काही प्रमाणात जोतिबांनी स्वीकारल्यासारखी दिसते. पण जोतिबा परलोक मानीत नाहीत. किंबहुना देह नष्ट झाल्यानंतर टिकून रहाणारा असा आत्मा असतो असे ते मानतात की नाही हे सांगणेही कठीण आहे. ' मृत्यु म्हणजे काय ? ' ह्या प्रश्नाचे त्यानी दिलेले उत्तर असे की, ' एकंदर सर्व प्राणीमात्रांचें देहस्थित प्राण्यांचें जें गमन तें.' ( पृ. ४३० ) ह्या वाक्याचा शब्दशः अर्थ घेतला तर प्राण्यामध्ये देहस्थित असे प्राणतत्त्व असते आणि देहाला सोडून त्याने दुसरीकडे जाणे म्हणजे मृत्यु असे जोतिबांचे म्हणणे आहे असे वाटेल. पण ह्या अर्थाप्रमाणे, आणि हे प्राणतत्व म्हणजे आत्मा असे मानले तर प्रत्येक प्राण्याचा, किड्यामुंग्यांचाही, मृत्यूनंतर टिकून रहाणारा आत्मा असतो असे जोतिबांचे मत आहे असे मानावे लागेल आणि असे त्यांचे मत असणे अतिशय कठीण दिसते. तेव्हा वरील वाक्याचा अर्थ ' कोणताही प्राणी सजीव देह असतो आणि सजीव देह ही त्यांची अवस्था नष्ट होणे म्हणजे त्या प्राण्याचा मृत्यू होय. ' असा लावावा लागेल. ह्या अर्थाप्रमाणे देहभिन्न आत्मा आहे की नाही ही गोष्ट संदिग्ध रहाते. पण मृत्यूच्या वेळी करण्यासाठी म्हणून त्यांनी जी प्रार्थना दिली आहे ती अशी आहे. " या तुझ्या अमर्याद, विस्तीर्ण पोकळीमध्ये अनंत सूर्यमंडलासहित या पृथ्वीवरील प्राणीमात्रांसह मज मानवास निर्माण करून मला सदसद्विचार करण्याची बुद्धी दिलीस व तुझ्या आज्ञेप्रमाणे सत्यास स्मरून मी या जगांत वर्तन केलें हें तूं जाणतोस, यास्तव तूं माझा अंगिकार करशील, अशी माझी पूर्ण खात्री आहे. " (पृ. ४३३). मृत्यूबरोबर माणसाचे अस्तित्वच जर नष्ट होणार असेल तर निर्मीकाने त्याचा ' अंगिकार ' करण्यात किंवा न

करण्यात काहीच स्वारस्य नाही. माणसाचा 'अंगिकार' होण्यात (किंवा न होण्यात) माणसाचा मरणानंतर टिकून राहणारा असा आत्मा असतो हे अभिप्रेत आहे असे वाटते.

पण जोतिबांना आत्म्याचे अस्तित्व मान्य असो, नसो, परलोकाचे अस्तित्व त्यांनी निश्चितपणे अमान्य केले आहे. 'एकंदर जगांतील सर्व **अज्ञानी** लोक स्वर्ग आहे म्हणून म्हणतात व त्या स्वर्गामध्यें पुण्यवान् मनुष्यांस यावत्काल अनाद्यंत सुख मिळते, तसेंच पातकी मनुष्यांस त्यांच्या पातकाप्रमाणे नर्कात यावत्काल नाना प्रकारच्या यातना भोगाव्या लागतात, याविषयी तुमचे कसे काय म्हणणे आहे ?" ह्या प्रश्नाला त्यांनी दिलेले उत्तर असे की स्वर्ग (आणि अर्थात् 'नर्क') ह्या अंधश्रद्धेवर आधारलेल्या कल्पना आहेत; त्यांना काही प्रामाण्य नाही. "कारण एकंदर सर्व धर्मपुस्तकांत स्वर्ग आहे म्हणून लिहितात; परंतु या पृथ्वीच्या पृष्ठभागावरील एका तरी गृहस्थास स्वतः हा स्वर्ग पाहिला म्हणून सांगता येईल काय ?...एखादा मनुष्य स्वर्ग पहाण्यास गेला व तो परत आला अशी कधीतरी गोष्ट घडून आली आहे काय ?" (पृ. ३५८).

तेव्हा इहलोकात केलेल्या पापपुण्याचे फळ जेथे भोगावे लागते असा परलोक नाही. मग सत्यधर्माला अनुसरून वागणाऱ्यांचा 'अंगिकार' निर्मीक करतो ह्या म्हणण्याचा अर्थ कसा लावायचा हा प्रश्न बिकट होतो. शिवाय 'परलोकां'चा अर्थ परलोक हा एक 'देश' आहे, अवकाशात त्याला कुठेतरी स्थान असले पाहिजे असा जोतिबांनी लावला आहे. आणि असा देश कुठेही आढळून येत नसल्यामुळे ते परलोकाचे अस्तित्व नाकारतात. पण मग निर्मीकाच्या अस्तित्वाविषयीही अडचण निर्माण होते. निर्मीकाचे अस्तित्व ह्या अवकाशात कोणत्या जागी आहे ? निर्मीक हा अवकाशात स्थान असणारा, अवकाश व्यापणारा असा असेल तर ती एक भौतिक वस्तू असणार. निर्मीक अनंत असल्यामुळे तो हा अनंत अवकाश व्यापणारा आहे असे मानले तरी सूक्ष्मशरीरधारी आणि म्हणून अवकाश व्यापणारा पदार्थ असेच निर्मीकाचे स्वरूप आहे असे मानले पाहिजे. (शिवाय अर्थात् निर्मीक चैतन्यस्वरूप आहेच.) आता निर्मीकाला निर्मीक नाही. तेव्हा एकतरी भौतिक-पदार्थ – निर्मीक हा भौतिक पदार्थ– जर निर्माणकर्त्याशिवाय अस्तित्वात असतो असे प्राप्त होते. मग इतर अचेतन किंवा सचेतन भौतिक पदार्थही निर्माणकर्त्यांशिवाय अस्तित्वात असतात किंवा येतात असे मानण्यात काही अडचण येत नाही आणि निर्मीकाच्या अस्तित्वाची आवश्यकता उरत नाही. उलट निर्मीक हा केवळ चैतन्यस्वरूप आहे. आणि अवकाश व अवकाशातील सर्व जड पदार्थ– सचेतन व अचेतन जड पदार्थ– त्याने निर्माण केले आहेत असे मानले तर निर्मीकाचे अस्तित्व 'अवकाशातीत' आहे– निर्मीकाला अवकाशात स्थान नाही– असा त्याचा अर्थ होतो. ह्याच न्यायाने, शरीर नष्ट झाल्यावर आत्म्यांनाही असेच अवकाशातीत अस्तित्व असू शकेल. आणि अशरीरी निर्मीक, अशरीरी आत्मे आणि त्यांचे परस्परसंबंध मिळून 'परलोक' सिद्ध होतो असे म्हणता येईल.

ते कसेही असो. जोतिबांनी परलोक नाकारला आहे. परंतु परलोकाचे जे पारंपरिक व नैतिक कार्य होते ते साधण्यासाठी इहलोकातच परलोकासाठी पर्यायी व्यवस्था केली आहे. '... ईश्वराने परलोक हा प्रत्यक्ष इहलोकींच निर्माण केला आहे.' (पृ. ३६०). म्हणजे निर्मीकाने सृष्टीचा क्रम असा रचिला आहे की जे अनीतीने वागतात त्यांना त्यामुळे इहलोकातच पुरेसे दुःख भोगावे लागते. हे तीन मार्गांनी घडते असे जोतिबांचे म्हणणे दिसते. उदा. जे लोक एकाच स्त्रीशी विवाह करून तिच्याशी एकनिष्ठ रहाणे ही लैंगिक नीती पाळीत नाहीत, जे "**व्यसनी पुरुष** स्वस्त्रीशीं दगेबाजी करून ज्यास्ती सुख होण्याकरितां लोभानें तिच्या उरावर अनेक लग्नाच्या बायका करितात... (त्या) पुरुषांमध्यें नाना प्रकारचे घाणेरडे रोग निर्माण (होतात.)" (पृ. ३६०). दुसरी गोष्ट अशी की 'एकंदर सर्व सृष्टीक्रमावरून असें सिद्ध होतें कीं, आर्यांच्या ऋषीवर्य पूर्वजांनीं केलेल्या नीच कर्मांचीं फळें जरी त्यांस भोगावी लागलीं नाहींत, तरी त्यांच्या दुष्टकर्मांच्या अनुमानाप्रमाणे त्यांच्या संतानांस तरी तीं निःसंशय भोगावीं लागतील." (पृ. ३७१). आणि शेवटी, आपण केलेल्या अनीतीच्या कृत्यांचा मरणकाळी पश्चात्ताप होऊन अतिशय क्लेश होतात. 'अरे! एका मनुष्याने एखाद्या क्षुल्लक अशा मानवाची

अन्यायाने जर हत्या केली, तर आपल्यास किती क्लेश होतात ? त्याचप्रमाणें जुलीयस सीझरानें लक्षावधी प्राण्यांचा जर वध केला, तर त्याला त्याच्या मरणापूर्वी पश्चात्ताप झाल्यामुळें निःसंशय क्लेश झाले असतील, त्याविषयीं येथें सिद्ध करण्याचें प्रयोजन दिसत नाही.'' ( पृ. ४३१ ). आपण जितकी अधिक दुष्कृत्ये करू तितके आपल्याला मरणकाळी अधिक क्लेश होणार.

पण जोतिबांनी परलोकाची जागा घेण्यासाठी म्हणून ज्या इहवादी पर्यायाची तजवीज केली आहे तो फारसा बळकट नाही हे उघड आहे. आपल्या दुष्कृत्यांविषयी मरणकाळी होणाऱ्या पश्चात्तापाचे एक महत्वाचे कारण म्हणजे परलोक आणि त्याच्यात आपल्या दुष्कृत्यांना मिळावयाचे शासन जवळ आले आहे ही जाणीव. 'The Devil was sick, the Devil a saint would be' पण परलोकावर ज्याचा खरोखरच विश्वास नसेल त्याला ह्या कारणामुळे पश्चात्ताप होणार नाही. परलोकावर विश्वास नसणाऱ्या माणसालाही जर तो कोवळ्या अंतःकरणाचा असेल तर स्वतःच्या दुष्कृत्याबद्दल होईल. पण त्यासाठी मरणाची वाट पहायला नको. ज्यावेळी त्याला आपल्या दुष्कृत्यांची तीव्रतेने आठवण होईल, त्या त्या वेळी त्याला पश्चात्ताप होईल. तेव्हा अंतकाळी होणाऱ्या पश्चात्तापाच्या वेदना चुकविण्याचा मार्ग म्हणजे परलोकावरील विश्वास पूर्णपणे सोडून देणे आणि पहिल्यापासून आपले अंतःकरण कठीण निगरगट्ट बनत जाईल असा प्रयत्न करीत रहाणे. त्याचप्रमाणे माणसाने आपल्या आरोग्याची काळजी घेत स्वस्त्रीशी दगेबाजी केली आणि आपल्या संतानांची पर्वा करण्याचे सोडून दिले की त्याला दुष्कृत्यांपासून भय बाळगण्याचे कारण उरत नाही. माणसांच्या वर्तनावरील अंकुश म्हणून सर्वसाक्षी असलेल्या, प्रत्येक व्यक्तीने केलेल्या पापपुण्याच्या प्रमाणात तिला अटळपणे दुःखसुख देणाऱ्या ईश्वराची जागा जोतिबांचा हा ऐहिक सृष्टिक्रम घेऊ शकत नाही हे उघड आहे.

पण जोतिबांच्या लिखाणात एका वेगळ्या वळणाचाही विचार आढळतो. "मनुष्यांनीं आपल्या शेजाऱ्याबरोबर कसें वर्तन करावें," याविषयी प्रत्येक मनुष्यास आपल्या स्वतःच्या अनुभवावरून सहज सिद्ध करतां येतें.' ( पृ. ४०३. ) म्हणजे प्रत्येक माणसाचे काही समान नैसर्गिक अधिकार असतात, स्वतःचे सुख साधताना कुणाच्याही अधिकारावर अतिक्रमण करता कामा नये, इतरांनी आपल्याला जसे वागवावे असे आपल्याला वाटते तसे आपण इतरांना वागविले पाहिजे. इ. मूलभूत नैतिक तत्त्वे प्रमाण आहेत असे स्वाभाविक आकलन आपल्या बुद्धीला होते. म्हणजे ज्याला 'बुद्धीचा नैसर्गिक प्रकाश'– natural light of reason– म्हणण्यात आले आहे त्या प्रकाशात ही तत्त्वे आपल्याला प्रतीत होतात असे जोतिबांचे म्हणणे दिसते. दुसऱ्या शब्दांत ही गोष्ट मांडायची तर ही तत्त्वे स्वतःप्रमाण आहेत, त्यांचे प्रामाण्य आपल्याला प्रातिभज्ञानाने ( intuition ) प्रतीत होते, ह्या तत्त्वांना अन्य आधाराची आवश्यकता नाही अशी जोतिबांची भूमिका आहे. लोभामुळे आपण ही तत्त्वे, त्यांचे प्रामाण्य आपल्याला दिसत असूनही, पाळीत नाही आणि इतरांना दुःखी करतो सर्व माणसांनी 'सत्यास स्मरून' ही तत्त्वे पाळली तर सर्वजण सुखी होतील म्हणजे ह्या तत्त्वांना निर्मीकाचा किंवा दुसऱ्या कुणाचा किंवा दुसरा कसला आधार लागत नाही. नीतीने वागणे म्हणजे कसे वागणे हे प्रत्येक व्यक्तीला माहीत असते आणि तसे वागण्यात तिची माणुसकी, तिची मानवी प्रतिष्ठा असते. नीतीने वागण्यासाठी माणसाला स्वार्थाची लाच देण्याचे किंवा शिक्षेची दहशत घालण्याचे कारण नाही.

सारांश, जोतिबांच्या धर्मविषयक विचारात अनेक काहीसे परस्पर विसंगत असे घटक आहेत पण त्यांची तर्कबद्ध, सुसंगत बांधणी करण्याचे प्रयत्न त्यांनी केलेले दिसत नाहीत. जोतिबा स्वतः तत्त्ववेत्ते किंवा अभ्यासक नव्हते, ते कृतिशील समाजसुधारक होते. तेव्हा त्यांनी ह्या कामाकडे दुर्लक्ष केले तर ते समजू शकते. पण त्यांच्या अनुयायांपैकी कुणी हे काम हाती घेतले नाही. एकंदरीत पाहता महाराष्ट्रात नवीन सामाजिक विचार मांडण्यात आला आणि त्याला अनुसरून सामाजिक परिवर्तन घडवून आणण्याचे आवाहन करण्यांत आले. पण एक सुसंगत आणि समावेशक सामाजिक तत्त्वज्ञान निर्माण करण्याचे

प्रयत्न फारसे झाले नाहीत. आपले बौद्धिक जीवन क्षीण होते ह्याचे ही वस्तुस्थिती एक गमक आहे.

शेवटचा प्रश्न असा : पारंपरिक धर्मांच्या संदर्भात सार्वजनिक सत्यधर्माचे स्थान काय ? ह्या प्रश्नाचे उत्तर उघड आहे. सार्वजनिक सत्यधर्म हा सर्व माणसांसाठी असलेला आणि पूर्णपणे सत्य असलेला असा धर्म आहे व म्हणून त्याने सर्व पारंपरिक धर्मांची जागा घेणे योग्य आहे. "ह्या पृथ्वीच्या पृष्ठभागावर जेवढी म्हणून मानवांनीं धर्मपुस्तकें केलीं आहेत, त्यांपैकी एकही ग्रंथांत आरंभापासून शेवटापर्यंत सारखे **सार्वजनिक** सत्य नाही. कारण प्रत्येक धर्मपुस्तकामध्यें कांहीएक व्यक्तींनी त्या वेळच्या प्रसंगांस अनुसरून हेकडपणा केल्यामुळे, ते धर्म एकंदर सर्व मानवी प्राण्यांस सारखे हितकारक न होतां, सहजच त्यामध्ये अनेक फळ्या होऊन त्या एकमेकांचा मनापासून हेवा व द्वेष करूं लागतात." (पृ. ३५३) तेव्हा सार्वजनिक सत्यधर्म हाच सर्व माणसांना विहित असलेला धर्म होय. पण ह्याला विरोधी असलेली भूमिकाही जोतिबांनी मांडली आहे.......

"ह्या भूमंडळावर महासत्पुरुषांनीं जेवढीं म्हणून धर्मपुस्तके केली आहेत, त्या सर्वांत त्या वेळेस अनुसरून त्यांच्या समजुतीप्रमाणे काहीं ना काही सत्य आहे. यास्तव कोणत्याही कुटुंबांतील एका मानव स्त्रीने बौद्ध धर्मी पुस्तक वाचून तिच्या मर्जीप्रमाणे पाहिजे असल्यास तिने तो धर्म स्वीकारावा व त्याच कुटुंबातील तिच्या पतीने जुना व नवा करार वाचून त्याच्या मर्जीप्रमाणे पाहिजे असल्यास त्याने ख्रिस्ती व्हावे ... त्याच्या कन्येने कुराण वाचून ... महंमदी धर्मी व्हावे. आणि त्याच कुटुंबांतील त्याच्या पुत्राने सार्वजनीक सत्यधर्मपुस्तक वाचून...त्याने सार्वजनीक सत्यधर्मी व्हावे;...कोणी कोणाच्या धर्माचा हेवा करून द्वेष करू नये... (पृ. ४१७) अनुज्ञात धर्मांच्या ह्या यादीत हिंदू धर्माचे नाव नाही कारण तो निखालस असत्य धर्म आहे. सर्वांचा एकच निर्माता आहे आणि सर्व माणसे समान आहेत ही तत्त्वे सत्यधर्माचा गाभा आहे. सत्याचा हा अंश इतर सर्व धर्मांत आहे (बौद्ध धर्म निर्माता मानीत नाही पण सर्व माणसे समान आहेत हे तत्त्व मानतो.) वर्णभेदावर आधारलेला हिंदूधर्म हे मूलभूत सत्यच नाकारतो व म्हणून तो सर्वस्वीं त्याज्य आहे.

पण हे मान्य करूनही एक महत्वाचा प्रश्न उरतो. इस्लाम मानवी समतेचे तत्त्व खरोखरच स्वीकारतो का ? प्रार्थनेच्या स्थानी सर्व मुसलमान समान आहेत पण पैगंबरांच्या शिकवणीप्रमाणे सर्व माणसे व्यवहारात समान आहेत का? इस्लाम गुलामगिरीच्या प्रथेला मान्यता देतो. गुलामांना कनवाळूपणे वागवा असा पैगंबरांचा उपदेश आहे पण गुलामगिरीची पद्धत मूलतःच अन्यायी आहे, मानवी स्वातंत्र्याचा व बंधुतेचा भंग करणारी आहे असे त्यांनी म्हटलेले नाही. गुलामगिरीच्या पद्धतीचा निषेध केलेला नाही. इस्लाम पुरुषाला एकेवेळी चार वायका करण्याची परवानगी देतो. स्वतः पैगंबरांनी अकरा लग्ने केली होती आणि त्यांची अकरा अंगवस्त्रे होती (हा अर्थात् ईश्वराकडून लाभलेल्या संदेशाला अनुसरून पैगंबरांना प्राप्त झालेला विशेषाधिकार होता.) पण सर्वसामान्य मुसलमान एका वेळी चार पत्नी करू शकतो, कुणाही पत्नीला कारणाशिवाय घटस्फोट देऊ शकतो व एकामागून एक अशा कितीही स्त्रिया करू शकतो. सच्चा मुसलमान असणे म्हणजे ह्या सर्व प्रथांना ईश्वराच्या आदेशाचे किंवा अनुज्ञेचे प्रामाण्य आहे असे मानणे. हे सत्यधर्मात बसते का ? जोतिबाच स्वतः म्हणतात, "काही लोभी पुरुष आपल्यास ज्यास्ती सुख व्हावे; अथवा आपल्या मनःकामना ज्यास्ती पूर्ण व्हाव्या यासाठी एका घरात दोन-दोन, तीन-तीन लग्नाच्या बायका करून नांदतात व त्याविषयी आपण, कांहीं **हेकड पुरुषांनीं** केलेल्या धर्मग्रंथांचा आधारही दाखवितात." (पृ. ३६२). पण हिंदूंनी पवित्र मानलेल्या देवदेवतांवर जोतिबांनी ज्या भाषेत टीका केली आहे त्या भाषेत इस्लामच्या शिकवणीवर व प्रेषितावर त्यांनी केली नाही. "प्रार्थना व ब्रह्मसमाजियनांनी एकंदर सर्व धर्मांतील असत्याचा त्याग करून त्यांतील बाकी उरलेल्या सत्याप्रमाणें वर्तन करण्याचा निश्चय केला" असताना जोतिबांनी त्यांना पुढील शब्दांनी हिणविले.

"... महंमदी लोक आपल्या कुराणाला तुम्हाला बोटसुद्धां लावू देणार नाहींत. त्यांच्याशीं अशा तुमच्या गमज्या चालणार नाहींत" (पृ. २८४). जोतिबा जहांमर्द मुसलमानांना घाबरले का ?

वस्तुस्थिती अशी दिसते की जोतिबांची निष्ठा मूलतः हिंदू समाजाशी, ह्या समाजातील शूद्राति-






शूद्रांशी होती. वर्णभेदावर आधारलेल्या हिंदू धर्माचे जोखड त्यांनी फेकून द्यावे आणि स्वतःची मोकळीक करून घ्यावी ह्यासाठी त्यांनी सार्वजनिक सत्यधर्म घोषित केला. ब्राह्मणांनीसुद्धा हा धर्म स्वीकारावा आणि इतरांशी समानतेच्या नात्याने वागून ह्या पुनरुत्थित हिंदू समाजाशी एकजीव व्हावे असे आवाहन त्यांनी केले. 'महंमदी' धर्मातही प्रबोधन होणे आवश्यक आहे हे त्यांनी अमान्य केले नसते. पण ती जबाबदारी प्रामुख्याने मुसलमानांची आहे. पुढे हमीद दलवाई ह्यांनी मुस्लिम समाजाच्या संदर्भात हे कार्य सुरू करून 'मुस्लिम सत्यशोधक' ह्या वर्णनावरील आपला अधिकार सिद्ध केला.

---

# We threw away his bread earner.

## The begging bowl.



Before we met him, he sang at funerals. He would kiss the mourners' feet for one dry chapati.

**God helps those who help themselves**

True. But when the beggar tries to take a step forward, the others take a step backward ... nobody wants contact with a rag.

**The helpless**

Homeless wanderers, pavement dwellers, scavengers, slummers, the 248 million in this country below the poverty line.

**What are we doing**

Every day some of these penniless receive financial aid from us. To start a trade, build a home, buy books... to draw them into the mainstream of society and help them live with dignity.

**Innovative banking**

A special cell of the State Bank initiates these unique schemes for the downtrodden.

The Bank also goes to urban slums. Schools. Hospitals. Prisons. Calamity stricken areas. No area is untouchable.

**Farms and farmers**

It is the only bank with agricultural development branches. Special branches to finance day to day farming needs and novel agricultural schemes.

**A scheme for every dream**

For your son's education abroad. An easy retirement. Your own house. A kitchen garden. A shining new taxi-cab. A tidy business with tidy money.

**The largest banking complex in the world**

A complex of nearly 5000 offices, the State Bank finances national development projects on a grand scale. And plays a major role in representing India on the international banking scene.

We're growing. Not only in size, but also in involvement.



**State Bank**

**Let's come closer**

1955,







अनुक्रमणिका

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

# बौद्ध धर्म

बौद्ध धर्म हा जगातील एकच असा उच्च धर्म आहे, की जो माणसाच्या आत्मनिरीक्षणातून, मानसिक चिंतनातून म्हणजे मानवी प्रज्ञेतून निर्माण झालेला धर्म आहे. गौतम बुद्धाने हा धर्म प्रथम प्रवृत्त केला. गौतम बुद्धाने स्वतःला देवाचा प्रेषित वा देव मानले नाही. त्याचप्रमाणे त्याचा धर्म वेदोक्त आहे, असेही स्वतः बुद्ध किंवा त्याचे अनुयायी मानत नाहीत. त्याचप्रमाणे मी सर्वज्ञ, साक्षात्कारी, अंतिम सत्याचा द्रष्टा आहे म्हणून माझा उपदेश श्रद्धापूर्वक स्वीकारा, असेही बुद्ध सांगत नाही. तो म्हणतो, की मी अंतिम सर्वश्रेष्ठ सत्य सांगत आहे, परंतु ते सत्य स्वतःच्या विवेकबुद्धीने तपासून घ्या. ज्याप्रमाणे सुवर्णाचे सर्वांगीण परीक्षण करून पंडित म्हणजे शहाणा मनुष्य सुवर्ण घेतो, तसे मी सांगितलेला उपदेश परीक्षून घ्या. घर्षण वा छेदन करून वा अग्निदाह म्हणजे भट्टी लावून सुवर्ण घेतात, तसा माझा उपदेश घ्या. अशाप्रकारे धार्मिक सत्य स्वीकारण्याचा उपदेश जगातील कोणत्याही धर्माने, प्रेषिताने, ऋषीने वा वेदाने केला नाही. हेच बौद्ध धर्माचे वैशिष्टय आहे. परंतु हे बौद्ध धर्माचे वैशिष्टय महायान बौद्ध पंथाचा उदय होईपर्यंतच टिकले.

वैदिक काळाच्या अखेरीस, प्राचीन उपनिषदाच्या काळी, भारताच्या बिहार प्रांतातील शाक्यांच्या गणराज्यात भगवान बुद्धाचा इ. स. पू. सहाव्या शतकात उदय झाला. यावेळी भारताच्या पश्चिम टोकाकडील सिंधुपासून पूर्वेस शोणनदापर्यंत, बंगालच्या सरहद्दीपर्यंत, चातुर्वर्ण्य संस्था स्थिरावू लागली होती. जातिसंस्था दृढ होऊ लागली होती. ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य या त्रैवर्णिक आर्यभाषिकांची भरभराट होत होती. शूद्र व अंत्यजही त्यांच्या भौतिक व आध्यात्मिक भरभराटीचे भागीदार झाले होते. यातील शिक्षित वर्गांतील ब्राह्मण व क्षत्रिय यांची धार्मिक व राजकीय सत्ता स्थापन झाली होती. ब्राह्मणांबरोबरच वेदपूर्वकालापासून स्थिरावलेला विविध संप्रदायाचा श्रमणवर्गही प्रभाव गाजवीत होता. ब्राह्मण, श्रमण व क्षत्रिय यांच्या मानवी जीवनासंबंधी व विश्वासंबंधी परस्परविरोधी तात्त्विक उपपत्तींची मीमांसा चालू होती. त्याचे प्रतिबिंब प्रथम प्राचीन उपनिषदात पडलेले दिसते. ईश्वर, आत्मा, परलोक, पुनर्जन्म आणि एकंदरीत विश्व यांच्या संबंधातल्या या उपपत्ती होत्या. विश्वाचे स्वरूप, धार्मिक कर्मकांड, योग व संन्यास यासंबंधी विविध विरुद्ध मते सांगणारे चिकित्सक, विचारवंत आपापली मते ठासून सांगत होते. यात नास्तिक, आस्तिक व संशयवादी असे अनेक संप्रदाय होते. ब्राह्मण व श्रमण यांचे फिरते संघही यामध्ये होते. आस्तिकात व नास्तिकात ब्राह्मण आणि श्रमण हे दोघेही होते. परंतु या सर्वांमध्ये मुख्य दोन पक्ष होते. ऐहिक व पारलौकिक भोगाच्या प्राप्तीकरता यज्ञसंस्थेचे पुरस्कर्ते ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य होते आणि त्यांचे मार्गदर्शन ब्राह्मण करीत होते. हा यज्ञसंस्थेचा पुरस्कर्ता पक्ष प्रभावी होता. तसाच देहक्लेशरूप तपश्चर्येला प्राधान्य देणारा अवैदिक तपस्वी श्रमणांचाही पक्ष मोठा प्रभावी होता. या सर्व मतभेदांना व संप्रदायाना बगल देणारा माणसांचा आध्यात्मिक रोग ( म्हणजे सुखदुःखांचे द्वंद्व ) व त्यातून निर्माण होणारी निरंतर चिंता आणि या चिंतेतून बाहेर पडण्याचा म्हणजे परमशांतीचा उपाय सांगणारा एक वैद्यराज पुढे आला. तो म्हणजे गौतम बुद्ध.



अनुक्रमणिका

जगातील वैदिक, पारशी, यहुदी, ख्रिश्चन, शैव, वैष्णव, इस्लाम यांच्या सर्व धार्मिक विचारांपेक्षा अगदी वेगळा विचारांचा व आचारांचा मार्ग बुद्धाने सांगितला. पुराणकथा, विश्वरचनाशास्त्र, विश्वाचा निर्माता व नियंता ईश्वर इत्यादिकांची मांडणी करणारे वरील सगळे धर्म आहेत. ही मांडणी विश्वशांतीला अपरिहार्यपणे आवश्यक नाही, असे त्याने सांगितले. त्याने अंतिम नीतितत्त्वांनाच प्राधान्य दिले आणि वैराग्य व समाधी यावर आधारलेला विश्वशांतीचा मार्ग सांगितला.

त्या समाजात उच्चस्थानी असलेले त्रैवर्णिक आर्य व विशेषतः ब्राह्मण आणि अन्य श्रमणवर्ग यांच्यावर बुद्धाने स्वतःच्या आयुष्यातच एकापाठीमागून एक वैचारिक विजय मिळविण्यास सुरुवात केली. ही एक प्राचीन जगाच्या इतिहासातील सर्वांत मोठी धार्मिक व वैचारिक क्रांती होती. परंपरागत वैदिक धर्म हा चातुर्वर्ण्य संस्थेने संघटित झालेल्या राष्ट्राचा धर्म होता. उलट बुद्धाचा धर्म हा सर्व मानवांचा धर्म होता. भारत व भारताच्या सीमांच्या बाहेरील अनेक देशामध्ये तो पसरला; भारताच्या उत्तरेस व पूर्वेस आशियात पसरला; पश्चिम आशियातून यूरोपातही गेला; आशियातील अनेक देशातील सामान्य जनतेचा तो धर्म बनला आणि शतकानुशतके त्यांच्या संस्कृतीला नवा आकार देऊन राहिला. ख्रिश्चन व इस्लाम या धर्मांनी विजय मिळविले, परंतु त्यांचे विजय शुद्ध नैतिक कसोटी लावली तर बुद्ध धर्माच्या तुलनेने कमी दर्जाचे ठरतात. कारण धर्मोपदेशकाना राजकीय सत्तेची ताकद आणि शस्त्र यांचे सामर्थ्यही धर्मविजयाकरता वापरावे लागले. उलट, बौद्ध धर्माने राजकीय सत्तेचा धाक आणि शस्त्राची धार यांचा आधार न घेता वैराग्यपूर्ण शुद्ध जीवन, अपरंपार परमत सहिष्णुता, अहिंसक सार्वत्रिक मैत्री यांच्याच केवळ प्रभावाने विजय मिळविला.

हा विजय मिळवत असता प्रत्येक देशातील कुटुंबसंस्था म्हणजे मुख्यतः गृहस्थ व त्याची पत्नी यांचे धर्म सांगितले; त्यातून उपासक आणि उपासिका यांचे वर्ग तयार झाले. तरुण आणि वृद्ध या वयोगटातील उपासक व उपासिकांच्यापैकी काही मुमुक्षूंना दीक्षा दिल्या; त्यांना श्रामणेर म्हणतात. श्रामणेर मोक्षमार्गावर स्थिरावले म्हणजे त्यांना अर्हत पदावर जाण्याकरिता भिक्षुधर्माची दीक्षा दिली. त्यांचे संघ बनले. यातूनच रत्नत्रयाची संकल्पना सिद्ध झाली. **बुद्ध**, **धर्म** व **संघ** ही ती तीन रत्ने होत. बुद्ध धर्माची संघटना या रत्नत्रयावर आधारलेली आहे.

**बुद्ध :–** बिहारमधील कपिलवस्तु नांवाच्या नगरात इ. स. पूर्वी सहाव्या शतकात शाक्य नामक इक्ष्वाकुवंशीय क्षत्रिय गणाचे एक लहानसे गणराज्य होते. या गणराज्यातील प्रमुख पुरुषांना महाजन म्हणजे राजा असे म्हणत. या महाजनांपैकी एकाला अध्यक्ष म्हणून निवडीत, त्यास महाराजा असे म्हणत. या राजांपैकी शुद्धोदन नांवाच्या एका राजाला त्याच्या दोन बायकांपैकी मायादेवीच्या पोटी बुद्धाचा जन्म झाला. तेव्हा त्याचे नांव बुद्ध हे नव्हते. साक्षात्कारानंतर तो बुद्ध झाला. आई–बापानी सिद्धार्थ हे नांव त्याला ठेवले होते. प्रसूतीसाठी माहेरी जात असताना वाटेतच लुंबिनी नांवाच्या वनात मायादेवी प्रसूत झाली. वयाच्या २९ व्या वर्षापर्यंत शुद्धोदन पित्याच्या मोठ्या वैभवात सिद्धार्थाने जीवन भोगले. त्या राजवैभवात कसलीही कमतरता नव्हती; दासदासींनासुद्धा त्या वैभवपूर्ण जीवनाचा वाटा मिळत होता. याचवेळी समाधिमार्गी साधुसंतांच्या प्रभावाखाली सिद्धार्थ हा समाधिमार्गात राहून जीवनाचा आणि विश्वाचा विचार करीत होता. जरा, व्याधी, मरण आणि शोक यांनीच भरलेले पुत्रदारादिकांचे जीवन असते, याचा प्रत्यय त्याला येत होता. यशोधरा ही त्याची पत्नी. तिच्या पोटी त्याला राहुल नांवाचा पुत्र झाला. समाधिमार्गात सिद्धार्थ असल्यामुळे त्याला पुत्रजन्म झाल्याबरोबरच गृहस्थी जीवनात निर्वाण पदाची प्राप्ती होणार नाही; शांती मिळणार नाही; पुत्र झाल्यामुळे आसक्तीचाही बंध वाढेल; अशी खात्री झाली म्हणून त्याने एका मध्यरात्रीच आपला भव्य प्रासाद सोडला; छन्न नांवाच्या सारथ्याला बोलावून अनोमा नांवाच्या नदीतीरावर गेला, मुंडन केले, दागदागिने छन्नाच्या स्वाधीन केले आणि बिंबिसार राजाच्या राजगृह या राजधानीत आलार कालाम या योग्यापाशी जाऊन राहिला. आलार कालाम आणि उद्दक रामपुत्त यांच्यापाशी समाधीच्या





आठ पायऱ्या शिकला. परिव्राजक म्हणजे संन्यासी झालेला सिद्धार्थ मगधांची राजधानी राजगृह या नगरीत भिक्षाटन करून त्या नगरी जवळील पांडव पर्वताजवळ राहू लागला. भिक्षेकरिता राजधानीत हिंडत असताना बिंबिसार राजाने त्याला आपल्या प्रासादावरून पाहिले ; सिद्धार्थाची ती सुंदर व भव्य मूर्ती पाहून आश्चर्यचकित झाला. बिंबिसार राजाला तो सिंहासारखा दिसला. बिंबिसार राजाने त्याला सेनापती करावयाचे मनात ठरवून कुशलप्रश्न व कुलगोत्र विचारले. परंतु धन, सत्ता, सामर्थ्य, कामोपभोग हे सदोष आहेत ; एकांतवासच सुखाचा वाटतो ; त्यातच माझे मन रमते ; मी तपश्चर्येसाठी निघालो आहे ; असे सिद्धार्थाने त्याला उत्तर दिले आणि राजगृहातून उरुवेला या ग्रामाकडे आला. त्याला उरुवेलेचा रम्य प्रदेश आवडला आणि लोकोत्तर शांतीच्या श्रेष्ठ स्थानाचा शोध करीत तपश्चर्येला बसला. हटयोग आचरला. हटयोगाचा अभ्यास केल्यानंतर त्यावेळी प्रचलित असलेल्या देहक्लेशाची तपश्चर्या केली. ही देहदंडनाची तपश्चर्या करीत असताना विषयवासना, द्वेष, हिंसक प्रवृत्ती आणि त्यापासून होणारे दुःख यांचा अंतर्मुख होऊन विचार केला. त्यांच्या योगाने आपणाला दुःख होते, परक्याला दुःख होते, उभयतांना दुःख होते; अशा या शरीराच्या, वाणीच्या आणि मनाच्या प्रवृत्ती या अकुशल म्हणजे सदोष आहेत; या प्रवृत्ती दुःखकारक म्हणजे रोगट आहेत; हे लक्षात घेतले आणि अनामय म्हणजे निरोगी, सर्वांना सुखोत्पादक आणि दुःखनाशक प्रवृत्तींची निवड केली. परोपकार, विश्वव्यापी प्रेम व मैत्री कशी उत्पन्न होईल याचे मनन केले. या सगळ्या अकुशल दुःखकारक प्रवृत्ती मोहमूलक म्हणजे अज्ञानमूलक आहेत, म्हणून सत्याचा साक्षात्कार होण्याकरिता राजयोगाचे म्हणजे ध्यानमार्गाचे अवलंबन केले. या ध्यानमार्गात सिद्धार्थाला सिद्धी प्राप्त होत आहे हे पाहिल्याबरोबर त्या सिद्धीच्या आड येणारा, सत्याचा व प्रज्ञेचा शत्रू, सन्मार्गापासून च्युत करणारा 'मार' सिद्धार्थाशी युद्ध करण्यास प्रवृत्त झाला. नैरंजन नदीच्या काठी सिद्धार्थ तप करीत असताना 'मार' हा करुण स्वर काढून म्हणाला, 'हा निर्वाणाचा उद्योग तुला कशाला पाहिजे ? भल्या माणसा, तू जग आणि अग्निहोत्रादि पुण्य कर्मे कर.' चारी बाजूंनी माराच्या सेनेने म्हणजे इंद्रियांना व मनाला मोहित करणाऱ्या विषयांनी सिद्धार्थाला घेरले होते. देव आणि मनुष्य यापैकी कोणीच या सेनेपुढे उभे राहू शकले नाही. बुद्ध त्या सेनेला हार गेला नाही; त्याच्या प्रज्ञेचा पराभव करू शकली नाही. माराच्या काखेतून मधुर वीणा गळून पडली व मार दुःखी होऊन अंतर्धान पावला. सिद्धार्थ कृश आणि क्षीण झाला होता. त्याची सुंदर शरीरकांती मावळली होती. हे पाहून सुजाता नांवाच्या कुलीन तरुण स्त्रीने दुधाच्या पायसाची भिक्षा त्याला घातली. ती वैशाख पौर्णिमेची रात्र होती; त्याला उत्साह वाटू लागला. पालिग्रंथात सिद्धार्थाला 'बोधिसत्व' असे म्हटले आहे. तो पिंपळाच्या झाडाखाली येऊन बसला; त्याला बोधिवृक्ष म्हणतात. सर्वसहा वसुंधरेच्या म्हणजे पृथ्वीच्या साक्षीने बोधिवृक्षाखाली आसन घातलेल्या बोधिसत्वाला संबोधि ज्ञान म्हणजे आर्यसत्यांचा साक्षात्कार झाला, आणि मोक्षाचा अनुभव आला. त्या आर्यसत्यांच्या साक्षात्काराबरोबरच संसाराच्या व संसारमुक्तीच्या कार्यकारणभावाचा म्हणजे प्रतीत्यसमुत्पाद या तत्त्वाचा साक्षात्कार झाला. साक्षात्कारानंतर बोधिसत्त्व भगवान बुद्ध बनला. बुद्ध म्हणजे अंतिम सत्याचा साक्षात्कार झालेली व्यक्ती होय.

तत्त्वज्ञान झाल्यानंतर भगवान बुद्ध सात दिवसपर्यंत तत्त्वचिंतन करीत मोक्षसुखाचा आस्वाद घेत राहिला. सृष्टी निर्माण करणाऱ्या ब्रह्मदेवाच्या लक्षांत आले, की हा भगवान असाच समाधिसुखात निरंतर रत राहिला तर जगाला सन्मार्ग कोण दाखविणार ? अमरत्वाचे दार कोण उघडणार ? म्हणून भगवान बुद्धाला शरण जाऊन ब्रह्मदेवाने, जगाच्या उद्धाराकरिता जगाला उपदेश करीत जा, म्हणून प्रार्थना केली; आणि ती त्याने ऐकली. आळार कालाम व उद्दक रामपुत्त हे बुद्धाचे समाधिमार्गाचे गुरू होते. त्यांना जाऊन आपल्या साक्षात्काराचे वर्णन करून सांगावे, असे बुद्धाच्या मनात आले; परंतु हे दोघे योगी नुकतेच देह सोडून गेले होते. म्हणून आपल्या पाच साथीदारांना म्हणजे पंचवर्गीय भिक्षूंना उपदेश करावा, असे भगवंताने ठरविले. हे भिक्षू त्यावेळी वाराणसीजवळ ऋषिपत्तनात रहात होते. भगवान ऋषिपत्तनाच्या मृगवनात राहिला आणि

पंचवर्गीय भिक्षूंना चार आर्यसत्यांचे स्वरूप उघडून सांगितले. हे ब्राह्मण होते. हे पंचवर्गीय भिक्षू बुद्धाचे शिष्य झाले. बुद्धाच्या हा पहिला भिक्षुसंघ होय. तेव्हापासून भगवान बुद्धाचे धर्मचक्रप्रवर्तन सुरू झाले. बुद्ध भगवंताच्या हयातीतच बौद्ध धर्म मध्यदेशात चहूकडे पसरला. मध्यदेश म्हणजे सध्याचे अफगाणिस्तान, उत्तरेस हिमालय आणि दक्षिणेस विंध्य पर्वत यांच्यामधील प्रदेश होय. वयाच्या ३६ व्या वर्षापासून वयाच्या ८० वर्षापर्यंत भगवान बुद्धाने धर्मचक्रप्रवर्तन केले आणि ८० व्या वर्षी त्याचे महानिर्वाण झाले. चुंद नांवाच्या लोहाराकडे सूकरमद्दव नांवाचा मांसपदार्थ ( ? ) खाण्यात आला. त्यामुळे अतिसार झाला आणि त्यातच त्याचा अंत झाला. अतिसाराने मृत्यु जवळ ठेपला असता भगवंत म्हणाला, की 'शिष्यहो, सुजातेने ज्या सद्भावनेने मला भिक्षा दिली त्याच सद्भावनेने चुंदानेही घातली, त्याच्यावर रोष करू नका.' 'मी यापुढे नाही म्हणून दुःख करू नका. आत्मदीप व्हावा. विवेक बुद्धीच्या प्रकाशात तुम्हाला धर्माचे ज्ञान होईल.'

**धर्म** :– बुद्ध धर्म हा देवपूजक धर्म नाही. निर्वाणप्राप्ती करून देणारा तो धर्म आहे. देव हेच बुद्धाची पूजा करतात आणि मोक्षाकडे जातात, असे त्रिपिटकात म्हटले आहे. सिद्धार्थ लवकरच बुद्ध होणार, या आशेने ब्रह्मादिक देवगण छत्रचामरे, पुष्पमाला इ. साहित्य घेऊन बोधिवृक्षाखाली जमले होते; असे सुत्तनिपातात म्हटले आहे. परंतु सुत्तनिपातातील वसलसूत्तात ( वग्ग १ ) वैदिक ब्राह्मण वासिष्ठ याला बुद्ध म्हणतो की ब्रह्मदेव किंवा इतर देव ब्राह्मणांच्या आचार्यांना पूज्य आहेत; ते ब्रह्मसायुज्यता मिळविण्याचा मार्ग सांगत आहेत; ब्राह्मण रोज त्यांची स्तोत्रे गातात आणि पूजा करतात; सूर्य–चंद्रापर्यंत या पूजा मार्गाने जाता येते, असे म्हणतात; परंतु हा मार्ग तिकडे जातो हे कोणी स्वतः पाहिले आहे का ? ब्रह्मदेव पाहिला आहे का ? हा मार्ग आणि देव ज्यानी पाहिले नाही ते ब्राह्मण ब्रह्मदेवतेच्या सायुज्यतेचा मार्ग उपदेशित आहेत. हे सगळेच विलक्षण आहे. म्हणून त्रैविद्य ब्राह्मण ज्यात मार्गच नाही अशा जंगलात हिंडत आहेत. या मताला 'त्रैविद्यकांतार' असे बुद्धान म्हटले आहे.

मगध देशात खाणुमत नांवाचा ब्राह्मणांचा गाव होता. तेथे कूटदंत नांवाचा ब्राह्मण मोठा यज्ञ करणार होता. त्यात ७०० बैल, ७०० घोडे, ७०० कालवडी, ७०० बकरे आणि ७०० मेंढे यज्ञात मारण्यासाठी आणले होते. भगवान बुद्धाची कीर्ती त्या ब्राह्मणांच्या कानावर आली होती. कारण बिंबिसार राजा अमात्यांसह त्याचा शिष्य झाला होता, तसाच कोसल देशचा पसेनदी राजादेखील त्याचा शिष्य झाला होता. एवढ्या योग्यतेचा साधुपुरुष आपल्या गावी आला आहे म्हणून त्याचा सत्कार करावा म्हणून सर्व ब्राह्मण त्याच्या दर्शनास गेले. तेव्हा बुद्धाने त्यांना उपदेश केला, की अशा यज्ञांमधे इतकी संपत्ती, पशुधन न उधळता भुकेलेल्या अनाथांना, गरजवंतांना संपत्तीचे दान करावे. असा उपदेश करीत असताना प्राचीन कालच्या महाविजित श्रेष्ठ राजाची कथा भगवान बुद्धाने त्यांना सांगितली. महाविजिताचा महायज्ञ करण्याचा बेत होता. हा बेत त्याने आपल्या पुरोहिताला सांगितला. पुरोहिताने राजाला सांगितले, की 'आपल्या राज्यात शांतता नाही, बंडाळी माजली आहे; श्रीमंत लोकांचे नजराणे घेऊन महायज्ञ करण्यापेक्षा, दास आणि मजूर यांच्याकडून जबरदस्तीने कामे करून घेण्यापेक्षा, साधा तूप, तेल, लोणी, मध, गूळ अशा पदार्थांनी यज्ञ परिपूर्ण करावा आणि चारी दिशांना धर्मशाळा बांधून गोरगरिबांच्या राहण्याची आणि उपजीविकेची सोय करावी.' हा पुरोहिताचा उपदेश महाविजिताला मान्य झाला ( कूटदंतसुत्त, दीघनिकात वग्ग १ ).

बुद्ध उदयाच्या वेळी बिहार प्रांतात अजातशत्रूचे राज्य होते. तेव्हा पूर्ण कश्यप, मख्खलि-गोसाल, अजितकेसकंबल, पकुध कात्यायन, संजय बेलठ्ठपुत्त, निग्रंथ नाथपुत्त हे विविध मताचे श्रमण होते. पूर्ण कश्यपाचे मत होते, की पाप वा पुण्य मानणे ही दृष्टी खोटी आहे. मख्खलि गोसालाच्या मते ज्ञानी किंवा अज्ञानी जीवांना अनेक योगी फिरल्यानंतर आपोआप मोक्ष मिळतो. केसकंबलाच्या मते देह हाच आत्मा असून मरणोत्तर काहीएक शिल्लक रहात नाही. पकुध कात्यायन म्हणत असे

अनुक्रमणिका

की पृथ्वी, उदक, तेज, वायु, सुख, दुःख आणि जीव हे सात पदार्थ नित्य आहेत. ते कोणीच उत्पन्न केले नाहीत. एकाला दुसरा मारतो ही गोष्ट खोटी आहे. निग्रंथ नाथपुत्त म्हणत असे, की पापाच्या आवरणापासून मुक्त होण्याकरिता पापनाशाचा प्रयत्न करावा, तपश्चर्या करावी. संजय बेलठ्ठपुत्त हा अज्ञेयवादी होता. अशी ६३ मते बुद्धाच्या काळी प्रचलित होती. ( सामगफलसुत्त दीघनिकाय वग्ग १ ) अशा मतामतांच्या गलबल्यामध्ये साधकाचे मन सापडू नये ; विश्वाच्या मूलभूत प्रश्नांचा निर्णय काय आहे यावर परमार्थमार्ग किंवा धर्ममार्ग अवलंबून नाही ; असा विचार मुख्यतः बुद्धाने सांगितला. जगातील इतर सर्व धर्म अशा अंतिम निर्णयावर अधिष्ठित आहेत तसा बुद्ध धर्म नाही. याचे उत्तम उदाहरण चूलमालुक्यपुत्त सुत्तामध्ये ( मज्झमनिकाय ) मिळते. मालुंक्यपुत्र हा भिक्षू भगवंताला म्हणाला–

" भदंत, जग हे शाश्वत आहे की अशाश्वत आहे; शरीर आणि आत्मा एक आहेत की भिन्न आहेत; मरणोत्तर, तथागताला म्हणजे भगवान बुद्धाला पुनर्जन्म आहे किंवा नाही ? इ. मुद्यांचे आपण विवरण केले नाही. आपण त्यांचे विवरण केले तरच मी आपला शिष्य होईन. " त्यावर भगवान म्हणाला–मालुंक्यपुत्रा, एखाद्या मनुष्याच्या अंगामध्ये विषारी बाण शिरून तो तळमळू लागला तर आप्त, इष्ट, मित्र शस्त्रक्रिया करणाऱ्या वैद्याला बोलावून आणतील. अशावेळी तो बाणविद्ध दुःखी जर वैद्याला म्हणाला, की हा बाण कोणी मारला ? मारणारा कोणत्या वर्णाचा व रंगाचा होता ? धनुष्य कोणत्या प्रकारचे होते ? दोरी कशाची होती ? इ. सर्व गोष्टी तुम्ही मला समजावून जोपर्यंत देत नाही तोपर्यंत माझ्या जखमेला हात लावू नका. अशा गोष्टी समजेपर्यंत तो मनुष्य मरून जाईल. त्याचप्रमाणे जग कसे आहे, आत्मा देहाहून वेगळा आहे की नाही इ. मुद्दे समजल्यावाचून मी ब्रह्मचर्याचा अभ्यास करणार नाही असे जर कोणी म्हणेल तर त्याला हे मुद्दे समजल्यावाचूनच मरण येईल. ब्रह्मचर्य आणि वैराग्य यांवाचून पाप नष्ट होत नाही; पाप नष्ट झाल्याशिवाय शांती, प्रज्ञा, संबोध आणि निर्वाण यांचा लाभ व्हावयाचा नाही."

भगवान पंचवर्गीय भिक्षूंना उद्देशून म्हणाला– भिक्षूहो, धार्मिक मनुष्याने या दोन अंतांना म्हणजे टोकांना जाऊ नये. हे दोन अंत कोणते ? पहिला कामोपभोगांत सुख मानणे, इंद्रियांच्या सुखात सुख मानणे हा एक अंत होय. तो सामान्यजन, अनार्य आणि अनर्थावह आहे. दुसरा अंत देहदंडन करणे. हा अंत दुःखकारक अनार्य व अनर्थावह आहे. या दोन अंतांना न जाता तथागताने ज्ञानचक्षू उत्पन्न करणारा, उपशम, प्रज्ञा, संबोध आणि निर्वाण यांना कारणीभूत होणारा मध्यममार्ग शोधून काढला आहे. तो कोणता– सम्यक् दृष्टी, सम्यक् संकल्प, सम्यक् वाचा, सम्यक् कर्मान्त, सम्यक् आजीव, सम्यक् व्यायाम, सम्यक् स्मृती, सम्यक् समाधी हा आर्य अष्टांगिक मार्ग होय. चार आर्य सत्यांपैकी हे चवथे सत्य होय.

चार आर्यसत्ये अशी:– दुःख नांवाचे पहिले आर्य-सत्य होय. जन्म, जरा व्याधी, मरण या गोष्टी दुःखकारक आहेत. अप्रियाचा समागम, प्रियाचा वियोग, इष्ट वस्तू न मिळणे यांच्या योगाने दुःख होते. रूप, वेदना, संज्ञा, संस्कार आणि विज्ञान यामध्ये सर्व विश्व आले; रूप, वेदना, इत्यादिकांचे स्कंध म्हणजे समुदाय असतात. म्हणून यांना पंचस्कंध म्हणतात. या पंचस्कंधांची प्राण्याला वासना असते, घेण्याची, सोडण्याची आणि उपेक्षेची वासना असते. म्हणून त्यांना उपादानस्कंध असे म्हणतात. पृथ्वी, जल, तेज आणि वायु यां चार महाभूतांना आणि त्यांच्यापासून उत्पन्न झालेल्या पदार्थांना रूपस्कंध असे म्हणतात. कारण गंध, रस, रंग, स्पर्श, शब्द हे गुण म्हणजे यांचे रूप होय. दुसरा वेदनास्कंध. सुख, दुःख आणि उपेक्षा या तीन प्रकारच्या वेदनांचा समुदाय वेदनास्कंध होय. तिसरा संज्ञास्कंध. घर, झाड, गाव माणूस इ. पदार्थांना निरनिराळी नावे देण्याची मनाची कल्पनाशक्ती आणि त्या शक्तीने दिलेली नावे याला संज्ञास्कंध म्हणतात. चवथा संस्कारस्कंध होय. संस्कार म्हणजे मनाच्या सहज प्रवृत्ती होत. कुशल, अकुशल, आणि अव्याकृत असे संस्कारांचे तीन प्रकार आहेत. दुसऱ्यास मदत करण्याची इच्छा, प्रेम, जागृती इ. कुशल संस्कार होत. लोभ, द्वेष, आसक्ती, मत्सर, आळस इ. अकुशल संस्कार

होत: काही संस्कार पूर्वकर्मांमुळे जन्माबरोबर आलेले असतात, ते कुशल का अकुशल हे सांगता येत नाही; म्हणून त्यांस अव्याकृत संस्कार म्हणतात. पाचवा विज्ञानस्कंध होय. विज्ञान म्हणजे जाणीव. नेत्र, श्रोत्र, घ्राण, जिव्हा, स्पर्शेन्द्रिय किंवा सबंध शरीर यांच्या ठिकाणी होणारे बाह्यज्ञान आणि चिंता सुखदुःखे इत्यादिकांचे मानसिक ज्ञान. हे सगळे बाह्य व आंतरिक अनुभव मिळून विज्ञानस्कंध होय. सगळे अस्तित्व किंवा जीवन अनित्य आहे. म्हणजे क्षणोक्षणी बदलणारा प्रवाह आहे. जे सत् ते क्षणिक होय. विश्वात नित्य असे काही नाही. असा भगवान बुद्धाने पहिल्या आर्यसत्याचे विवरण करताना सांगितलेला सिद्धांत आहे.

बुद्ध निर्वाणानंतर बौद्ध धर्माचे जे सौत्रांतिक व वैभाषिक असे दोन मोठे तत्त्वज्ञानाचे संप्रदाय झाले त्यांनी बाह्य व मानसिक विश्व सत्य आहे, असे मानले, परंतु त्यांपैकी सौत्रांतिक संप्रदायाने बाह्य विश्व इंद्रियांना आणि मनाला साक्षात् प्रतीत होत नाही. बाह्य पदार्थांचा आकार ज्ञानाला येतो, त्यावरून बाह्य विश्व आहे, असे अनुमान करता येते. त्या ज्ञानांच्या विषयरूप आकारावरून आकार देणारे बाहेरचे पदार्थ आहेत, असे अनुमानच होते. वैभाषिक नांवाच्या संप्रदायाप्रमाणे बाह्य विश्व इंद्रियांना प्रत्यक्ष कळतेच, त्याचे अनुमान होते असे नाही.

- भगवान बुद्ध म्हणतो, की सर्व दुःखांना तृष्णा म्हणजे विषयवासनाच कारण आहे हे दुसरे आर्यसत्य होय. यास दुःखसमुदय म्हणतात. तृष्णा ही सर्वथा त्याज्य आहे.

तिसरे आर्यसत्य दुःखनिरोध हे आहे. सर्व दुःखांचा संपूर्ण आणि कायम नाश होऊन निर्वाण प्राप्त होऊ शकते. हे निर्वाण अमृत, निर्द्वन्द्व, परमशांतिरूप, निर्विकल्पक व अनिर्वचनीय आहे. ते अनंत असे परमार्थ सत्य आहे. ते सर्व जीवात्मांचे अंतिम उद्दिष्ट आहे; यालाच मोक्ष म्हणतात.

चवथे आर्यसत्य दुःखनिरोधगामिनी प्रतिपदा होय. यालाच अष्टांगिक मार्ग म्हणतात. सम्यक् दृष्टी हे पहिले अंग आणि पहिली पायरी होय. जगामध्ये दुःख भरले आहे, ते तृष्णेमुळे उत्पन्न होते. अज्ञान व अहंकार यांच्यामुळे तृष्णा उत्पन्न होते. चार आर्यसत्यांच्या ज्ञानाने अज्ञाननाश होतो. नित्य व सत्य असा आत्मा नाही, याचेही ज्ञान व्हायला पाहिजे. कारण आत्मतत्त्व मानल्याने अहंकार उत्पन्न होतो. शुद्ध संकल्प हे दुसरे अंग व दुसरी पायरी होय. ऐश्वर्य, सत्ता आणि कामोपभोग यात बद्ध न होता सर्व जगाशी पूर्ण मैत्री करण्याचा संकल्प म्हणजेच सम्यक् संकल्प होय. मैत्री, करुणा, मुदिता आणि उपेक्षा या भावनांचा निरंतर अभ्यास करण्याचा संकल्प शुद्ध संकल्प होय. प्राणिमात्राबद्दल व सर्व मानवांबद्दल शुद्ध प्रेम ठेवणे ही मैत्री होय; कोणी पुण्यकर्म केले तर त्याच्याबद्दल प्रेमाची भावना उत्पन्न होणे जरूर आहे. कोणत्याही दुःखी प्राण्याबद्दल वा मनुष्याबद्दल करुणाच उत्पन्न झाली पाहिजे. कोणाचाही अभ्युदय होत असताना मुदिता म्हणजे आनंद उत्पन्न झाला पाहिजे, मत्सर वाटता कामा नये; आणि कोणी पापी दुराचरणी दिसला तर त्याच्याबद्दल उपेक्षेची भावना उत्पन्न झाली पाहिजे. अशा प्रकारच्या मैत्री, करुणा, मुदिता व उपेक्षा या भावनांना भगवान बुद्धाने 'ब्रह्मविहार' अशी संज्ञा दिली आहे. सम्यक् वाचा हे तिसरे अंग व पायरी होय. असत्य भाषण, चहाडी, शिवीगाळ, बडबड करणे, समाजात तंटेबखेडे व हिंसक प्रवृत्ती उत्पन्न होतील असे भाषण वर्ज्य करावे आणि परस्परांचे सख्य निर्माण करणारे असे सत्य, प्रिय आणि मितभाषण म्हणजे सम्यक् वाचा होय. सम्यक कर्मान्ति हे चवथे अंग व पायरी होय. चोरी, व्यभिचार, प्राणघात इ. कर्मांपासून अलिप्त राहून लोकांचे कल्याण होईल अशीच कार्यकर्मे आचरण म्हणजे सम्यक् कर्मान्ति होय. सम्यक् आजीव हे पाचवे अंग व पायरी होय. समाजाला अपाय होणार नाही अशी उपजीविका करणे आणि समाजाला अपायकारक उपजीविका वर्ज्य करणे यास सम्यक् आजीव म्हणतात. सम्यक् व्यायाम हे सहावे अंग व पायरी होय. वाईट विचार आणि विकार नष्ट करून सुविचार मनात आणण्याचा निरंतर प्रयत्न म्हणजे सम्यक् व्यायाम होय. सम्यक् स्मृती हे सातवे अंग व पायरी होय. अंतर्मुख होऊन आपल्या मनाच्या सुखदुःखादी वेदना, रागद्वेषादी विकार, मनाच्या आसक्ती यांचे मनन करून त्यांचा नाश करीत राहणे यास सम्यक् स्मृती म्हणतात. सम्यक् समाधी हे आठवे अंग व शेवटची पायरी होय.





सगळ्या मनोविकारांचा, कामादी वासनांचा निरोध करून विवेक उत्पन्न झाला असता शांती प्राप्त होते. या शांतीने चित्त प्रसन्न होऊन एकाग्र होते. ही एकाग्रता म्हणजेच सम्यक् समाधी होय. असा हा भगवान बुद्धाचा समाधिमार्ग आहे.

अनादिकालापासून चालत आलेल्या जन्ममरण परंपरेचा म्हणजे पुनर्जन्माचा सिद्धांत माना अथवा न माना, चार आर्यसत्ये प्रत्यक्ष अनुभवसिद्ध आहेत; ती मानली पाहिजेत. त्यांच्या आधारावरच पवित्र व शुद्ध मानवी जीवनक्रम आधारला आणि अष्टांगमार्ग पूर्ण आचरणात आणला तर याच जन्मी निर्वाणप्राप्ती होऊन अर्हत पद प्राप्त होते, असा भगवान बुद्धाचा मूलभूत आणि सर्वश्रेष्ठ सिद्धांत आहे. परंतु वर उल्लेखिलेला पुनर्जन्माचा सिद्धांत मानला तर जन्ममरणपरंपरेतून मुक्ती म्हणजे निर्वाण अष्टांगिक मार्गाच्या आचरणानेच प्राप्त होते, असे भगवान सांगतो. भगवान बुद्ध हा अनाद्यनंत, नित्य, सज्जन व दुर्जन यांनी भरलेल्या सृष्टीचा निर्माता व तशा सृष्टीचा नियंता असा परमेश्वर मानीत नाही. भगवान म्हणतो– ( अंगुत्तरनिकाय तिकनिपात सुत्त ६९; मज्झिमनिकाय देवदहसुत्त १०१)– "भिक्षुहो, जे काही सुख, दुःख किंवा अपेक्षा मनुष्यप्राणी भोगतो ते सर्व ईश्वरनिर्मित आहे, असे प्रतिपादणाऱ्यांना मी म्हणतो, की प्राणघातकी, चोर, व्यभिचारी, असत्यवादी, चहाडखोर, शिवीगाळ करणारे, बडबडणारे, दुसऱ्याचे धन इच्छिणारे, द्वेष्टे आणि मिथ्या दृष्टीचे लोक ज्या ईश्वरानेच निर्मिले त्याच ईश्वराने तुम्हाला निर्मिले काय? हे सर्व ईश्वराने निर्मिले, असे सत्य मानले तर सत्कर्माचा उत्साह राहणार नाही, कर्तव्याकर्तव्य समजणार नाही."

सृष्टीच्या उत्पत्तिविनाशाचे चक्र सुरू असते. हे चक्र कार्यकारणभावांच्या नियमाने बद्ध आहे. हाच अविद्यामूलक संसार होय. जन्ममरण–परंपरा अविद्यामूलक आहे. अविद्येचा नाश झाला म्हणजे संसार संपतो. या अविद्यामूलक संसाराचा आणि अविद्यानाशमूलक संसारनाशाचा कार्यकारणभाव म्हणजेच प्रतीत्यसमुत्पाद होय. प्रतीत्य म्हणजे अनेक कारणे एकत्र जमून समुत्पाद म्हणजे कार्य उत्पन्न होणे.

भगवानाने अष्टांगिक मार्गाचा आदर्श पुढे ठेवून गृहस्थ व गृहिणी यांनाही साध्या पंचशीलांचा उपदेश केला आहे. १ ) प्राणघात न करणे, २ ) कोणी न दिलेली वस्तू न घेणे म्हणजे चोरी न करणे, ३ ) व्यभिचार न करणे, ४ ) खोटे न बोलणे, ५ ) दारू वगैरे मादक पदार्थांचे सेवन न करणे. ही पाच शीले होत. कोणत्याही मनुष्याने या पंचशीलांचे आचरण करणे आवश्यक आहे भिक्षूकरिता या पंचशीलांमध्ये आणखी पाच शीलांचा समावेश केला आहे. ६ ) भिक्षूने मध्यान्हानंतर न जेवणे, ७ ) नृत्य, गीत, उंची वस्त्रांचे परिधान, पुष्पमाला, सुगंधी पदार्थ यांचा उपभोग न घेणे, ८ ) नाटक, तमाशा इत्यादिकांचे दर्शन न करणे, ९ ) पलंग वगैरे श्रीमंती शय्येवर निद्रा न करणे, १० ) संपत्तीचा किंवा पैशांचा व्यवहार न करणे. ही मिळून दहा शीले होतात. शील म्हणजे आचरणाचा नियम. ही सगळी शीले निषेधात्मक आहेत. आचरणाचे विधायक नियम अष्टांगिक मार्गात अंतर्भूत होतात. सिगालसुत्त आणि मंगलसुत्त यांच्यामध्ये भगवानाने विधायक शीलांचा गृहस्थाश्रमींना उपदेश दिला आहे. शील, समाधि आणि प्रज्ञा या तीन शब्दामध्ये सगळा धर्म अंतर्भूत होतो. शील म्हणजे सदाचरणाचे नियम आणि निषिद्ध आचरणापासून निवृत्ती; समाधी म्हणजे एकाग्रचित्ताने कोणतेही कार्य करणे आणि सगळ्या पुण्याच्या आणि पापांच्या वासना नष्ट करून चित्त शांत ठेवणे; आणि प्रज्ञा म्हणजे अंतिम सत्याचा साक्षात्कार आणि त्या करिता आवश्यक असलेले तत्त्वचिंतन होय. ही प्रज्ञा भगवान् बुद्धाच्या भाषेत प्रत्यवेक्षण ( आत्मनिरीक्षण) किंवा स्मृत्युपस्थान ( आत्मसंशोधन ) केल्याने प्राप्त होते. महायान पंथ निर्माण होण्यापूर्वीच्या बौद्ध धर्मांचे हे सार आहे.

### चातुर्वर्ण्य व जातिसंस्था

भगवान बुद्धाने जन्मसिद्ध चातुर्वर्ण्य मान्य केले नाही; केवळ विशिष्ट गुण व कर्म यांनीच कोणाही व्यक्तीचा वर्ण ठरतो;, असे त्याने म्हटले. ब्रह्मदेवाच्या मुखापासून ब्राह्मण, बाहूपासून क्षत्रिय, मांडीपासून वैश्य आणि पायापासून शूद्र वर्ण जन्मला, ही वर्णोत्पत्तीची वैदिक धर्माची कल्पना त्याने अमान्य केली. चौर्य, असत्य भाषण, व्यभिचार,

इत्यादी दोष उच्च वा नीच मानलेल्या जातींच्या व्यक्तींत आढळतात; म्हणून जन्मावरून जात ठरत नाही. जातिभेद हा अनैसर्गिक व भ्रामक समजुतींवर आधारलेला आहे; असे भगवानाने अनेक ठिकाणी म्हटले आहे ( अस्सलायनसुत्त, वसुलसुत्त ) हिंदु-धर्मातील परंपरागत चातुर्वर्ण्याची संकल्पना बौद्ध-धर्माने अमान्य केल्यामुळे तो धर्म सर्व मानवांचा धर्म ठरला. तो धर्म भारताबाहेर जातिसंस्था नसलेल्या देशांमध्ये पसरला.

**संघ:**– या धर्माचा उपदेश करून मानवजातीचा उद्धार करणे हे भिक्षुसंघाचे मुख्य उद्दिष्ट आहे. भिक्षुसंघ पुरुष भिक्षूंचा आणि महिला भिक्षुणींचा असा मुख्यत: दोन प्रकारचा सांगितला आहे. शील, समाधी आणि प्रज्ञा ही तीन पदे ज्यांना पूर्ण आत्मसात झाली तेच यथार्थ भिक्षु होत. त्यानाच थेर (स्थविर) आणि थेरी (स्थविरा) म्हणतात. ज्याच्या मनातून प्राणिमात्रांबद्दलचा भेदभाव निघाला, शत्रुबद्दल देखील प्रेमभाव निर्माण झाला, ज्याला दुष्ट, दुर्वर्तनी व कृपण माणसाबद्दलही सहानुभूती वाटू लागली असा पूर्ण शांत व परोपकाररत पुरुष म्हणजे खरा भिक्षु होय. हाच अर्थ धम्मपदाच्या एका गाथेत संक्षेपाने निर्देशिला आहे.

**अक्रोधेन जयेत् क्रोधं असाधुं साधुना जयेत् ।**
**जयेत् कदर्यं दानेन सत्येनालीकवादिनम् ॥**
( धम्मपद २२३ )

मज्झिमनिकायातील उल्लेखसुत्तात चुंदलोहार या शिष्याला भगवान म्हणतो– ' हे चुंद, दुसरे हिंसक वृत्तीने वागतात तेथे आपण अहिंसक होऊ या; दुसरे द्वेष करतात तर आपण द्वेषापासून मुक्त होऊ या; हिंसकाला हिंसेपासून निवृत्त करावयाचे तर आपणच अहिंसक व दयाशील व्हावयास पाहिजे; दुसऱ्यांनी कर्कश, असत्य बोलू नये, लबाडी वा चहाडी करू नये म्हणून आपणच मधुरभाषी, सत्यवचनी व्हावयास पाहिजे. खोल चिखलात रुतलेल्याला जो चिखलात रुतलेला आहे तो काढू शकत नाही. जो द्वेष्टा, दुर्वृत्त, स्वैरवर्तनी असेल त्याला आपण प्रेममय, सदाचरणी आणि विनीत असू तरच सुधारू शकू; ज्ञानी, संयमी, शांत, प्रज्ञावान आणि तत्त्वनिष्ठ व्यक्तींचा संघ हाच खरा समाजाचा आदर्श होय. असा सामाजिक आदर्श भगवान बुद्धाने निर्मिला. मनुष्यजात पृथ्वीवर आहे तोपर्यंत असे आदर्श संघच आदर्श समाज निर्माण करू शकतील; आणि हेच संघाचे मुख्य जीवितकार्य आहे.

**बुद्धं शरणं गच्छामि ।**

**धर्मं शरणं गच्छामि । संघं शरणं गच्छामि ।**

## महायान पंथ

उपनिषदातील परमात्मवाद, परंपरागत असा शैव व वैष्णवांचा मूर्तिपूजामार्ग आणि भक्तिमार्ग यांचा बुद्ध धर्माशी समन्वय होऊन महायान बौद्ध संप्रदाय सुमारे इ. स. च्या पहिल्या शतकात निर्माण झाला आणि तो भारतात ब्रह्मदेशापासून तो चीन, जपानपर्यंत आणि उत्तरेस हिमालयाच्या पलीकडे मंगोलियात पसरला.

शाक्यमुनी बुद्ध हा महानिर्वाण झाल्यानंतर पुन: जन्मला नाही. परंतु महायान पंथाप्रमाणे तोच भगवान बुद्ध संसारसागरात दु:ख भोगणाऱ्या जीवांना निर्वाणप्राप्तीचा मार्ग दाखविण्याकरिता अवतार घेतो, असा महायान पंथाचा मुख्य सिद्धांत आहे. नित्य, अनाद्यनंत, निर्गुण, निराकार भगवान बुद्ध हा त्रिकाय आहे; काय म्हणजे शरीर; धर्मकाय, संभोगकाय आणि निर्माणकाय अशी त्याची तीन शरीरे आहेत. निर्गुण, निराकार, शुद्ध, महाशून्य व अंतिम तत्त्वरूप भगवान बुद्ध म्हणजे धर्मकाय. धर्म म्हणजे तत्त्व. धर्मकाय हा परमार्थसत्य होय. दुसरा संभोगकाय हा आनंदमय असून तोच परमेश्वर होय. तो सुखावती या स्वर्गाचा राजा आहे. हिंदूंच्या (विष्णू , शिव इ.) परमेश्वरासारखा आहे. महायान संप्रदायाप्रमाणे बुद्धपदास जो जो साधक प्राप्त होतो तो. तो संभोग काय बनतो. असे अगणित साधक बुद्ध झाले आणि होणार आहेत. चीन, जपान, सयाम, ब्रह्मदेश इ. राष्ट्रांमध्ये अमिताभ बुद्धाची पूजा होते. हा बुद्ध असाच संभोगकाय बुद्ध होय. तिसरा निर्माणकाय म्हणजे पृथ्वीवर शाक्यमुनीसारखे अवतरणारे व भौतिक शरीर धारण करणारे बुद्ध होत.

बुद्धपदप्राप्तीकरता आत्यंतिक साधना करणाऱ्या जीवांना बोधिसत्त्व ( भावी बुद्ध ) अशी संज्ञा आहे. प्रज्ञापारमिता प्राप्त झाली म्हणजे बोधिसत्त्व हा बुद्ध बनतो. प्रज्ञा ही पारमिता म्हणजे संसारसागराच्या पलीकडे गेली, प्रज्ञेची पराकाष्ठा झाली

अनुक्रमणिका

# कृषि उत्पन्न बाजार समिती पुणे

**मार्केट यार्ड, गुलटेकडी, पुणे-९**

फोन—४४३०४९

विविध प्रकारचे ६० शेतीमाल नियमीत करून आणि १५० एकरांचे विस्तीर्ण व अत्याधुनिक बाजार आवार उभारून शेतीमाल उत्पादकांचे आर्थिक हितसंरक्षण करणारी महाराष्ट्रातील एक आग्रेसर संस्था

| | | |
|---|---|---|
| जी. के. शिंदे<br>बी.ए. एलएल. बी | शिवाजीराव कोंडे | खासदार आण्णासाहेब मगर<br>बी. एस्सी. (अॅग्री) |
| सचिव | उपसभापती | सभापती |

— सदस्य —

| | | |
|---|---|---|
| तु. य. आल्हाट | द. रा. खांदवे | बा. तु. टिंगरे |
| व. फ. चोरघडे | वि. द. दांगट | वि. ज. जाधवराव |
| अ. न. साठे | धों. मु. शिंदे | आ. द. तापकीर |
| रा. भा. जावळकर | र. अ. ओसवाल<br>बी. ए. एलएल. बी. | मा. वि. बाफना<br>बी. एस्सी. |
| | मा. सो. काळे. | |

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

म्हणजे बुद्धपदाची प्राप्ती होते. बोधिसत्त्वाच्या सहा पारमिता म्हणजे पूर्णतेचे प्रकार सांगितले आहेत. दान, शील, शांती, वीर्य, ध्यान आणि प्रज्ञा हे ते सहा प्रकार होत. जातकट्ठकथा या ग्रंथातील सुमेधकथेमध्ये दहा पारमिता सांगितल्या आहेत. दान, शील, नैष्कर्म्य, प्रज्ञा वीर्य, शांती, सत्य, अधिष्ठान ( अढळ निश्चयाने योगसाधना ), मैत्री आणि उपेक्षा. या दहा गुणांपैकी आत्यंतिक निष्ठेने कोणताही एक गुण, अनेक गुण किंवा सर्व गुण प्राप्त करून घेणे यास पारमिता म्हणतात. या गुणांची बोधिसत्वाने निरनिराळ्या जन्मांमध्ये संपूर्ण प्राप्ती करून घेतल्याच्या कथा जातककथांमध्ये वर्णिल्या आहेत. हे बोधिसत्त्वाचे जन्म केवळ मनुष्ययोनीतले नसून इतरही हत्ती इ. प्राण्यांच्या योनीतले आहेत. महायान पंथातील 'बोद्धिसत्त्व' ही महत्त्वाची संकल्पना आहे. बोधिसत्व या जन्मांमध्ये भिक्षू नसलेला प्राणी असतो. त्यावरून असे सिद्ध होते की शाक्यमुनी भगवान बुद्धाने केवळ भिक्षूंचाच धर्म सांगितला नसून सर्व मनुष्यांना कल्याणकारक असाच धर्म सांगितला आहे.

महायान पंथात योगाचार आणि माध्यमिक असे दोन तत्त्वज्ञानाचे संप्रदाय निर्माण झाले. हे दोन्ही संप्रदाय मायावादी आहेत. दृश्यविश्व हे माया म्हणजे मिथ्या आहे असे हे संप्रदाय मानतात. आसंग आणि वसुबंधु यांनी योगाचार संप्रदायाचे तत्त्वज्ञान प्रथम मांडले आणि आचार्य धर्मकीर्तीने या तत्त्वज्ञानाला उत्कृष्ट व सर्वांगीण स्वरूप दिले. यास 'विज्ञानवाद' म्हणतात. बाह्य दृश्य विश्व हे खरे नाही; केवळ मानसिक जाणीवच खरी आहे. काम, क्रोध, राग, द्वेष, सुख, दुःख इ. मनोविकार ज्ञानरूपच असतात, जाणीव हेच त्यांचे स्वरूप होय. आणि हे ज्ञान म्हणजे सतत बदलणारी धारा आहे. ही धारा दोन प्रकारची, आलय विज्ञान आणि प्रवृत्तिविज्ञान. आलय विज्ञान म्हणजे मी अशी जाणीव. या जाणिवेवर अवलंबून असलेली ज्ञानधारा म्हणजे प्रवृत्ति विज्ञान होय. रूप, रस, गंध, स्पर्श, शब्द यांचा जो अनुभव येतो; अनुमान होते; म्हणजे बाह्य घट, पट, पर्वत, नदी, जाया, पुत्र इत्यादिकांचे ज्ञान होते; ते सर्व प्रवृत्ति विज्ञान



होय. ही प्रवृत्तिविज्ञानाची परंपरा अनादीकालापासून सुरू आहे. प्रवृत्तिज्ञानांचे संस्कार आलय विज्ञानावर होत असतात. आणि या संस्कारांमुळेच नंतरची प्रवृत्तिविज्ञाने उत्पन्न होतात. रूप, रस, गंध, स्पर्श, शब्द किंवा घट, पट, पर्वत, नदी, जाया, पुत्र इत्यादिकांची विज्ञाने मागील संस्कारांनीच निर्माण होतात. बाह्य विषयांना बाहेर अस्तित्व नाही; बाह्य अस्तित्वाचा केवळ भ्रम आहे. ते केवळ ज्ञानाकार आहेत. ते मागील पाप–पुण्यांच्या संस्कारांनी उत्पन्न होत असतात. असा हा संस्कारांचा संसार प्राणी भोगत असतात. अष्टांगमार्गाचे पूर्ण आचरण केल्याने पापपुण्यांचे संस्कार आणि बाह्य विषयांचे संस्कार नाहीसे होतात, संसार संपतो आणि आलय विज्ञान शुद्ध होते, हे आलय विज्ञान शुद्ध स्वरूपात प्रवाह रूपाने अनंतकालपर्यंत स्थिरावते, यासच निर्वाण किंवा मोक्ष म्हणतात.

माध्यमिक संप्रदायाचा संस्थापक नागार्जुन हा ब्राह्मण इ. स. च्या दुसऱ्या शतकाच्या अखेरीस होऊन गेला. भगवान बुद्धाने मध्यममार्ग काढला. त्यावरून माध्यमिक ही संज्ञा नागार्जुनाने स्वीकारली. याच्या तत्त्वज्ञानास शून्यवाद म्हणतात,

शून्यवादाप्रमाणे संवृति किंवा संवृत्ति सत्य आणि परमार्थसत्य असे सत्याचे दोन प्रकार आहेत, संवृति सत्य म्हणजे व्यावहारिक सत्य. बाह्य दृश्य विश्व हे मानसिक रागद्वेषादी विकारांचे, सुखदुःखादी जाणिवांचे किंवा रूप, रस इत्यादिकांच्या जाणिवांचे विश्व. हे सर्व भ्रमात्मक विश्व आहे ; ते व्यवहारापुरतेच सत्य आहे. व्यवहार म्हणजे जीवन. परमार्थ सत्य म्हणजे महाशून्य होय. विश्व हे आहे किंवा नाही यासंबंधी काही सांगता येत नाही; त्यास सत्‌ही म्हणता येत नाही आणि असत्‌ही म्हणता येत नाही. विश्वासंबंधी जेवढी तत्त्वज्ञाने आहेत ती सगळी किंवा त्यापैकी कोणतेही तर्कशास्त्रदृष्टया विचाराच्या कसोटीस उतरत नाही. म्हणून कोणतेही तत्त्वज्ञान मान्य करणे अशक्य आहे, म्हणून त्या सगळ्यांचा विचार करून मौन पाळणे हेच योग्य होय. असा शून्यवादाचा भावार्थ आहे. परमार्थ सत्य हे अद्वय आहे ; सत् आणि असत् यापैकी कोणत्याही कोटीत ते बसत नाही.

अनुक्रमणिका

बौद्ध धर्मात महायान संप्रदायातून वज्रयान संप्रदाय निर्माण झाला. तो हिंदूंच्या शाक्त संप्रदायासारखा शक्तिपूजक आहे. तो प्रज्ञापारमिता या शक्तिदेवतेची आराधना करतो. मद्य, मांस, मत्स्य, मुद्रा व मैथुन यांच्या योगानें देवीची पूजा करणे हे महत्त्वाचे कर्मकांड यात आहे आणि या पंचमकारांचा अलिप्त बुद्धीने उपभोग घेणे हे या कर्मकांडात अंतर्भूत आहे. मूळ बौद्ध धर्माचा महायान आणि वज्रयान या क्रमाने ऱ्हासच होत गेला. महायान पंथ हा मायावादी संप्रदाय आहे. महायानांचा मायावादच स्वीकारून आद्य शंकराचार्यांनी आपल्या अद्वैत तत्त्वज्ञानाची मांडणी केली. म्हणून मध्वाचार्य शंकराचार्यांस प्रच्छन्न बौद्ध म्हणतात.

---

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी

# जैन धर्म

---

हिंदू धर्माप्रमाणेच जैन धर्म हा सनातन धर्म आहे. कारण जैन धर्माचे उपदेशक तीर्थंकर यांची परंपरा अनादिकालापासून चालू आहे, अशी या धर्माची श्रद्धा आहे. ते मोक्षमार्ग दाखवितात. सम्यक् दर्शन, सम्यक् ज्ञान, व सम्यक् चारित्र या तीनांचा समुच्चय हा मोक्षमार्ग होय. सम्यक् दर्शन म्हणजे सत्यावर श्रद्धा. ही श्रद्धा जीवात स्वाभाविक असते किंवा उपदेशाने निर्माण होते. अशी श्रद्धा असेल तरच सम्यक् म्ह० पूर्ण सत्याचा साक्षात्कार होतो. परंतु नुसती श्रद्धा असून उपयोगी नाही. त्याला चारित्राची जोड पाहिजे. चारित्र म्हणजे अहिंसा, सत्य, अस्तेय, ब्रह्मचर्य आणि अपरिग्रह या महाव्रतांचे आणि शरीरक्लेशकारक कठोर तपाचे आचरण.त्याच्या योगाने जे कैवल्य म्हणजे मोक्ष प्राप्त करून घेतात आणि सर्वज्ञ बनतात, असे तीर्थंकर धर्मोपदेश करतात. मागचा तीर्थंकर पुढच्या पिढ्यांना उपदेश करतो; पुढच्या पिढीत उत्पन्न झालेला तीर्थंकर त्यानंतरच्या पिढ्यांना उपदेश करतो; अशा रीतीने अनादिकालापासून तीर्थंकरांची परंपरा चालू असून असे तीर्थंकर एकंदरीत वर्धमान महावीरांपर्यंत २४ झाले आहेत.

तीर्थंकर म्हणजे संसारसागरातून तारून नेणारे साधन निर्माण करणारा. तीर्थ म्हणजे नौका, विमान इत्यादिकांसारखे दृढ तारक साधन होय. तीर्थंकरांच्या तारक उपदेशाने बद्ध जीव हे साधक म्हणजे श्रावक किंवा श्राविका बनतात आणि प्रपंचाबद्दल वैराग्य उत्पन्न झाल्यावर श्रमणाची म्हणजे संन्याशाची दीक्षा घेतात. वर सांगितलेल्या श्रावक आणि श्राविका जैन धर्मशास्त्रात सांगितल्याप्रमाणे अहिंसादी महाव्रताचे मर्यादित प्रमाणात आचरण करतात ; अशा मर्यादित व्रतांना अणुव्रत अशी संज्ञा आहे. विविध प्रकारचे उपवास आणि दानादी व्रते यांचे आचरण करतात. मुक्तीची तीव्र इच्छा झाल्यानंतर म्हणजे मुमुक्षू बनल्यावर श्रमण-दीक्षा घेतात.

जैन धर्माचा उगम वेदपूर्वकालात झाला आहे. योगमार्ग आणि मूर्तिपूजा ही वेदपूर्वकालापासून चालू आहे. नग्न यतींचा किंवा मुनींचा निर्देश ऋग्वेदामध्ये एक ठिकाणी आला आहे. योगमार्गाच्या तत्त्वज्ञानाप्रमाणे जीवन हे दुःखमय आहे; शरीरधारी सगळे जीव पूर्वकर्मांनी बद्ध आहेत; पूर्वकर्मांनी शरीराचा बंध निर्माण होतो. तो बंध सुटल्याशिवाय शुद्ध सत्याचा साक्षात्कार होत नाही आणि संपूर्ण ज्ञान व परमानंद प्राप्त होत नाही. विश्वातील विषयांपासून सुखदुःखे उत्पन्न होतात, ती संमिश्र असतात, असे विश्वविषयक निराशावादी तत्त्वज्ञान हे जैन आणि बौद्ध धर्माचे आधारभूत तत्त्वज्ञान आहे.

प्राचीन भारतीय समाजातील ब्राह्मण, क्षत्रिय व वैश्य यांच्यामध्ये हिंदुधर्माबरोबरच जैन धर्म प्राचीन कालापासून प्रचलित आहे. महावीरानंतर अनेक विख्यात ब्राह्मण आचार्यांनीसुद्धा जैन धर्मसंघाचे नेतृत्व केले आहे. इ. स. पूर्वकालातील श्रेणिक, बिंबिसार, चंद्रगुप्त मौर्य, खारवेल इत्यादी सम्राटांचा आश्रय मिळून उत्तर भारतात जैन धर्माचा प्रभाव वाढला. पश्चिम भारतातही तो पसरला. एका भयंकर दुष्काळाच्या आपत्तीत उत्तरेतील जैन धर्मसंघ सापडला, तेव्हा आचार्य भद्रबाहू यांनी शिष्यांचा एक गट घेऊन त्याच्यासमवेत दक्षिण भारताकडे स्थलांतर केले, असे जैन धर्माचा इतिहास सांगतो. याच घटनेमुळे जैनांचे श्वेतांबर व दिगंबर असे दोन पंथ झाले असे मानतात. दिगंबर, श्वेतांबर व स्थानक-

अनुक्रमणिका

वासी असे जैनांचे सध्या तीन प्रमुख भेद आहेत. श्रमण धर्म कमी अगर अधिक कडक पाळणाऱ्यांना श्रमणांचे गट प्राचीन काळापासून अस्तित्वात आले आहेत. त्यांच्या आचारविचारांचे लोण गृहस्थधर्मी श्रावक वर्गापर्यंतही पोहोचले. दिगंबर व श्वेतांबर हे प्रमुख भेद होत; परंतु अवांतर भेदांना गच्छ असे म्हणतात. हे गच्छ ८४ होते. हे सर्व भेद काही किरकोळ सिद्धांत, पौराणिक गोष्टी आणि साधूंच्या आचारनियमांमधील बारीक बारीक फरक यामुळे उत्पन्न झाले. परंतु २४ तीर्थंकरांना आणि त्यांच्या तत्त्वज्ञानाला ते मानतात. या सर्वांचे तत्त्वज्ञान एकच. तीर्थंकरांबरोबर देहक्लेशकारक कठोर तपश्चर्या करणाऱ्या साधूंनाही ते पूज्य मानतात. या साधूंमधील दिगंबर साधू नग्न राहतात आणि श्वेतांबर साधू साधे श्वेत वस्त्र परिधान करतात. कित्येक राजे, राण्या, मंत्री, अमात्य, प्रधान, सेनाधिकारी आणि धनाढ्य व्यापारी जैन धर्माकडे आकृष्ट होऊन त्यांनी जैन धर्माचा स्वीकार केला. कारण, राज्यातील बैरागी साधूसंन्याशांचे आदर्श सामान्य जनतेला दारिद्र्य व दुर्दशा सहन करण्याची शिकवण देतात व त्यामुळे प्रजेत शांतता राहते. जैनाचार्यांच्या प्रभावामुळे दक्षिण भारतात व गुजरातमध्ये जैन धर्मास राजाश्रय मिळाला आणि त्यातील अनेक राजे जैन धर्माचे परम उपासक बनले. मध्ययुगाच्या प्रारंभी दक्षिण भारतातील गंग, कदंब, चालुक्य, राष्ट्रकूट इ. राजवंशांनी जैन धर्मास उदार आश्रय दिला. जैन तत्त्वज्ञान वैचारिक सहिष्णुतेवर आधारलेले आहे. त्यामुळे राजाश्रयाखाली अनुयायी वर्ग वाढून सुसंघटित झाला. दक्षिणेत विजयनगरच्या साम्राज्याच्या पाडावानंतरही अनेक लहानसहान जैन राजे ब्रिटिश अमलाच्या उदयापर्यंत तग धरून राहिले. गुजरातमधील चालुक्य वंशीय राजांमुळे विशेषतः सिद्धराज व कुमारपालामुळे जैन धर्माला वैभवशाली दिवस दिसले.

अर्धमागधी व जैन प्राकृत या भाषांमध्ये जैनांचे तत्त्वज्ञान पुराणे, काव्ये, आणि गणित, वैद्यक, योगशास्त्र, राज्यशास्त्र, व्याकरण इत्यादी विषयांवर ग्रंथरचना झाली. अर्धमागधी व प्राकृत यांचे महत्त्व राखूनही संस्कृतमध्ये देखील तत्त्वज्ञान आणि इतर विषयांवर जैनाचार्यांनी ग्रंथरचना केली. धार्मिक व लौकिक शास्त्रविषयक गद्यपद्यात्मक विविध विषयावरील साहित्य जैनांनी निर्मिले. हे साहित्य इ. स. च्या पहिल्या शतकापासूनच मुख्यतः निर्माण झाले. अगोदरच्या जैन साहित्याच्या प्रामाण्याबद्दल श्वेतांबर व दिगंबर यांच्यामध्ये मतभेद आहेत. जैन आगम ग्रंथ अर्धमागधीमध्ये आहेत. त्यात ४५ ग्रंथाचा समावेश होतो. या आगमांची रूपरेषा इ. स. पूर्व चवथ्या शतकात पाटलिपुत्र येथे भरलेल्या परिषदेत निश्चित करण्यात आली; परंतु त्यांच्या परंपरेत खंड पडल्यामुळे विस्कळितपणा आला. इ. स. पाचव्या शतकात सौराष्ट्रातील वलभी येथे आगम ग्रंथांना निश्चित स्वरूप देण्यात आले. आजही जवळजवळ याच स्वरूपात ते उपलब्ध आहेत.

मूर्ती, वास्तु व अन्य भारतीय कलांच्या विकासास जैनांनी विशेष हातभार लावला आहे. भारतातील गुंफा किंवा प्राचीन लेणी व जैन मंदिरे इतिहासकालातील अनेक आघात सोसूनही बऱ्याच प्रमाणात शिल्लक आहेत. ओरिसातील हाथीगुंफा लेणी इ. स. पूर्व दुसऱ्या शतकातील आहेत. दक्षिण व उत्तर भारतात अजूनही सुरेख, विशाल व वैभवशाली अशी मंदिरे दिसतात. ही मंदिरे मोक्याच्या ठिकाणी व शांत परिसरांत बांधली आहेत. अबू व पालिठाणा येथील संगमरवरी मंदिरे सौंदर्याने साकार झाली आहेत. भारतीय मूर्तिपूजेच्या कर्मकांडाचे आदर्श स्वरूप या मंदिरांमध्ये पहावयास मिळते. ह्याही मंदिरांमध्ये तीर्थंकरांच्या व साधूंच्या पादुकांची पूजा होत असते; त्यात नग्न प्रतिमाही असतात. या मूर्तींवरून मूर्तिकलेच्या श्रेष्ठ कौशल्यांची प्रचीती येते. बालकाची निरागसता आणि साधूची निर्विकार शांती ही जैन मूर्तींची खास वैशिष्ट्ये होत. जैन मंदिरे व शिल्पे यांचे आणखी एक वैशिष्ट्य आहे. तेथे ऐतिहासिक घटनांची नोंद असलेले शिलालेख सापडतात. त्यामुळे जैनांच्या आणि एकंदर भारताच्या सामाजिक, धार्मिक व राजकीय इतिहासावर प्रकाश पडतो.

जैन धर्म हा भारताबाहेर पसरला नाही, केवळ भारतातच छोटेसे सामाजिक गट वा जाती करून राहिला. याची अनेक कारणे सांगता येतात. पहिले कारण असे, की प्रपंचाचा बंध नसलेले साधूंचे संघ

अनुक्रमणिका

कडक तपश्चर्येतच अंतर्मुख होऊन आत्मरत राहिले. बौद्ध धर्माप्रमाणे विश्वोद्धाराची प्रेरणा त्यात मुळात नव्हती. साक्षात्कारानंतर स्वतः भगवान बुद्धच धर्मदीक्षा देत, तपश्चर्या आणि उपदेश करीत व परिक्रमण करीत राहिला; आणि तोच आदर्श भिक्षुसंघाने पुढे चालविला. त्याचप्रमाणे बौद्धधर्माने देहक्लेशकारक कडक तपश्चर्येचा धर्म अमान्य केला; त्यामुळे सशक्त उत्साहसंपन्न बौद्ध भिक्षु पृथ्वीवर सर्वत्र देशोदेशी संचार करू लागले. दुसरे अत्यंत महत्त्वाचे कारण असे, की जैन धर्माने आहार-विहाराचे कठोर नियम सांगितले आणि अहिंसा व्रताला आत्यंतिक आणि अव्यवहार्य रूप दिले. त्यामुळे शेतकरी, सुतार, लोहार, चांभार इ. तथाकथित शूद्र व्यवसायी समाज अपवित्र ठरला. भारतातला मोठा बहुजनसमाज हा मत्स्यमांसाहारी असल्यामुळे त्याने जैनधर्माकडे पाठ केली. जैनांशिवायचा समाज कंदमुळांचाही आहारात सरसा वापर करतो आणि भारताबाहेरच्या समाजाच्या आहार विहाराच्या पद्धती तर जैनांच्या अहिंसा व्रतापासून फार दूर आहेत. म्हणून जैन धर्म भारताच्या बाहेर न जाता केवळ एका लहानशा सामाजिक गटाचाच धर्म बनला. उलट बौद्ध भिक्षूंना भिक्षेत मिळालेले मांसान्न सेवन करण्याची संमती होती. निर्बंध एवढाच होता, की ज्या गृहस्थाकडे भिक्षेकरिता जावयाचे त्याला आपण भिक्षेस येत आहोत अशी सूचना द्यावयाची नाही. बौद्ध भिक्षूंना सर्व प्रकारचा शाकाहार घेण्यास संमती होती. जैन धर्म जन्मसिद्ध चातुर्वर्ण्य तत्त्वतः मान्य करीत नसला तरी कडक आचार धर्मामुळे जैन धर्मीय प्रत्यक्ष व्यवहारात जातिभेद कडकपणे पाळतात. अजूनही दलितांना जैन मंदिरांत प्रवेश मिळत नाही किंवा जैन धर्माची दीक्षाही मिळू शकत नाही.

श्वेतांबर जैन साधू परिधानाची कमीत कमी वस्त्रे, साधे अंथरूण–पांघरूण, भिक्षापात्र, दंड, जमिनीवरील लहान कीटांची हत्या होऊ नये म्हणून जमीन झाडण्याकरिता आवश्यक असलेली चवरी आणि मुखामध्ये सूक्ष्म जंतू जाऊ नयेत म्हणून तोंड झाकण्याकरिता आवश्यक असलेला छोटा रुमाल, एवढीच सामग्री बाळगतात. जैन साध्वींना काही अधिक वस्त्रे बाळगण्यास अनुमती आहे. दिगंबर साधू तर नग्न राहतात; परंतु मोराच्या पिसांची किंवा गाईच्या शेपटीच्या केसांची चवरी (चामर) जवळ बाळगतात. सर्व जैन साधू वस्त्याने मुंडन न करता डोक्याचे केस उपटून मुंडन करतात. यास केशलुंचन म्हणतात. त्याच्यामते सर्व भौतिक अणुरेणू, धूळ, दगड इ. सर्वांमध्ये जीवात्मे राहतात. म्हणून त्यांची हिंसा होऊ नये म्हणून जैन साधूला फार जपून पावले टाकावी लागतात. खोदणे, नांगरणे, कापणे, ठोकणे, आपटणे, जाळणे इ. क्रिया वर्ज्य आहेत. पृथ्वी, जल, अग्नी व वायू यांच्या अणुंमध्ये सुद्धा जीव आहेत; ते सर्व सजीव आहेत. त्याचप्रमाणे वृक्ष, किडा मुंगी, हत्ती इ. सर्व प्राण्यांमध्ये जीव आहेतच. या जीवांना त्रास वा दुःख होऊ नये, म्हणून पावले हळू टाकणे, त्यांना उपद्रव होईल असे वर्तन न करणे याची खबरदारी जैन मुनी घेतात; याकरिता सार्वत्रिक अहिंसेची भावना दृढ करतात.

**तीर्थंकर** :– विश्व हे जीव व अजीव असे दोन प्रकारचे आहे. सर्व विश्वच सजीव आहे. अजीव व जड विश्वामध्ये सर्वत्र जीव भरलेले आहेत. जड पदार्थ ही जीवांची शरीरे होत. जीव अनंत आहेत. प्रत्येक जीव पूर्व पापपुण्यात्मक कर्मांनी बद्ध असतो. या पापपुण्यात्मक कर्मांच्या योगाने जीवांना उच्चनीच प्रकारची शरीरे प्राप्त होत असतात. जसे कर्म तसे शरीर प्राप्त होते. या संदर्भात कर्म हा शब्द पारिभाषिक आहे. पापपुण्यात्मक वर्तनांनी उत्पन्न होणारे जीवाचे बंधन असणारे विशिष्ट पापपुण्यात्मक द्रव्य असा कर्म शब्दाचा पारिभाषिक अर्थ आहे. कर्मांमुळे सुखदुःखे किंवा विविध भोग प्राप्त होतात. भोगांनी त्या त्या प्रकारची कर्मे क्षीण किंवा नष्ट होतात. अंगाला तेल लावले असताना धुळीचा लेप जसा लागतो तशी ही कर्मात्मक द्रव्ये जीवात्म्याला चिकटतात. म्हणून कर्मांना जैन तत्त्वज्ञानात 'लेश्या' म्हणतात. ही पापपुण्यात्मक कर्मे सदाचरण व दुराचरण यांच्या योगाने निर्माण होतात. काम, क्रोध, लोभ, मोह, मद, मत्सर, या मानसिक कर्मांनीही ही सूक्ष्म व अदृश्य कर्मद्रव्ये उत्पन्न होतात. सदाचरण आणि दुराचरण चालू असते त्यामुळे ती कर्मद्रव्ये सतत उत्पन्न होत असतात. आणि भोगाने ती नष्ट होतात. सर्वच पापपुण्यात्मक कर्मे नष्ट केल्याने जीवात्मा देहबंधातून

अनुक्रमणिका

मुक्त होतो. उग्र तपश्चर्या आणि अहिंसादी पाच महाव्रते पूर्णपणे आचरली म्हणजे कर्मनाश पूर्ण होतो आणि संपूर्ण सत्याचा जीवात्म्याला साक्षात्कार होऊन तो जीवात्मा या संसारसागरातून बाहेर पडतो.

जीवात्मे बद्ध आणि मुक्त असे दोन प्रकारचे. या मुक्त जीवात्म्यांपैकीच सर्वश्रेष्ठ जीवात्मे म्हणजे तीर्थंकर होत. जीवात्म्यांचे शुद्ध स्वरूप ज्ञानमय, आनंदमय व अनंतवीर्यमय असते. हे जीवात्मे शरीरात बद्ध असताना त्या त्या शरीराच्या आकाराचे असतात. मुंगीच्या शरीरात मुंगीएवढे आणि हत्तीच्या शरीरात हत्तीएवढे असतात. ते मुक्त झाले म्हणजे या भौतिक विश्वाने भरलेल्या आकाशातून शुद्ध अशा विश्वाच्या मस्तकावर असलेल्या उंच आकाशात जाऊन अनंतकालपर्यंत स्थिरावतात. या भौतिक विश्वाने भरलेल्या आकाशास ‘ लोकाकाश ’ आणि अत्यंत उंचीवर असलेल्या शुद्ध आकाशास ‘ अलोकाकाश ’ म्हणतात. २४ तीर्थंकर हे अलोकाकाशात शांत, ज्ञानमय व आनंदमय स्थितीमध्ये विराजमान झाले आहेत. एखादा पोकळ भोपळा किंवा पाण्याचा बुडबुडा जसा वरवर जातो आणि पाण्याच्या वरच्या स्तरावर स्थिरावतो, त्याप्रमाणे अंगावरील कर्माचा लेप स्वच्छ धुवून गेलेले जीवात्मे म्हणजे मुक्तात्मे या लोकाकाशातून वर निसटून अलोकाकाशात स्थिरावतात.

वृषभदेवांपासुन महावीरांपर्यंत २४ तीर्थंकर झाले आहेत. या तीर्थंकरांपैकी पार्श्वनाथ आणि वर्धमान महावीर यांचे ऐतिहासिक अस्तित्व मान्य झाले आहे. पार्श्वनाथ हा २३ वा तीर्थंकर २२ व्या नेमिनाथ अरिष्टनेमि या तीर्थंकराचा शिष्य होय. वर्धमान महावीराचा पिता सिद्धार्थ व माता त्रिशला हे पार्श्वनाथाचे उपासक जैनच होते. बिहारमधील वैशालीजवळच्या कुंडग्राम या गावात महावीराचा जन्म झाला. महावीराने वयाच्या तिसाव्या वर्षी श्रमणदीक्षा घेतली. दीक्षेनंतर १३ महिन्यानी तो नग्न स्थितीत राहू लागला. बारा वर्षे तप आचरले व केवली बनला. केवली म्हणजे सर्वज्ञ. ७२ व्या वर्षी त्याचे पावा या गावी निर्वाण झाले. दिगंबर मताप्रमाणे इ. स. पू. ५०९ हे निर्वाणाचे वर्ष, श्वेतांबर मते इ. स. पू. ५२७ हे वर्ष आणि पश्चिमी विद्वानांच्या मते इ. स. पू. ४८० हे वर्ष महावीराच्या निर्वाणाचे वर्ष मानले आहे. महावीर जैन धर्माचा प्रथम संस्थापक नव्हे. त्याने जैन धर्माला नवीन उजळा दिला. पार्श्वनाथाने अहिंसा, सत्य, अस्तेय आणि अपरिग्रह अशी चार महाव्रते मानली, महावीराने ब्रह्मचर्य व्रताची त्यात भर घातली, असे जैन धर्मग्रंथावरून लक्षात येते.

**धर्म व तत्त्वज्ञान :–** सृष्टीचा कर्ता आणि नियंता असा सर्वज्ञ आणि सर्वशक्तिमान ईश्वर जैन धर्मास मान्य नाही. धर्मोपदेश करणारे तीर्थंकर हे सृष्टिनिर्माते व सृष्टिनियंते नव्हते; परंतु ते मुक्त, ज्ञानमय आणि आनंदमय आहेत. त्यांच्या उपदेशाचे अनुसरण करून आणि त्यांची उपासना करून बद्ध जीवात्म्यांना पुण्यप्राप्ती होते आणि सद्‌गती लाभते, इहलोकी आणि परलोकी कल्याण प्राप्त होते, त्याचप्रमाणे श्रमणदीक्षा घेऊन तपश्चर्या आणि पाच महाव्रतांचे आचरण करून मोक्ष प्राप्त होतो.

जीवाच्या बंधमोक्षांची क्रमाने प्रक्रिया अशीः– आस्रव, संवर, निर्जर व मोक्ष. जीव आणि अजीव यांचा संयोग म्हणजे बंध. हा संयोग कर्मांनी होतो, आणि कर्मक्षय संपूर्ण झाला म्हणजे मोक्ष मिळतो. जीवन जगत असताना पापपुण्यात्मक कर्मे जीवावर स्रवत असतात आणि त्यामुळे शरीर प्राप्त होऊन संसारभोग भोगावे लागतात. कर्मद्रव्ये ही अणूंचे समुदाय असतात. अणुसमुदाय म्हणजे पुद्‌गल होय. ही पुद्‌गले जीवात्म्यात शिरतात व भोगाने वा तपश्चर्येने वेगळी होऊन जीवात्म्यातून बाहेर पडतात. हा क्रम सारखा सुरू असतो. कर्मद्रव्यांचा हा स्रव म्हणजे आस्रव होय. चक्षु, श्रोत्र, घ्राण, रसना आणि स्पर्श ही पाच ज्ञानेंद्रिये, कर्मेंद्रिये व मन यांच्या योगाने जी शुभाशुभ कर्मे घडतात ; कामक्रोधादी विकार, मिथ्या ज्ञान, अशांती, प्रमाद इ. गोष्टी घडतात ; त्यामुळे अनंत प्रदेशात पसरलेली कर्मपुद्‌गले जीवात्म्याला येऊन चिकटतात. मिथ्यादर्शन, अविरती, प्रमाद व कषाय ही चार कर्मबंधाची कारणे होत. मिथ्या दर्शन हे तत्त्वावर अश्रद्धा असल्यामुळे किंवा अधार्मिक मनुष्याच्या उपदेशाने उत्पन्न होते. पंच ज्ञानेंद्रिये आणि मन यांचा संयम नसणे म्हणजे अविरती होय. पाच महाव्रते आचरण्याच्या बाबतीत उत्साह नसणे म्हणजे प्रमाद होय. क्रोध,








अहंकार, दंभ आणि लोभ हे कषाय होत. कर्मबंधाची वरील चार कारणे थांबविणे, आस्रवांचा निरोध किंवा शरीर, वाणी आणि मन यांचा निग्रह म्हणजे संवर होय. तपश्चर्येने साठलेली कर्मद्रव्ये आत्म्यातून बाहेर फेकून देणे, म्हणजे निर्जर होय. सर्व कर्मद्रव्ये आत्म्यातून काढून आत्मा शुद्ध झाला म्हणजे मोक्ष सिद्ध होतो.

जैन धर्माच्या तत्त्वज्ञानात जीव आणि अजीव असे दोन मुख्य पदार्थ मानले आहेत. अजीव पदार्थाचे पुन्हा आकाश अस्तिकाय, धर्म अस्तिकाय, अधर्म अस्तिकाय आणि पुद्गलास्तिकाय असे चार प्रकार मानले आहेत. जीव संसारी आणि मुक्त दोन प्रकारचे. जीव, आकाश, धर्म, अधर्म आणि पुद्गल द्रव्यांना अस्तिकाय अशी संज्ञा आहे. हे प्रत्येक द्रव्य-भूत, भविष्य व वर्तमान या तीनही काली असते, म्हणून त्यांना ' अस्ति ' असे म्हणतात; आणि ही पाचही द्रव्ये अनेक प्रदेशांना व्यापून असतात म्हणून त्यांना शरीर म्हणजे ' काय ' असे म्हणतात. ती द्रव्ये आकाशात म्हणजे अवकाशात राहतात. अवकाश देणारे द्रव्य म्हणजे आकाश होय. काल हे द्रव्य असले तरी ते अनेक प्रदेशांमध्ये राहत नाही, म्हणून त्याला अस्तिकाय हा शब्द लावत नाहीत. धर्म हे द्रव्य जीव आणि पुद्गले यांच्यात गती उत्पन्न करते आणि अधर्म हे द्रव्य त्यांच्यात स्थिती म्हणजे स्थैर्य निर्माण करते. येथील धर्म आणि अधर्म हे शब्द रूढ अर्थाचे नसून पारिभाषिक आहेत. स्पर्श, रस आणि रंग ज्या पदार्थांना असतो ती पुद्गले होत. ज्यात गुण असतात आणि बदल होतो ते द्रव्य होय. ' गुणपर्यायवत् द्रव्यम् ' अशी द्रव्याची व्याख्या सांगितली आहे. पर्याय म्हणजे बदल. द्रव्य स्थिर राहून गुण व पर्याय त्यात उत्पन्न होतात. उदा. सुवर्णाचे विविध अलंकार बनतात, या अलंकारांस पर्याय म्हणता येते. बदल झाले तरी सुवर्ण हे द्रव्य स्थिर राहते आणि त्यात रूप, स्पर्श, इत्यादी गुण एकत्र राहतात.

जीवात्म्याला स्वतःचे आणि विश्वाचे जे ज्ञान होते, त्याचे प्रत्यक्ष व परोक्ष असे दोन प्रकार आहेत. आपणास जे इंद्रियांनी व मनाने अंतर्बाह्य विश्वाचे प्रत्यक्ष ज्ञान होते ते जैनांच्या मते साक्षात घडणारे प्रत्यक्ष ज्ञान नव्हे. आत्मा हा ज्ञानरूप आहे. त्याला इंद्रिये किंवा मन यांच्या साहाय्यावाचून स्वतःचे आणि विश्वाचे जे ज्ञान होते, तेच खरोखर प्रत्यक्ष ज्ञान होय. यास अतींद्रिय प्रत्यक्ष ज्ञान म्हणता येईल. अशा प्रकारचे ज्ञान योग्यांना किंवा मुक्त पुरुषांनाच होऊ शकते. त्यांना इतर साधनांची आवश्यकता नसते. इंद्रिये व मन या साधनांनी होणारे ज्ञान मर्यादित अर्थानेच यथार्थ असते. कोणत्याही वस्तूचे स्वरूप अनंत गुणांनी भरलेले असते. ते अनंत गुण साधनांनी कळत नाहीत. साधनांनी त्या गुणांच्या ज्ञानाला मर्यादा पडतात. कर्मद्रव्यांचे आवरण व साधनांचे आवरण बाजूला पडून जे योग्यांना, साधूंना वा सिद्धांना ज्ञान होते त्याचे अवधिज्ञान, मनःपर्यय-ज्ञान आणि केवलज्ञान असे तीन प्रकार होत. स्थलकालाच्या मर्यादा न जुमानता सान्निध्यात वा दूर असलेल्या वस्तू व घटना यांचे ज्ञान अवधिज्ञान होय. व्यक्तीच्या योग्यतेनुसार या ज्ञानाची कमी-जास्त व्याप्ती असते. इतर जीवात्म्यांच्या मनोगत अवस्था, वृत्ती, विकार व विचार यांचे साक्षात ज्ञान म्हणजे मनःपर्ययज्ञान होय. पुण्यसंचयामुळेच हे ज्ञान होते. ज्ञानरूप आत्म्यावर आवरण घालणाऱ्या कर्मांचा संपूर्ण नाश झाल्यावर जीवात्म्याला होणारे संपूर्ण ज्ञान म्हणजे केवलज्ञान होय. याला देशकालांचे बंधन नसते, हे खरोखर प्रत्यक्ष ज्ञान होय. परोक्ष ज्ञानामध्ये मतिज्ञान व श्रुतज्ञान ही ज्ञाने अन्तर्भूत होतात. इंद्रियांनी किंवा अनुमानाने होणारे ज्ञान मतिज्ञान आणि धर्मग्रंथांच्या योगाने म्हणजे श्रुतीने होणारे ज्ञान श्रुतज्ञान होय.

चार्वाकाचा भौतिकवाद, सांख्यांचे प्रकृती आणि पुरुष हे द्वैत, वैशेषिक दर्शनाचा अणुवाद, अद्वैत वेदान्ताचा अद्वैतब्रह्मवाद इ. तत्त्वज्ञाने ही एकांगी असून ती एक प्रकारच्या युक्तिवादाने खरी ठरतात, परंतु दुसऱ्या दृष्टीने ती खरी ठरत नाहीत; या विचारपद्धतीस स्याद्वाद म्हणतात. कोणतेही तत्त्व-ज्ञान नीट रीतीने युक्तिवादाने मांडले तर ते ' स्यात् ' म्हणजे एका दृष्टीने खरे आहे, परंतु संपूर्ण दृष्टीने खरे नाही, असे जैन तत्त्वज्ञान सांगते.

जैन तत्त्वज्ञान हे एका दृष्टीने सर्व तत्त्वज्ञानांचा समावेश करणारे तत्त्वज्ञान आहे. परंतु सगळीच तत्त्वज्ञाने ही अप्रत्यक्ष वा परोक्ष ज्ञानात अंतर्भूत होतात. म्हणून त्यांना केवलज्ञान म्हणता येत नाही. जैनांच्या स्याद्वादाच्या दृष्टिकोनामुळे परमत-सहिष्णुता व निःपक्षपाती दृष्टी उत्पन्न होते; अभिमान व रागद्वेषादी विकार उत्पन्न होत नाहीत. अहिंसाव्रताला हा दृष्टिकोन अत्यंत पूरक आहे. जैन तत्त्वज्ञानाची ही महत्त्वाची कामगिरी आहे.

अनुक्रमणिका

# ख्रिश्चन धर्म आणि आधुनिक विवेकवादाचा उदय

इ. स. १६९६ मध्ये जॉन टोलँड यांनी त्या काळच्या पद्धतीला अनुसरून पुढील लांबलचक नावाचा ग्रंथ प्रसिद्ध केला : "ख्रिस्ती धर्मसिद्धांत गूढ नाहीत– शुभवर्तमानात विवेकशक्तीच्या विरोधी किंवा पलीकडे असलेले असे काही नाही आणि कोणत्याही ख्रिस्ती सिद्धांताला गूढ म्हणणे उचित ठरणार नाही असे दाखवून देणारा (ग्रंथ)." असे म्हणतात की ख्रिस्ती धर्मात जे सिद्धांत श्रद्धेने स्वीकारण्यात येतात त्यांच्यांत विवेकविरोधी असे काहीच नाही हे युक्तिवादाने पटवून देण्याचा प्रयत्न टोलँड ह्यांनी केल्यानंतरच ही श्रद्धा स्थिर मनाने स्वीकारणाऱ्या अनेकांना हे सिद्धांत विवेक-संगत आहेत का असा संशय वाटू लागला.

ते काही असो, स्वतःला ख्रिस्ती म्हणविणाऱ्या सर्वांना मान्य होतील असे ख्रिस्ती सिद्धांत मांडणे आणि ते सर्वांना मान्य होतील अशा रीतीने मांडणे अशक्यप्राय आहे. कारण जे सिद्धांत कोणत्याही रीतीने मांडले तरी अनाकलनीय ठरतील– ज्यांचे यथार्थ आकलन आपल्याला झाले आहे की नाही हे ठरविण्याचा मार्ग ज्यांच्या बाबतीत उपलब्ध नाही– अशा सिद्धांतांच्या शाब्दिक मांडणींतील सूक्ष्म भेदां-मुळेही ख्रिश्चन धर्मात पंथोपपंथ निर्माण झाले आहेत आणि त्यांच्यात रणे माजली आहेत. तरीही हा प्रयत्न करून पहाण्यासारखा आहे.

ख्रिश्चन पंथ हा सुरवातीला ज्यू जमातीतील एक पंथ होता असे म्हणणे योग्य ठरेल. ख्रिस्ती धर्माचा संस्थापक येशू हा एक ज्यू होता आणि येशूनंतर ख्रिस्ती धर्माचा प्रचार करणारे पहिले अकरा उपदेशक (Apostles) ज्यू होते. ज्यू जमातीला तिचा 'कायदा'– स्मृतिग्रंथ–(thorah) देवाकडून (जेहोवाकडून) मोझेस ह्या प्रेषिता-मार्फत मिळाला होता. ज्यू जमातीवर निरंतर बंधनकारक असलेला आणि अपरिवर्तनीय असा हा कायदा होता. हा कायदा नष्ट करायला मी आलेलो नाही तर त्याची परिपूर्ती करायला मी आलो आहे असे येशूचे सांगणे होते. तेव्हा 'जुना करार' हा ज्यू धर्मग्रंथ ख्रिस्तो धर्मग्रंथाचा एक भाग म्हणून मान्य करण्यात आला आहे आणि ख्रिस्ती माणूस त्याचे ईश्वराचा संदेश म्हणून प्रामाण्य मान्य करतो.



येशू हा 'ख्रिस्त' किंवा 'मेसाया' आहे अशी ख्रिश्चनाची श्रद्धा असते. ('मेसाया' हा हिब्रू शब्द आहे, 'ख्रिस्त' हा शब्द 'मेसाया' ह्या शब्दाच्या ग्रीक पर्यायाचे इंग्रजीकरण आहे.) 'ख्रिस्त' म्हणजे 'अभिषिक्त' आणि अभिषिक्त असल्याने पवित्र असलेला. असा एक महान् राजा, मेसाया, अवतीर्ण होईल आणि ज्यू जमातीला आपले पूर्वीचे वैभव आणि वर्चस्व प्राप्त करून देईल अशी ज्यूंची श्रद्धा होती. जो ख्रिस्त किंवा मेसाया येऊन ज्यू जमातीचा उद्धार करील असे देवाचे अभिवचन होते तो ख्रिस्त म्हणजे येशूच होय हा ख्रिस्ती श्रद्धेचा गाभा आहे.

पण हा ख्रिस्त पृथ्वीवरचा सत्ताधीश नाही आणि तो ज्यू जमातीला पृथ्वीचे राज्य प्राप्त करून देण्या-साठी अवतरलेला नाही. त्याचे राज्य माणसाच्या अंतरात्म्यात आहे. जीझस हा एक माणूस होता. पण त्याच्या रूपाने ख्रिस्त–चैतन्य (chirst-spirit) पृथ्वीवर, मानवी इतिहासात अवतीर्ण झाले होते. जीझस हा मानवाचा पुत्र आणि देवाचा पुत्र आहे. 'ह्याच जीझसला, ज्याला तुम्ही क्रूसावर ठार मारले त्याला, ईश्वराने प्रभू (Lord) आणि ख्रिस्त बनविले आहे' असे पीटर या उपदेशकाचे वचन आहे. 'ख्रिस्त चैतन्य', 'पवित्र चैतन्य', 'चैतन्य' हे शब्द एकाच अर्थाचे आहेत. ईश्वराचे हे चैतन्य

अनुक्रमणिका

त्याच्या इच्छेनुसार जीझसमध्ये पूर्णपणे प्रविष्ट झाले आणि तो पूर्णपणे पवित्र झाला आणि देवपुत्र झाला; तो ख्रिस्तच बनला. ख्रिस्ताद्वारा हे चैतन्य इतर माणसातही प्रवेश करते आणि ती ख्रिस्ताशी, व म्हणून ईश्वराशी एकरूप होतात. " मी माझ्या पित्यात आहे आणि तुम्ही माझ्यात आहात आणि मी तुमच्यात आहे. "

ह्या ख्रिस्त-चैतन्याचे स्वरूप आणि कार्य काय असते? ख्रिस्त हा माणसाचा पाठिराखा, त्याचे सान्त्वन करणारा, आश्वासक, माणसाच्या वतीने देवाना गळ घालणारा असा ( Paraclet, comforter ) आहे. ख्रिस्तचैतन्य जेव्हा माणसात प्रवेश करते तेव्हा त्याचा आत्मा पापापासून मुक्त होतो आणि तो ख्रिस्ताशी व ख्रिस्ताद्वारा माणसाशी एकरूप होतो. पण ह्या संबंधात आणखी एका ख्रिश्चन संकल्पनेची दखल घेणे आवश्यक आहे. माणसाने ईश्वराची अवज्ञा केल्यामुळे ईश्वर क्रुद्ध झाला आणि प्राण्यांना बळी देऊन ईश्वराचा क्रोध काही प्रमाणात तरी शांत करता येतो अशी ज्यू श्रद्धा होती आणि त्यानुसार मंदिरांत प्राण्यांचे बळी देण्याची प्रथा होती. पण हे सर्व जुन्या कराराप्रमाणे. नंतर जीझसने क्रुसावर 'एक पुरेपूर परिपूर्ण आणि पर्याप्त असा यज्ञ केला, आहुती दिली आणि सबंध जगाच्या पापाचे परिमार्जन केले.' म्हणजे क्रुसावर जीझसचा जो बध झाला तो सर्व जगाच्या पापाचे परिमार्जन करण्यासाठी केलेला आत्मयज्ञ होता आणि त्याच्या रक्ताने सबंध मानवजातीचे पाप धुऊन निघाले, देवाचा क्रोध शांत झाला. तेव्हा येथे दोन संकल्पना आहेत. एक अशी की, ईश्वराने जीझस ह्या माणसात ख्रिस्त-चैतन्य प्रविष्ट केले आणि तो ख्रिस्त झाला; ख्रिस्ताशी, म्हणजे ख्रिस्त-चैतन्याशी एकरूप झाल्याने माणूस पापापासून मुक्त होतो. दुसरी अशी की जीझसने स्वतःचा बळी देऊन माणसाला पापापासून मुक्त केले.

ह्या संकल्पनांपासून विकास पावून कित्येक ख्रिस्ती धर्मसिद्धांत ( dogma ) स्थिर झाले. एकतर पापापासून मुक्त करणारा जीझस स्वतःच पापमुक्त असणे आवश्यक असल्यामुळे आणि समागमापासून नैसर्गिक रीतीने होणारा जन्म पापमय असल्यामुळे जीझसचा जन्म पवित्र चैतन्य आणि कुमारी माता यांच्यापासून होतो. दुसऱ्या सिद्धांतानुसार जीझसला देवत्व देण्यात आले. जीझस केवळ देवपुत्र नाही, तो देवच आहे. देव एकच आहे पण त्याचे स्वरूप त्रिविध आहे. एका देवात तीन भिन्न व्यक्ती सामावलेल्या आहेत; पिता असलेला देव, पुत्र असलेला देव ( प्रभू येशू ख्रिस्त ) आणि पवित्र चैतन्य. पण देव म्हणजे ह्या तीन भिन्न व्यक्ती असल्या तरी देव म्हणजे ह्या तीन भिन्न व्यक्तींचे त्रिकूट नाही, समुदाय नाही. ह्या तीन्ही व्यक्तींचे सत्त्व एकच आहे. हा सिद्धांत म्हणजे देवाच्या त्रित्वाचा ( Trinity ) सिद्धांत. हे एक पवित्र गुह्य आहे. "सर्वशक्तिमान पिता असलेला आणि सर्व दृश्य व अदृश्य वस्तूंचा कर्ता असलेला जो एक ईश्वर त्याच्यावर आम्ही श्रद्धा ठेवतो, आणि प्रभू येशू ख्रिस्त ह्यावर, जो देवपुत्र आहे, ज्याला पित्याने जन्म दिला, ज्या एकालाच पित्याने जन्म दिला, पित्याचे सत्त्व हेच ज्याचे सत्त्व आहे, जो देवाचा देव, प्रकाशाचा प्रकाश, साक्षात् देवाचा जो साक्षात् देव आहे, जो ( पित्यापासून ) जन्माला आला पण ज्याला ( पित्याने ) घडविला नाही, ज्याने सर्व वस्तू, स्वर्गातील तसेच पृथ्वीवरील साऱ्या वस्तू बनविल्या आहेत, त्या पित्याचे सत्त्व हेच ज्याचे सत्त्व आहे, त्या प्रभू येशू ख्रिस्तावर आम्ही श्रद्धा ठेवतो; जो आम्हा माणसांसाठी खाली आला आणि देहधारी झाला, ज्याला माणूस बनविण्यात आले आणि ज्याने यातना भोगल्या, जो तिसऱ्या दिवशी उठला, ज्याने स्वर्गात आरोहण केले आणि जिवंत आणि मृत ह्या सर्वांचा न्याय करायला जो येणार आहे त्या प्रभू येशू ख्रिस्तावर आम्ही श्रद्धा ठेवतो. आणि पवित्र चैतन्यावर श्रद्धा ठेवतो." असा ख्रिश्चन श्रद्धेचा आशय आहे.

ध्यानात घेण्यासारखी आणखी एक गोष्ट अशी की ह्या श्रद्धेच्या आशयाची सुसंगत बौद्धिक मांडणी करण्यासाठी ग्रीक तत्त्वज्ञानातील– प्लेटो, ॲरिस्टॉटल, प्लॉटिनस यांच्या तत्त्वज्ञानातील–संकल्पनांचा आणि परिभाषेचा वापर अपरिहार्यपणे करण्यात आला. ज्यू आणि ख्रिश्चन धार्मिक अनुभव आणि ग्रीक तात्त्विक संकल्पना ह्यांच्या मिलाफातून मध्ययुगातील ख्रिश्चन धर्मसिद्धांतांना त्यांचा आशय व आकार प्राप्त झाला. ईश्वर, आत्मा, केवल सत्ता

( absolute reality ), परिपूर्णता, हेतू, मूल्य, नीती, ज्ञान, इ. ज्या संकल्पना प्रगल्भ धार्मिक अनुभव व्यक्त करण्यासाठी वापराव्या लागतात त्या ख्रिश्चन धर्मशास्त्रज्ञांना ग्रीक तत्त्वज्ञानापासून लाभल्या. उदा. प्लॉटिनस ह्या तत्त्ववेत्त्याचा एक सिद्धांत असा आहे की एका आदिम सत् पासून चैतन्य ( नुस ) निष्पन्न होते, हे चैतन्य सत्चे प्रतिबिंब असते आणि ह्या चैतन्याशी एकरूप होणे हे जीवात्म्याचे ध्येय असते. हा सिद्धांत आणि त्रित्वाचा ख्रिश्चन सिद्धांत ह्यांच्यामधील साम्य लक्षणीय आहे.

ह्या श्रद्धेच्या पार्श्वभूमीवर विवेकवादाचा उदय कसा झाला हे आपल्याला पहायचे आहे. अनुभवाच्या कोणत्याही क्षेत्रात सत्य शोधून काढायचा अधिकार आणि जबाबदारी मानवी विवेकशक्तीची असते असे मानणे म्हणजे विवेकवादाचा स्वीकार करणे. अनुभवाच्या भिन्न क्षेत्रांतील सत्यांचे स्वरूपही भिन्न असेल; आणि ही सत्ये प्रस्थापित करण्याचे निकषही भिन्न असतील, उदा. काय आहे ह्याविषयीचे सत्य आणि माणसाने काय साधावे, कसे जगावे ह्याविषयीचे सत्य ह्यांची स्वरूपे आणि ती प्रस्थापित करण्यासाठी ज्या प्रकारचे पुरावे आवश्यक असतात त्यांची स्वरूपे भिन्न असतील. पण अनुभवाच्या कोणत्याही क्षेत्रात सत्याचे स्वरूप काय असते, ते कोणत्या प्रकारच्या पुराव्याच्या आधारे सिद्ध करावे लागते ह्याचा निर्णय करण्याचा आणि सत्य काय आहे हे निश्चित करण्याचा अधिकार मानवी विवेकशक्तीचा असतो हा विवेकवादाचा मूलभूत सिद्धांत होय.

मध्ययुगाची जी सहज, साधी, जीवनव्यापी धार्मिक श्रद्धा होती तिला विज्ञानामुळे तडा गेला. पण विज्ञानाने लावलेल्या शोधांमुळे हा तडा गेला नाही. वैज्ञानिक ज्ञानाच्या संकल्पनेमुळे तो गेला. ज्ञानाच्या क्षेत्रात माणसाने जे साधले पाहिजे, जे साध्य स्वीकारले पाहिजे ते म्हणजे वस्तूविषयीचे वैज्ञानिक ज्ञान संपादन करणे हे होय ह्या विचारामुळे तो गेला.

मध्ययुगातही अर्थात् माणसांना त्यांच्या नेहमीच्या अनुभवांपासून प्राप्त होणारे वस्तूंच्या गुणधर्मांचे, त्यांत होणाऱ्या फेरबदलांचे ज्ञान होते; कारागिरांचे हे ज्ञान अधिक तपशीलवार आणि नेमके असणार, पण हे ज्ञान वस्तूंविषयीचे असले आणि अनुभवावर आधारलेले असले तरी ते 'वैज्ञानिक' ज्ञान नव्हते. ते वैज्ञानिक ज्ञान नव्हते कारण मध्ययुगात त्याची एका विशिष्ट प्रकारे 'बौद्धिक व्यवस्था,' लावण्यात येत होती, त्याचा एका विशिष्ट प्रकारे 'अर्थ' लावण्यात येत होता. ही बौद्धिक व्यवस्था विश्वाविषयीच्या एका 'दर्शना'वर आधारली होती. आपल्याला इतिहासात फार मागे किंवा खोल जाता येणार नाही पण सरधोपटपणे एवढे म्हणता येईल की हे दर्शन ख्रिस्ती धर्मश्रद्धा आणि ॲरिस्टॉटलचे तत्त्वज्ञान ह्यांच्या समन्वयावर, 'मिलाफा'वर आधारले होते. हा मिलाफ मुख्यतः सेंट टॉमस ॲक्वायनसने घडवून आणला होता.

हे दर्शन थोडक्यात असे मांडता येईल. हे जग ईश्वराने निर्माण केले आहे आणि स्वतःच्या स्वरूपाचा, सत्त्वाचा ( essence ) पूर्णपणे आविष्कार करणे हे जग निर्माण करण्यामागचे त्याचे प्रयोजन आहे. तेव्हा ईश्वर हा सर्व वस्तूंचा आधार आणि उगम आहे. ईश्वराने अनेक प्रकारच्या वस्तू निर्माण केल्या आहेत आणि हे जग म्हणजे वेगवेगळ्या वस्तुप्रकारांची श्रेणी आहे; भिन्न वस्तुप्रकारांचे परस्परांशी श्रेष्ठत्व-कनिष्ठत्वाचे जे संबंध असतात त्यांच्यातून ही श्रेणी सिद्ध होते. ( उदा. निर्जीव वस्तूंपेक्षा वनस्पती श्रेष्ठ आहेत, वनस्पतीपेक्षा प्राणी श्रेष्ठ आहेत, इ. ) प्रत्येक प्रकारच्या वस्तूला ईश्वराने तिची स्वतःची 'प्रकृती', तिचे स्वतःचे 'रूप' दिले आहे आणि हे त्या वस्तूचे अनिवार्य असे स्वरूप असते. हे स्वरूप त्याच्या पूर्ण विकसित अवस्थेत प्रत्यक्षात धारण करण्यात त्या वस्तूचे 'कल्याण' असते. उदा. एखाद्या झाडाची बी घेतली तर एक बी हे तिचे प्रत्यक्ष रूप असते, पण एक झाड हेही तिचे खरेखुरे स्वरूप आहे आणि एक बी हे तिचे जे सध्याचे प्रत्यक्ष स्वरूप आहे त्याच्यात ते दडलेले आहे, 'अंतर्हित' आहे. झाड बनण्याची क्षमता त्या बीच्या ठिकाणी आहे आणि म्हणून झाड हे जे तिचे वास्तव स्वरूप आहे ते सध्या केवळ एक क्षमता (potentiality) म्हणून तिच्या अंगी आहे.

अनुक्रमणिका

बीला अंकुर फुटून, त्याचे रोपटे बनून, त्याची पूर्ण वाढ होऊन झाड होण्याची जी प्रक्रिया असते तिच्याने, झाड हे तिचे खरेखुरे स्वरूप तिच्या ठिकाणी जे क्षमता म्हणून होते त्याच्याऐवजी प्रत्यक्ष, विद्यमान (actual) होते. असे स्वरूप प्रत्यक्षात धारण करण्यात त्या वस्तूचे कल्याण तिची पूर्णता असते. ईश्वर परिपूर्ण आहे आणि प्रेमस्वरूप आहे. तेव्हा ईश्वराने प्रत्येक निर्मित वस्तूच्या अंतरंगात प्रेमाचे आरोपण केले आहे. प्रेम म्हणजे पूर्णतेविषयीचा ओढा. प्रत्येक वस्तूला परिपूर्ण अशा ईश्वराचा ओढा असतो, प्रेम असते आणि स्वतःच्या स्वरूपाला साध्य असलेली, त्याच्याशी जुळणारी पूर्णता साधण्याची धडपड करून ती हे प्रेम व्यक्त करते. तेव्हा, विश्वात ज्या कार्यकारणात्मक प्रक्रिया घडत असतात त्यांच्यामागे प्रेमाची प्रेरणा असते. ईश्वर सर्व वस्तूंचा केवळ निर्माता नाही, ते सर्व वस्तूंचे साध्यही आहे आणि विश्वातील सर्व प्रक्रिया सहेतुक असतात.

ह्या दर्शनाच्या पार्श्वभूमीवर सेंट टॉमस गतीचे स्पष्टीकरण कसे करतात ते पाहू या. गती म्हणजे केवळ स्थलांतर, एका स्थानाकडून दुसऱ्या स्थानाकडे जाणे नव्हे; गती म्हणजे स्थित्यंतर किंवा अवस्थांतर. अवस्थांतर होते तेव्हा जे रूप वस्तूच्या ठिकाणी क्षमतेच्या स्थितीत अस्तित्वात असते ते तिच्या ठिकाणी प्रत्यक्ष विद्यमान होते. क्षमतेपासूनचा विद्यमानतेकडे होणारा प्रवास म्हणजे गती; आणि विश्वात गतीला अस्तित्व आहे, कारण 'क्षमते'च्या स्थितीत असलेल्या वस्तूंना 'विद्यमानते'ची स्थिती प्राप्त करून घेण्याची आकांक्षा असते. आता पृथ्वी आणि अग्नी ही दोन 'महाभूते' घेतली तर 'खालच्या' स्थळी असणे हा धर्म पृथ्वीच्या स्वरूपाचा घटक आहे आणि 'वरच्या' स्थळी असणे हा धर्म अग्नीच्या स्वरूपाचा घटक आहे. तेव्हा पृथ्वीची बनलेली वस्तू जर वरच्या स्थळी असेल, तर त्याचा अर्थ असा होतो की खाली असणे हा जो तिच्या अनिवार्य स्वरूपाचा घटक असलेला धर्म आहे तो ह्या अवस्थेत तिच्या अंगी प्रत्यक्षपणे नाही; तो केवळ क्षमता म्हणून तिच्या अंगी आहे. तेव्हा तो प्रत्यक्षपणे धारण करण्यासाठी म्हणून ती वस्तू खाली जाऊ लागते. ह्याच न्यायाने अग्नीच्या अंगी वर जाण्याची प्रवृत्ती अनिवार्यपणे असते.

आणखी एक मुद्दा आहे. 'खाली' आणि 'वर' हे परस्परविरुद्ध धर्म आहेत आणि खालून वर जाणे किंवा वरून खाली जाणे म्हणजे विरुद्धाकडून विरुद्धाकडे जाणे. आता सर्वच गतीचे हे समान स्वरूप असते. उदा. थंडपणा आणि उष्णता हे परस्परविरुद्ध धर्म आहेत. अग्नीचा उद्भव होणे म्हणजे जे थंड आहे ( उदा. लाकूड ) ते उष्ण होणे. उलट एखाद्या विशिष्ट अग्नीचे उष्णत्व जाऊन जर तो थंड झाला तर अग्नी हे त्याचे स्वरूप भ्रष्ट झाले असे होईल. ह्या स्वरूपाच्या गती–स्थित्यंतरे–विरुद्धापासून विरुद्धाकडे जाणाऱ्या असतात; म्हणजे एका टोकापासून दुसऱ्या टोकाकडे जाणाऱ्या गती असतात. अग्नी नसलेले, पण अग्नी हे स्वरूप धारण करण्याची क्षमता असलेले काहीतरी जेव्हा अग्नी हे स्वरूप प्रत्यक्षपणे धारण करते, किंवा अग्नी हे रूप धारण करणारे काहीतरी जेव्हा हे रूप गमावते, हे त्याचे रूप जेव्हा भ्रष्ट होते तेव्हा घडून येणारे स्थित्यंतर किंवा 'गती' ह्या स्वरूपाची असते; एका अवस्थेकडून विरुद्ध अवस्थेकडे जाणारी असते. अशी गती सरळ रेषेने जाणारी असते. उदा. पृथ्वीची बनलेली वस्तू वरून सरळ खाली येते. पण सेंट टॉमसच्या म्हणण्याप्रमाणे आकाशस्थ ग्रहगोलांची गती पूर्णपणे वर्तुलात्मक असते. म्हणजे ती एका टोकापासून दुसऱ्या टोकाकडे जाणारी, विरुद्धाकडून विरुद्धाकडे जाणारी रेषात्मक गती नसते. तेव्हा ग्रहगोलांच्या बाबतीत त्यांचे स्वरूप भ्रष्ट होण्याचा किंवा त्यांच्या ठिकाणी अंतर्हित असलेले स्वरूप पूर्णपणे प्रकट होण्याचा प्रश्नच नसतो. त्यांचे स्वतःचे जे अनिवार्य स्वरूप असते ते त्यांच्याठिकाणी पूर्णपणे विद्यमान स्थितीत प्रकट झालेलेच असते, ते नित्य असते आणि अपरिवर्तनीय असते. म्हणून ग्रहगोल हे परिपूर्ण ( perfect ) असतात आणि ह्या परिपूर्णतेला साजेशी अशी त्यांची पूर्ण वर्तुलात्मक अशी गती असते.

गॅलिलिओचा गतीकडे पाहण्याचा दृष्टिकोन पूर्णपणे वेगळा आहे. वस्तूंना गती का प्राप्त होते, त्या गतिमान का होतात ह्या प्रश्नात गॅलिलिओला स्वारस्य नाही. म्हणजे वस्तूंच्या अंगी असलेल्या कोणत्या प्रवृत्तीतून किंवा आकांक्षेतून वस्तू गमन करतात हा प्रश्न तो बाजूला सारतो. गतिमान

अनुक्रमणिका

वस्तूंच्या गतीचे स्वरूप काय असते, ती कशी घडते एवढाच प्रश्न तो विचारतो. त्याला फक्त गतीचे बिनचूक वर्णन करायचे आहे आणि एका विशिष्ट प्रकारचे वर्णन करायचे आहे. त्याला गतीचे गणिती, संख्यात्मक वर्णन करायचे आहे. तेव्हा गॅलिलिओ गतीचे वेगवेगळे घटक मापतो. वरून खाली पडणारी वस्तू किती वेळात किती अंतर काटते, खाली पडायला सुरवात केल्यापासून अमुक वेळेनंतर तिचा वेग किती असतो हे तो मापतो. आणि गतीच्या प्रक्रियेचा आराखडा देणारे एक गणिती सूत्र तो शोधून काढतो. उदा. 'वरून खाली पडणाऱ्या वस्तूचा वेग ती जितका काळ पडत असेल त्याच्या प्रमाणात असतो;' किंवा 'अशा वस्तूने काटलेले अंतर पडण्याच्या काळाच्या वर्गाच्या प्रमाणात वाढत जाते,' इ.

सेंट टॉमसचा दृष्टिकोन आणि गॅलिलिओचा दृष्टिकोन यांच्यातील भेदाचे वर्णन कसे करता येईल? एकतर सेंट टॉमसचा सबंध अस्तित्वाला व्यापणारा असा तत्त्वमीमांसक ( metaphysical ) दृष्टिकोन आहे, त्याची एक सर्वंकष अशी तत्त्वमीमांसक व्यवस्था आहे आणि ह्या व्यवस्थेच्या संदर्भात त्याला गतीकडे आणि स्थित्यंतरांकडे पहायचे आहे, तिच्याशी सुसंगत ठरेल अशा रीतीने त्याला त्यांचा 'अर्थ' लावायचा आहे. गॅलिलिओला ही सारी तत्त्वमीमांसा बाजूला सारून, एका विशिष्ट प्रकारच्या गतीचे, वरून मोकळेपणे खाली पडणाऱ्या वस्तूंच्या गतीचे – केवळ ह्या फुटकळ प्रक्रियेचे– निरीक्षण करायचे आहे आणि तिच्या स्वरूपाचे वर्णन करणारे गणिती सूत्र शोधून काढायचे आहे. पण सेंट टॉमसच्या तत्त्वमीमांसेत आणि गतीविषयीच्या त्याच्या विवरणात सलगता आहे. एकाच एकसंध बौद्धिक व्यवस्थेचे ते भाग आहेत. ही तत्त्वमीमांसा निसर्गात घडणाऱ्या प्रक्रियांचे निरीक्षण आणि वर्णन करण्याच्या आड येणारी आहे. उदा. आकाशस्थ ग्रहगोल ( आपल्या अस्तित्वाच्या पातळीवर) परिपूर्ण आहेत, त्यांची 'रूपे' त्यांच्या ठिकाणी पूर्णपणे विकसित अशा अवस्थेत वसत असतात, तेव्हा त्यांच्या बाबतीत कशाचा 'उद्भव' व्हायला किंवा त्यांची रूपहानी (corruption) व्हायला अवकाश नसतो, म्हणून त्यांची गती पूर्णपणे वर्तुळाकार असते हे 'सिद्धांत' तत्त्वमीमांसकही आहेत आणि ती ग्रहगोलांच्या आपल्याला निरीक्षणाने आढळून येणाऱ्या स्वरूपाचे वर्णन करणारी विधानेही आहेत. ह्या तत्त्वमीमांसेचा, वस्तूंचे, घटनांचे, प्रक्रियांचे सरळ निरीक्षण करण्यात जो अडसर येतो तो दूर करण्यासाठी गॅलिलिओ तिचे अनुभवाच्या आधारे खंडन करतो. उद्भव आणि रूपहानी ह्या केवळ पृथ्वीवर घडणाऱ्या प्रक्रिया आहेत, आकाशस्थ ग्रहगोल अपरिवर्तनीय, नित्य आणि परिपूर्ण असतात हा सिद्धांत खोडून, काढण्यासाठी तो दुर्बिणीचा उपयोग करतो. उदा. चंद्रावर टेकडया दिसतात, तेव्हा चंद्र 'परिपूर्ण' नाही (कारण चंद्र पूर्णपणे गोलाकार नाही, खडबडीत आहे), चंद्राच्या भ्रमणाच्या पातळीच्या पलीकडे आकाशात धूमकेतू निर्माण होऊन विसर्जन पावलेले आढळून आले आहे, (म्हणजे आकाशातही बदल घडून येतात), पृथ्वीवर आढळणाऱ्या धुक्याप्रमाणे 'दाट आणि काळसर' द्रव्ये सूर्यावर आढळून येतात तेव्हा आकाशातील वस्तू अपरिवर्तनीय व परिपूर्ण आहेत आणि पृथ्वीवर अपूर्णता, उद्भव ह्यांचे अधिराज्य आहे हा भेद योग्य नाही. [पृथ्वी आणि इतर ग्रह सूर्याभोवती फिरतात ह्या कोपर्निकसच्या अभ्युपगमाला ( hypothesis ) विरोध व्हायचे एक महत्त्वाचे कारण असे होते की ह्या अभ्युपगमाप्रमाणे पृथ्वी आणि आकाश यातील भेदच नष्ट होत होता, अपूर्ण पृथ्वीला परिपूर्ण अशा आकाशस्थ गोलांमध्ये स्थान देण्यात येत होते.]

जगाकडे, जगातील वस्तूकडे पाहण्याच्या दृष्टिकोनात हा जो बदल घडून आला होता त्याची अनेक कारणे असणार, पण एक महत्त्वाचे कारण असे होते की रीनेसांच्या कालखंडानंतर लोकांना ह्या जगाच्या स्वरूपाविषयी काही विश्वास, काही आश्वासन, आशावाद वाटू लागला होता. मानवी बुद्धीला अनुकूल असलेल्या, तिच्याशी जुळणाऱ्या नियमांना अनुसरून जगातील घडामोडी घडून येतात, निसर्ग ह्या नियमांचा ताबेदार आहे आणि म्हणून तो गूढ, अज्ञेय, ज्याची भीती बाळगावी असा नाही, उलट हे नियम आपण समजून घेतले तर नैसर्गिक शक्तींचे नियंत्रण करता येईल आणि माणसाची ह्या जगातील स्थिती सुधारण्याकरता

त्यांचा वापर करून घेता येईल असा हा नवीन दृष्टि-कोन होता. तेव्हा निसर्ग, हे दृश्य विश्व ईश्वरावर आधारले आहे हे मनःपूर्वक मान्य करून सुद्धा निसर्गातील फुटकळ वस्तूंचे आणि घटनांचे काळजीपूर्वक निरीक्षण करून त्यांच्या मागचे सामान्य नियम हेरण्याला– म्हणजे वैज्ञानिक ज्ञान प्राप्त करून घ्यायला– आता महत्व आले होते. वैज्ञानिक ज्ञानाचे स्वरूप आणि उद्दिष्टे ह्याविषयीचा हा नवीन दृष्टिकोन फ्रॅन्सिस बेकनच्या लिखाणात मांडण्यात आला आहे.

बेकन हा स्वतः गॅलिलिओ किंवा हार्वे ह्यांच्या-सारखा वैज्ञानिक नव्हता. पण, कुणीतरी म्हटल्या-प्रमाणे त्याने विज्ञानाची जाहिरात उत्कृष्टपणे केली. रूढ ॲरिस्टाटिलियन किंवा स्कोलॅस्टिक ज्ञानाची जागा जे नवीन प्रकारचे वैज्ञानिक ज्ञान घेऊ पहात होते त्याचे स्वरूप, त्याची उद्दिष्टे आणि त्याचा कार्यक्रम ह्यांच्याविषयीचा एक अतिशय आकर्षक जाहीरनामा त्याने सुशिक्षित जनतेपुढे मांडला आणि तो त्यांना रुचावा आणि पटावा यासाठी आपले वाङ्मयीन आणि तार्किक कौशल्य कारणी लावले. बेकनला काय पाहिजे होते ? एकतर त्याला धार्मिक श्रद्धेचे क्षेत्र आणि वैज्ञानिक ज्ञानाचे क्षेत्र ही एकमेकांपासून अलग करायची होती. सेंट टॉमसचे जे एकसंध, समावेशक, सबंध अस्तित्वाला गवसणी घालू पहाणारे दर्शन होते त्याचे विभाजन करून त्याच्या अखत्यारीतून वैज्ञानिक ज्ञानाचे क्षेत्र त्याला वेगळे करायचे होते. ह्यासाठी तो धार्मिक श्रद्धेचे स्वतःचे असे क्षेत्र असते, त्या क्षेत्रात मोडणाऱ्या गोष्टींचा श्रद्धेने स्वीकार केला पाहिजे, ह्या क्षेत्रात तर्काचे, बुद्धीचे निकष लावणे योग्य नाही ह्या गोष्टीवर भर देतो. "पवित्र देवशास्त्र ( theology ) हे ईश्वराच्या शब्दां-पासून आणि ईश्वराने प्रकट केलेल्या गूढ संदेशां-पासून ( oracle ) प्राप्त करून घेतले पाहिजे, ते निसर्गाच्या प्रकाशापासून किंवा बुद्धीच्या आदेशां-पासून निष्पन्न करून घेता येणार नाही." किंवा "ईश्वराच्या शब्दांनी आपल्या बुद्धीला धक्का बसला तरी त्यांच्यावर विश्वास ठेवणे आपल्याला प्राप्त आहे. कारण आपल्या बुद्धीशी जुळणाऱ्या गोष्टींवरच जर आपण विश्वास ठेवला तर आपण आशयाला मान्यता देतो पण त्याच्या निर्मात्याला मान्यता देत नाही असे होईल." "आणि म्हणून एखादे ईश्वरी गूढ जितके अधिक तर्कविपरीत आणि अविश्वसनीय असेल तितका, त्याच्यावर विश्वास ठेवल्याने आपण ईश्वराचा अधिक सन्मान करतो; आणि श्रद्धेचा विजय अधिक उदात्त ठरतो" (De Augmentis, Bk ix पृ. ३६८ व पुढे बॉन ) म्हणजे धार्मिक श्रद्धेने स्वीकारलेल्या सिद्धांतांना विज्ञानाचे किंवा बौद्धिक युक्तिवादांचे पाठबळ देण्याचे कारण नाही. पण ह्याची उलट बाजू अशी–आणि बेकनच्या दृष्टीने ती तितकीच किंवा अधिकच महत्त्वाची आहे–की आपण धर्मग्रंथांपासून बायबलपासून वैज्ञानिक सत्ये निष्पन्न करून घेण्याचा खटाटोप करता कामा नये. धार्मिक श्रद्धेला विज्ञानापासून शुद्ध राखले पाहिजे; पण विज्ञानालाही धार्मिक श्रद्धेपासून शुद्ध राखले पाहिजे. उदा. सृष्टीच्या उत्पत्तीविषयीच्या बायबल-मधील कथेवर खगोलशास्त्र किंवा भूशास्त्र किंवा प्राणिशास्त्र ह्यांतील उपपत्ती आधारता कामा नयेत.

ख्रिश्चन धार्मिक श्रद्धेचा निसर्गविज्ञानाशी आणखी एका वेगळ्या रीतीने संबंध पोहोचत होता. सेंट पॉलच्या आणि सेंट ऑगस्तीनच्या मताप्रमाणे माणसाच्या पतनानंतर, ईश्वराच्या आदेशाचा भंग करून ॲडमने पाप केल्यानंतर, सबंध निसर्ग आणि माणूस विकृत आणि भ्रष्ट झाला होता. निसर्गाच्या ह्या भ्रष्ट, पापाने आरपार कलुषित झालेल्या क्षेत्रा-पलीकडे जाणे आणि ईश्वरी अनुग्रहाच्या (grace) क्षेत्रात प्रवेश करणे हे मानवी जीवनाचे परमोच्च साध्य होते. तेव्हा निसर्गाचे ज्ञान मिळविण्याच्या मोहात गुंतून पडणे म्हणजे ॲडमने केलेल्या पापाचर-णाची पुनरावृत्ती करण्यासारखे होते; ईश्वरी अनु-ग्रहातून आत्म्याचे कल्याण साधण्याऐवजी 'पृथ्वीच्या राज्या'ची अभिलाषा बाळगून सैतानाच्या सामर्थ्याला शरण जाण्यासारखे होते. आज आपण ज्याला विज्ञान म्हणू त्या स्वरूपाचे ज्ञान मध्ययुगात सर्वसाधारण लोकांच्या दृष्टीने किमया, जादूटोणा, फलज्योतिष ह्यासारख्या गूढ आणि अमंगळ विद्या, काळ्या शक्तींशी संगनमत करून प्राप्त करून घेतलेल्या गूढ विद्या होत्या.

सृष्टीवर, निसर्गावर सैतानाचे अधिराज्य नाही, निसर्ग ईश्वराला संमत असाच आहे असे बेकनला प्रस्थापित करायचे होते. तेव्हा त्याने अशी भूमिका

अनुक्रमणिका

मांडली की ईश्वराने आपलें स्वरूप माणसापुढे दोन प्रकारांनी व्यक्त केले आहे. ह्यातील एक प्रकार म्हणजे अर्थात् बायबल हा धर्मग्रंथ. पण शिवाय ईश्वराने आपण निर्माण केलेल्या सृष्टीद्वाराही आपले रूप माणसापुढे 'अनावृत' केले आहे. तेव्हा निसर्गाचा अभ्यास करणें हे धर्मविरोधी नाही, ते सैतानाशी संगनमत करण्यासारखे नाही; उलट ते आपले कर्तव्य आहे, ते केल्याने आपल्या निर्मात्याचे आपल्यावर असलेले ऋण यथाशक्ती फेडण्याचा प्रयत्न आपण केला असे होते. कोणत्या प्रकारचे ज्ञान निषिद्ध, अमंगळ आहे ? कोणत्या प्रकारचे ज्ञान मिळविल्याने ईश्वराशी द्रोह केल्यासारखे होते ? बेकन म्हणतो,

"निसर्गाचे आणि निसर्गाच्या सार्वत्रिक नियमांचे शुद्ध ज्ञान, नंदनवनात (Paradise) माणसापुढे इतर प्राणी उभे करण्यात आले असता ज्या ज्ञानाच्या प्रकाशात, त्यांच्या गुणधर्मांना अनुसरून त्यांना नावे दिली, त्या ज्ञानामुळे माणसाचे पतन झालेले नाही;" – म्हणजे वैज्ञानिक ज्ञानामुळे माणसाचे पतन झालेले नाही; तर "कल्याणप्रद काय आहे आणि अकल्याणप्रद काय आहे ह्याच्या उन्मत्त ज्ञानाने, आणि ईश्वरी आदेशावर अवलंबून न रहाता स्वतःच स्वतःचा नियमदाता होण्याचा माणसाचा जो उद्देश ह्या ज्ञानाशी निगडित असतो त्याने" माणसाचे पतन झाले आहे. (अॅडव्हान्समेंट ऑफ लर्निंग, बुक i. i, ३)

तेव्हा निसर्गाचे वैज्ञानिक ज्ञान मिळविण्याचा प्रयत्न करण्यात ईश्वराचा द्रोह होत नाही, माणसाकडून अधिकारातिक्रमण होत नाही. उलट वैज्ञानिक ज्ञान मिळविताना ईश्वराने आखून दिलेल्या अधिकाराच्या आणि कर्तव्याच्या क्षेत्रातच तो उचित रीतीने वावरत असतो. मग माणसाकडून अधिकारातिक्रमण कधी होते ? अस्तित्वाचे अंतिम स्वरूप मानवी बुद्धीपलीकडचे आहे, मानवी बुद्धीला त्याचे स्वतंत्रपणे ग्रहण करता येणार नाही; आणि म्हणून ह्या स्वरूपाचे जेवढे ज्ञान माणसाच्या कल्याणासाठी आवश्यक आहे तेवढे माणसापुढे बायबलमधून प्रकाशित केले आहे. त्याचा श्रद्धेने स्वीकार न करता माणूस अस्तित्वाच्या अंतिम स्वरूपाच्या रहस्याचा भेद जर केवळ आपल्या बुद्धीच्या जोरावर करू पाहू लागला आणि कृतकज्ञानाच्या साहाय्यानें निसर्गातील सर्व गोष्टींचा उलगडा करू लागला तर ते अधिकारातिक्रमण आणि द्रोह होईल. म्हणजे तत्त्वमीमांसक (metaphysical) ज्ञान निषिद्ध आहे, वैज्ञानिक ज्ञान नव्हे.

तत्त्वमीमांसक ज्ञान मिळवू पहाण्यात माणसाची जी उन्मत्तता दिसून येते ती दुहेरी आहे. अस्तित्वाचे जे अंतिम रहस्य धर्मग्रंथात प्रकाशित करण्यात आले आहे ते तो श्रद्धेने मान्य करीत नाही; त्याच्या जागी मानवी बुद्धीने प्रमाणित केलेल्या तत्त्वांवर आधारलेले ज्ञान तो स्थापू पहातो. आणि नंतर त्याच तत्त्वांच्या साहाय्याने ईश्वरनिर्मित निसर्गातील घटनांचाही तो उलगडा करू पहातो. बायबल आणि निसर्ग ह्या ईश्वराच्या दोन्ही 'प्रकटीकरणां'-कडे मानवी बुद्धीने विनीतभाव धारण करूनच गेले पाहिजे. दोन्ही क्षेत्रांत आपले स्थान गौण, साहाय्यक असते हे बुद्धीने ओळखले पाहिजे. निसर्गाकडे विनीतभावाने पहायचे म्हणजे निसर्गातील विशिष्ट वस्तू, घटना यांचे काळजीपूर्वक निरीक्षण करायचे, निरीक्षणाला आढळून आलेली कोणतीही वस्तुस्थिती अंतिम म्हणून स्वीकारायची, निरीक्षणाला आढळून आलेल्या वस्तुस्थितींचे सार्वभौमत्व मान्य करून त्या सर्वांशी सुसंगत ठरेल अशीच बौद्धिक उपपत्ती स्वीकारायची. "वस्तूंमध्ये मर्यादशील, संयत भावाने (soberly) सतत वास करीत रहाणे ... आपली प्रायोगिक शक्ती आणि बुद्धी ह्यांच्यात खरी आणि न्याय्य अशी कायमची एकी प्रस्थापित करणे ही आपली पद्धती आहे" (De Augmentis (Bonn) प्रस्तावना पृ. १६)

बेकनने निसर्गाची सैतानाच्या तावडीतून आणि निसर्गविज्ञानाची धर्मशास्त्राच्या तावडीतून सुटका केली. पण बेकन नवीन युगाचा प्रवर्तक नव्हता, उद्गाता होता. मॉंतेन आणि सर टॉमस मोर ह्या विचारवंतांनीही निसर्गाविषयी हीच वृत्ती धारण केलेली आहे. मोरच्या 'युटोपिया'मध्ये निसर्गविज्ञान हे जादूटोण्याचा एक प्रकार ह्या स्वरूपात राहिलेला नाही. ईश्वराला विज्ञान संमत आहे आणि निसर्गाचा वैज्ञानिक अभ्यास करणे हा माणसाच्या धार्मिक कर्तव्याचा एक भाग मानण्यात आला

आहे. माँतेन निसर्गाला मानवी संकेत, मानवी रचना आणि नियम ह्यांच्या पलीकडचे स्थान देतो. "आपल्या निसर्गमातेच्या संपूर्ण महतीचे, तिच्या उज्वल प्रभेचे जो चिंतन करतो, त्यालाच केवळ वस्तूंच्या मूल्याचे खरे माप घेता येते." ( माँतेन : 'मुलांच्या शिक्षणाविषयी') साधारणपणे सोळाव्या आणि सतराव्या शतकांत निसर्गाविषयीचा हा वेगळा, आश्वासक दृष्टिकोन युरोपमध्ये प्रचलित झाला.

बायबल जरी अशंकनीय अशा धार्मिक श्रद्धेचा विषय म्हणून आदराने बाजूला सारण्यात आले तरी बायबलचा अर्थ कसा लावायचा हा प्रश्न टाळता येणे अशक्य झाले. कारण विज्ञानामुळे पुराव्यावर आधारलेल्या सत्याविषयीचा एक वेगळा निकष प्रस्थापित झाला होता. बायबल मधल्या अनेक कथा, घटनांच्या हकिकती आणि चमत्कार ह्यांची जर ह्या निकषाशी संगती लावली नाही तर बायबलचे स्थानच अस्थिर झाले असते. उदा. प्रलयानंतर अरारत पर्वतावरील होडीतून सर्व प्राणी बाहेर आले आणि जगभर पसरले अशी बायबल मध्ये कथा आहे. मग अमेरिकेत आढळणारे प्राणी अँटलांटिक समुद्र पार करून तेथे पोचले असे मानायचे का ? पण ही कथा जर असत्य मानायची नसेल तर तिचा 'अर्थ' कसा लावायचा ? कोणत्या अर्थाने ती सत्य आहे असे मानायचे ?

बायबलचा अर्थ कसा लावायचा हा एक जुनाच प्रश्न होता. सेंट ऑगस्तीनचे एक वाक्य असे आहे, "नीतीशी किंवा श्रद्धेशी संबंधित नसलेले असे जे कांही पवित्र लिखाणात असेल त्याचा अर्थ नेहमीच प्रतीकात्मक असतो हे ओळखले पाहिजे." इसवी सनाच्या पहिल्या आणि दुसऱ्या शतकात जेव्हा अलेक्झांड्रियामध्ये ज्यू आणि ख्रिश्चन जीवनधारणा आणि ग्रीक तत्त्वज्ञान एकत्र आली तेव्हा श्रद्धा आणि बुद्धी ह्यांच्यांत सुसंवाद कसा साधावा हाच (सोळाव्या शतकात फिरून निर्माण झालेला ) प्रश्न उपस्थित झाला होता. जुन्या करारातील बराचसा पुरुषाकार आणि प्राकृत येहोवा प्लेटॉनिक आणि नवप्लेटॉनिक पंथांचे प्रगल्भ आणि सूक्ष्म तत्त्वमीमांसक सिद्धांत आत्मसात केलेल्या विचारवंतांना रुचण्यासारखा नव्हता. नवप्लेटॉनिक तत्त्वमीमांसा आणि ज्यू-ख्रिश्चन श्रद्धा यांचा समन्वय करण्याचा एक मार्ग असा की बायबलमध्ये ईश्वराविषयीचे आणि मानवी आत्म्याविषयीचे सर्वोच्च आणि शुद्ध सत्य व्यक्त झाले आहे पण ते गूढ रीतीने, प्रतीकांच्या आणि रूपकांच्या माध्यमातून व्यक्त झाले आहे असे मानणे. उदा. फिलो ( ख्रि. पू. २० ते ख्रि. ४५ ) असे म्हणतो की बायबलमधील जगाच्या उत्पत्ती-विषयीची कथा वाचून जर कुणी अशी समजूत करून घेतली की ईश्वराने खरोखरच जग सहा दिवसात निर्माण केले किंवा ईश्वराने कालाच्या अमुक एका बिंदूला जग निर्माण करायला प्रारंभ केला तर ते अतिशय भाबडेपणाचे ठरेल. बायबल-मधील विधानांचा अर्थ असा शब्दशः घ्यायचा नसतो. उदा. ईश्वराने इडनमध्ये नंदनवन वसविले' ह्या बायबलमधील वाक्याचा अर्थ, फिलोच्या म्हणण्याप्रमाणे, 'ईश्वराने मानव जातीमध्ये ऐहिक सद्‌गुणांचे आरोपण केले' असा घ्यायचा. फिलो-सारख्या ज्यूंनी ज्याप्रमाणे जुन्या कराराचे रूपकात्मक स्पष्टीकरण केले त्याप्रमाणे क्लेमेंट, ऑरिगेन ह्यांनी नव्या कराराचे केले. बायबलमधील वचनांचा अर्थ त्रिविध असतो हा ऑरिगेनचा सिद्धांत प्रसिद्ध आहे; हे तीन अर्थ म्हणजे शाब्दिक, नैतिक आणि गूढ किंवा आध्यात्मिक. हा त्रिविध अर्थ पुढे स्कोलॅस्टिक्स आणि डान्टे ह्यांच्या मताप्रमाणे चतुर्विध झाला : शाब्दिक, रूपकात्मक, नैतिक आणि आध्यात्मिक. डान्टेच्या 'डिव्हाइन कॉमेडी'चा असा चतुर्विध अर्थ लावता येतो आणि लावावा लागतो पण बायबल-मधील वचनांचा अनेकविध अर्थ लावण्याची जी गरज भासू लागली ती अर्थात् बायबलमधील अनेक वचने जर शब्दशः घेतली तर ती तर्कविपरीत, अनुभवाशी विसंगत अनर्थक असल्याचे आढळून येते आणि बायबल जर ईश्वराचा शब्द असेल तर त्याच्यात विपरीत, विसंगत असे काही असणे अशक्य आहे अशा दुहेरी धारणेमुळे. पण ह्यावर असे म्हणता येईल की आपल्या बुद्धीशी, आपल्या अनुभवाशी विसंगत ठरणारी गोष्ट ईश्वराने सांगितली असताही जर आपण अमान्य करणार असू तर त्याचा अर्थ असा होईल की आपल्या बुद्धीचे माप आपण ईश्वराला लावीत आहोत, ईश्वराच्या सांगण्याचा आपण श्रद्धेने स्वीकार करीत नाही, आपली श्रद्धाच थिटी पडते. हे योग्य

नाही, बायबल ईश्वरी शब्द आहे, त्याचा श्रद्धेने स्वीकार केला पाहिजे, त्यातील वचनांचा जो सरळ, शब्दशः अर्थ होतो त्या अर्थाने ती सत्य आहेत असे मानले पाहिजे, अशी प्रतीकात्म अर्थाला विरोधी अशी टर्टुलियनची भूमिका होती. पण काही वचने तर्कविपरीत आहेत त्यांचे काय ? त्यांचे काही नाही, अशा वचनांच्या बाबतीतच श्रद्धेला खरा अवसर मिळतो, श्रद्धेची कसोटी लागते. 'जे तर्कविपरीत आहे त्याच्यावर ते तर्कविपरीत आहे म्हणूनच विश्वास ठेवला पाहिजे.' अशा अर्थाचे टर्टुलियनचे प्रसिद्ध वाक्य आहे. प्रॉटेस्टंट लुथरनेही हे चतुर्विध अर्थ अमान्य केले. बायबलमधील वचनांचा सरळ साधा अर्थ जो होईल तोच स्वीकारला पाहिजे हे तत्त्व त्याने मांडले. पण लुथरच्या वेळेपर्यंत बायबलच्या संहितेचे ऐतिहासिक विश्लेषण काही प्रमाणात झाले होते; त्याचे भिन्न घटक वेगवेगळे करण्यात आले होते. तेव्हा, बायबलमधील वचनांचा, त्यांतील शब्दांनी जो सरळ अर्थ व्यक्त होत असेल तसाच घेतला पाहिजे ही जशी त्याची भूमिका होती तशीच 'ईश्वरी शब्द' जरी बायबलमध्ये सामावलेला असला तरी बायबलमधील प्रत्येक शब्दात तो उपस्थित नाही ही भूमिकाही त्याने स्वीकारली होती. हूकरच्या 'एक्लेझिॲस्टिकल पोलिटी' ह्या प्रसिद्ध प्रबंधाचा उद्देशही "मानवी तारणाला जे, जे आवश्यक आहे ते सर्व बायबलमध्ये सामावलेले असले तरी बायबलमध्ये जे, जे सामावलेले आहे ते सर्व मानवी तारणासाठी आवश्यक आहे असे नाही." हे दाखवून देण्याचा होता.

म्हणजे बायबलमधील वचनांत भेद करणे आवश्यक आहे, त्यांतील सारभूत वचनांपासून गौण, आनुषंगिक वचने वेगळी काढली पाहिजेत ह्या मुद्याकडे आपण फिरून येतो. बायबलमध्ये ईश्वरी प्रेरणा आणि स्फूर्ती व्यक्त झाली आहे. ईश्वराच्या अधिकारावर बायबलचे प्रामाण्य आधारलेले आहे हे सर्वस्वी मान्य करणाऱ्या प्रॉटेस्टंट पंथातील सुसंस्कृत, संवेदनशील व्यक्ती सतराव्या शतकात बायबलचा अर्थ कसा लावीत ह्याचा एक नमुना मिल्टनच्या लिखाणात आढळून येईल. पवित्र ग्रंथ म्हणून बायबलचे स्थान आणि अधिकार अनन्यसाधारण आहे अशी मिल्टनची उत्कट श्रद्धा आहे आणि त्याच्या ठिकाणी बायबलविषयी ओतप्रोत पूज्यभाव आहे. म्हणून बायबलमध्ये व्यक्त झालेल्या सत्याचा शोध घेण्यासाठी तो पराकाष्ठेचे श्रम घेतो. पण त्याबरोबरच अर्थात् बायबलमध्ये व्यक्त झालेल्या आणि अभिप्रेत असलेल्या सिद्धांतांचा अर्थ लावण्याच्या, प्रॉटेस्टंटांनी स्वाधीन करून घेतलेल्या, वैयक्तिक अधिकाराचाही तो वापर करतो.

बायबलमध्ये सामावलेल्या सत्याचा अर्थ लावताना मिल्टनने स्वीकारलेला पहिला सिद्धांत असा की हे सत्य रूपकात्मक मार्गाने व्यक्त झाले आहे. ह्या मार्गाचा अवलंब करणे अटळ आहे कारण मानवी अनुभव हे मुख्यतः भौतिक वास्तवाशी निगडित झालेले असतात आणि बायबलमध्ये प्रकट झालेले सत्य आध्यात्मिक वास्तवाविषयीचे आहे. माणसाच्या आकलनशक्तीशी जुळेल अशा रीतीने आध्यात्मिक सत्य सांगायचे तर भौतिक प्रतीकांचा उपयोग करूनच ते सांगावे लागेल. 'पॅरॅडाइझ लॉस्ट' मध्ये राफेल ॲडमला म्हणतो की, "आध्यात्मिक सत्यांची, ती ज्या भौतिक, मूर्त रूपांद्वारा जास्तीत जास्त चांगल्या प्रकारे व्यक्त होऊ शकतील अशा रूपांशी तुलना करून, मानवी इंद्रियानुभवाच्या आवाक्यापलीकडे असलेल्या गोष्टींचे मी रेखाटन करीन." (पॅरॅडाइझ लॉस्ट, v. ५७१) ही केवळ सोय आहे असे नव्हे. ह्याच्यामागे एक नव-प्लेटॉनिक सिद्धांत आहे. तो असा की सर्व भौतिक वस्तू ह्या 'स्वर्गीय, आध्यात्मिक अस्तित्वांच्या सावल्या किंवा प्रतिबिंबे असतात. ह्यामुळे आध्यात्मिक सत्ये यथार्थपणे व्यक्त करू शकणारी उचित अशी भौतिक प्रतीके उपलब्धच असतात. मिल्टनचा दुसरा सिद्धांत असा की मानवी बुद्धी सान्त आहे आणि ईश्वर अनन्त आहे. तेव्हा ईश्वर स्वतःविषयीचे सत्य, मानवी बुद्धीच्या आवाक्यात येईल एवढ्याच अंशाने आणि तिला झेपेल अशाच स्वरूपात माणसासाठी प्रकट करतो. "ईश्वराने पवित्र लिखाणात स्वतःचे जे रेखाटन आणि रूपवर्णन केले आहे त्याच्याशी जुळणारी अशीच ईश्वराची संकल्पना आपण आपल्या मनात बनविणे हाच आपल्याला उपलब्ध असलेला सर्वात सुरक्षित मार्ग आहे. कारण ईश्वराच्या शब्दशः किंवा प्रतीकात्मक वर्णनांतून ईश्वर खरोखर जसा आहे तसे त्याच्या स्वरूपाचे

दर्शन घडविण्यात आलेले नाही तर आपल्या आकलनशक्तीच्या मर्यादात सामावेल अशा प्रकारे ते घडविण्यात आले आहे हे मान्य करून सुद्धा, ईश्वराने आपल्या शक्तींशी जुळवून घेण्याचा अनुग्रह करून आपण त्याचे संकल्पन कसे करावे ह्याविषयीची स्वतःची जी इच्छा दर्शविली आहे तिला अनुसरूनच आपण त्याचे संकल्पन करणे योग्य ठरेल... " ( डी डॉक्ट्रिना क्रिस्तियाना, दुसरे प्रकरण ) सारांश, बायबलमध्ये ईश्वराने स्वतःविषयीचे सत्य प्रकट केले आहे. पण हे संपूर्ण सत्य नव्हे. मानवी बुद्धीच्या आवाक्यात येईल आणि माणसाच्या तारणाला पुरेसे होईल एवढेच सत्य ईश्वराने कृपाळूपणे प्रकट केले आहे आणि ह्या सत्याचा आविष्कार प्रतीकात्मक मार्गाने होणे अपरिहार्य आहे.

पण मिल्टन ह्याच्या पलीकडे जातो. मिल्टन जे सत्य बायबलमध्ये शोधीत होता आणि जे बायबलमध्ये आहे अशी त्याची श्रद्धा होती ते कोणत्या स्वरूपाचे सत्य होते ? ह्या सत्याचे प्रयोजन काय होते ? माणसाचे तारण करणारे, पापापासून आणि बाहेरच्या सत्ताधाऱ्यानी लादलेल्या बंधनांपासून माणसाला मुक्त करणारे ते सत्य होते. म्हणजे ते माणसाला योग्य जीवनमार्ग दाखविणारे नैतिक सत्य होते. आता मिल्टनच्या मते हा योग्य जीवनमार्ग, हे नैतिक सत्य बायबलमध्ये आविष्कृत करण्यात आले आहे; पण केवळ बायबलमध्ये नव्हे. ईश्वराने आपल्याला नीतींद्रिय ( moral sense ) दिले आहे आणि ह्या नीतींद्रियाला हेच नैतिक सत्य साक्षात् प्रतीत होते. ज्या चैतन्याकडून ( Spirit ) बायबल उत्स्फूर्त झाले आहे, ज्या चैतन्याने प्रेषितांना स्फूर्ती देऊन त्यांच्याकरवी बायबलमध्ये सामावलेले दिव्य सत्य प्रकाशित केले, तेच चैतन्य सदोदित, इथे आता, आपल्या अंतःकरणात बोलत असते. तेव्हा मिल्टनही दोन धर्मग्रंथ आहेत असे मानतो. एक बाहेरचा, म्हणजे बायबल. आणि दुसरा आंतरिक, म्हणजे आपल्या अंतःकरणातील चैतन्याचा उद्गार. आणि हा दुसरा धर्मग्रंथ पहिल्या धर्मग्रंथापेक्षा, बायबलपेक्षा अधिक श्रेष्ठ आहे अशी मिल्टनची भूमिका आहे. कारण " आज घडीला आपल्या श्रद्धेसाठी म्हणून जो बाह्य आधार आपल्यापाशी आहे तो अतिशय महत्वाचा असला...... तरी ( तिचा ) जो आंतरिक आधार आहे आणि हा प्रत्येक श्रद्धाळू माणसाचा वैयक्तिक ठेवा आहे– म्हणजे साक्षात् चैतन्यच– तो इतर सर्वांपेक्षा किती तरी अधिक श्रेष्ठ आहे." ( डि डॉक्ट्रिना ख्रिस्तियाना, प्र. XXX ) ह्याचे एक महत्वाचे कारण असे की आज बायबल ज्या स्वरूपात आपल्याला उपलब्ध आहे ते त्याचे स्वरूप अनेक संपादक आणि संकलक आणि भाषांतरकर्ते ह्यांच्या हातून त्याला प्राप्त झाले आहे. " नव्या करारातील लिखाण अशा अनिश्चित आणि चंचल पालकांच्या हाती सोपविण्यामागे, आपल्याला ज्या चैतन्याची ( Spirit) देणगी दिलेली आहे तो धर्मग्रंथापेक्षा अधिक विश्वसनीय असा मार्गदर्शक आहे आणि म्हणून त्याला अनुसरणे हे आपले कर्तव्य आहे हा धडा आपण ह्या परिस्थितीपासून शिकावा ह्याशिवाय दुसरे ईश्वरी प्रयोजन असेल असा तर्क संभवत नाही." ( कित्ता. प्रकरण XXX ).

मिल्टनची ही भूमिका एकांड्या शिलेदाराची नव्हती. 'केंब्रिज प्लेटॉनिस्ट' म्हणून ओळखण्यात येणाऱ्या विचारवंतांचीही हीच भूमिका होती. 'विवेकाला अनुसरणे म्हणजेच ईश्वराला अनुसरणे होय" हे त्यांचे ब्रीदवाक्य होते " माणसाची कर्तव्ये प्रथम ईश्वरलिखित शब्दात प्रतीत झाली किंवा केवळ ह्या शब्दातूनच प्रतीत होतात असे नाही." ( माणसाच्या ) स्वाभाविक बुद्धीने ज्यांना मान्यता दिलेली असते आणि शुभवर्तमानात प्रकट झालेल्या कायद्याने आणि प्रयोजनाने ज्यांना दृढता दिलेली असते ती सत्याची आणि प्रकाशाची स्वच्छ तत्त्वे धर्मग्रंथातील सर्व विशिष्ट दृष्टांत आणि वचने ह्यांच्याहून श्रेष्ठ असतात."

तेव्हा सतराव्या शतकात उदयाला येऊन स्थिर झालेल्या परिस्थितीचे वर्णन असे करता येईल. धार्मिक श्रद्धेला आणि तिचा आधार असलेल्या धर्मग्रंथाला आदराने बाजूला करून, आणि तितक्याच आदराने निसर्गातील वस्तूंचे आणि घटनांचे अवलोकन करून, त्यांचे स्पष्टीकरण करणारे बुद्धिगम्य नियम शोधणारे निसर्गविज्ञान रूढ झाले. स्वायत्त आणि अनुभवाधिष्ठित विज्ञानाची संकल्पना रूढ झाली. हे विज्ञान धर्मविरोधी असेल किंवा धर्माविषयी उदासीन असेल अशी कल्पना नव्हती. विज्ञा-

अनुक्रमणिका

नाचा सलग आणि स्वायत्त असा प्रांत आहे, निसर्गातील घटना ज्या बुद्धिगम्य नियमांना अनुसरून घडतात त्यांचा शोध घेणे आणि त्यांचा उपयोग करून माणसाची परिस्थिती सुधारणे हा निसर्गाच्या निर्मात्याचा आदर करण्याचाच मार्ग आहे आणि हे एक महत्त्वाचे मानवी कर्तव्य आहे अशीच कल्पना होती. विज्ञान आणि धर्म यांच्यात द्वैत होते, दुही नव्हती. "तत्त्वज्ञानाचा ( विज्ञानाचा ) वरवरचा रंग मनावर चढला की मनाचा नास्तिकपणाकडे कल होतो ह्यांत शंका नाही; पण त्याला अधिक ज्ञान प्राप्त झाले की ते त्याला परत धर्माकडे आणते. कारण तत्त्वज्ञानाच्या उंबरठ्यावर घटनांच्या दुय्यम कारणांनी आपले सारे लक्ष गुंतवून ठेवल्यासारखे दिसते आणि म्हणून त्यांच्या सर्वोच्च कारणाचा आपल्याला काहीसा विसर पडणे शक्य आहे; पण मन जेव्हा अधिक खोल जाते आणि कारणाचे परस्परांवरील अवलंबित्व आणि ईश्वराच्या कृती जेव्हा त्याला दिसून येतात तेव्हा, कविकल्पनेचा वापर करून असे म्हणता येईल की, निसर्गाच्या साखळीचा सर्वोच्च दुवा जुपिटरच्या सिंहासनाला बांधलेला असतो हे त्याला सहजच दिसून येते." ( बेकन, डी ऑग्मेंटिस, पृ. ३१–३२ ). पण जेव्हा विज्ञान स्वायत्त झाले, अनुभवाशी जुळणारे बुद्धिगम्य नियम शोधून काढणे हे विज्ञानाचे उद्दिष्ट झाले तेव्हा त्याचा परिणाम म्हणून श्रद्धेची, धर्मग्रंथाची स्वायत्तता ओसरू लागली. माणसाच्या नैसर्गिक बुद्धीला, 'आतल्या प्रकाशा'ला प्रतीत होणाऱ्या नैतिक तत्त्वांशी जुळण्याचे बंधन श्रद्धेच्या आशयाला स्वीकारावे लागले. म्हणजे अंतिम 'धर्मग्रंथ' दोनच राहिले. निसर्गाचा ईश्वरलिखित ग्रंथ आणि ईश्वराने माणसाला दिलेला आतला प्रकाश, विवेकशक्ती. कांटने ज्या 'डोकीवरील तारकांकित आकाश' आणि 'अंतरंगातील नैतिक नियम' ह्या दोन गोष्टींचा निर्देश केला आहे तेच हे दोन धर्मग्रंथ होत.

पारंपरिक ख्रिश्चन श्रद्धा आणि माणसाच्या विवेकशक्तीला प्रतीत होणारी तत्त्वे ह्यांच्यात संगती शोधण्याच्या उपक्रमाचा उत्कर्ष 'केंब्रिज प्लेटॉनिस्ट' पंथात झाला. पण ह्या उपक्रमात विवेकशक्तीला प्राधान्य होते. विवेकाला प्रतीत होणाऱ्या तत्त्वांवर श्रद्धा आधारायची होती. ही गरज भासायचे एक महत्वाचे कारण असे की ख्रिश्चन श्रद्धेचा आशय मुक्रर करण्याचा रोमन कॅथलिक चर्चचा परंपरागत अधिकार जेव्हा प्रॉटेस्टंटपंथीयांनी झुगारून दिला तेव्हा श्रद्धेचे नियमन करणारे बाह्य अधिकारस्थान कोसळले. ईश्वराचा शब्द, बायबल, हा श्रद्धेचा एकमेव आधार आणि उगम म्हणून प्रॉटेस्टंटपंथीयांनी मान्य केला. पण बायबलचा अर्थ लावावा लागतो आणि अर्थ लावायचा अधिकार स्वतःकडे घ्यावा लागतो. स्वाभाविकच प्रॉटेस्टंट पंथोपपंथांची गर्दी माजली. ह्या परस्परविरोधी मतांपलीकडे जाऊन सर्वांना समान असलेल्या सत्याचा सर्वांसाठी निर्णय करणारे बाह्य अधिकारस्थान उरलेले नव्हते ; असे अधिकारस्थान प्रॉटेस्टंटपंथीयांना तत्त्वतःच मान्य नव्हते. तेव्हा ईश्वराने सर्वांना दिलेला 'आंतरिक प्रकाश' – 'निसर्गाचा प्रकाश,' विवेकशक्ती–हे एकच सर्वांचे नियमन करू शकणारे अधिकारस्थान म्हणून उपलब्ध होते.

आणखी एका गोष्टीचा उल्लेख करणे आवश्यक आहे. युरोपचे बाह्य देशांशी असलेले दळणवळण, व्यापारी संबंध सतराव्या शतकात वाढले होते, ख्रिश्चनेतर धर्मांशी व संस्कृतींशी परिचय घडून येत होता. शिवाय रीनेसांनंतर युरोपमधील ख्रिश्चनपूर्व धर्मांविषयी–ग्रीक व रोमन धर्मांविषयी–अभ्यासकांचे कुतूहल बळावले होते, ह्या धर्मांची त्यांना माहितीही अधिक झाली होती. धार्मिक श्रद्धा जर विवेकाला प्रतीत होणाऱ्या सार्वत्रिक तत्त्वावर आधारणे योग्य असेल तर ही तत्त्वे केवळ ख्रिश्चन पंथीयांनाच प्रतीत होतात, ईश्वराने केवळ ख्रिश्चनांनाच विवेकाचे वरदान दिले आहे आणि इतरांना वगळले आहे असे मानणे अशक्य होते. तेव्हा विवेकप्रणीत तत्त्वे ही सर्वच धर्मांना समान असलेली तत्त्वे असतात हे मान्य करणे आवश्यक होते.

अशी सार्वत्रिक सत्ये शोधून काढण्याचा प्रयत्न, लॉर्ड हर्बर्ट ऑफ चेरबरी ह्याने केला. मानवजातीच्या काही 'सामायिक संकल्पना' (common notions) आहेत, त्या स्वीकारण्याची आपली नैसर्गिक प्रवृत्ती ( natural instinct ) असते आणि त्यांच्यावर धार्मिक सत्यात आपल्याला आढळणारी निश्चिती आधारलेली असते अशी हर्बर्टची

भूमिका होती. "सार्वत्रिक मान्यता ही सत्याची सर्वोच्च कसोटी होय." ही मान्यता सार्वत्रिक असली पाहिजे कारण कुठल्याही विशिष्ट धार्मिक श्रद्धेत काही असत्ये आणि काही चुका ह्यांचे मिश्रण झालेले असते. तेव्हा सार्वत्रिक मान्यतेची कसोटी लाविल्याशिवाय तिच्यातील असत्ये सत्यांपासून वेगळी काढता येणार नाहीत. पण ह्याचा अर्थ असा नव्हे की सर्व धर्म गोळा करून त्यांच्या सिद्धांतांत सर्वांना समान असलेले सिद्धांत कोणते हे शोधून काढायचे आणि ह्या सामायिक संकल्पना आहेत असे जाहीर करायची एवढीच रीत आपल्याला उपलब्ध आहे. ह्या रीतीचा अवलंब करणे आवश्यक व उपयुक्त आहेच. पण ह्याशिवाय आपल्या अंतःकरणात काही शक्ती उपजत असतात आणि ह्या सामायिक सत्यांच्या सत्यतेची ग्वाही त्या आपल्याला देतात. "स्वतःमध्ये निवृत्त हो आणि स्वतःच्या शक्तींमध्ये प्रवेश कर; तेथे तुला ईश्वर, सद्गुण आणि इतर सर्व सार्वत्रिक व नित्य सत्यें आढळतील."

हर्बर्टला गवसलेली सामायिक सत्ये अशी आहेत : १. एक सर्वोच्च शक्ती आहे. (ज्याला अनेक राष्ट्रांत अनेक वेगवेगळी नावे लाभलेली आहेत त्याला आपण ईश्वर म्हणतो. ईश्वर नित्य, शुभंकर, कल्याणरूप आणि सर्व वस्तूंचा निर्माता आहे.) २. ह्या सार्वभौम शक्तीची उपासना केली पाहिजे. ३. आपल्या शक्तिप्रवृत्तींची चांगली व्यवस्था लावणे किंवा त्यांना चांगले वळण लावणे हा ईश्वराच्या उपासनेचा प्रमुख किंवा सर्वोत्कृष्ट भाग होय आणि हे नेहमीच मान्य करण्यात आले आहे. (विधी आणि संस्कार ह्यांच्याविषयी वेगवेगळ्या धर्मांत मतभेद आहेत पण सद्वर्तनाच्या आवश्यकतेविषयी सर्वांचे एकमत आहे.) ४. सर्व दुर्गुणांचे व अपराधांचे पश्चात्तापाने परिमार्जन करून ते धुवून काढले पाहिजेत. ५. इहलोकीच्या जीवनानंतर लाभणारी पारितोषिके किंवा शिक्षा आहेत. ('प्रत्येक धर्म, सर्व तऱ्हेचे नियम आणि तत्त्वज्ञान आणि त्याहूनही अधिक म्हणजे आपली सदसद्विवेकबुद्धी ह्या जीवनानंतर आपल्याला शिक्षा होईल किंवा पारितोषिक देण्यात येईल असे उघडपणे किंवा अध्याहृत स्वरूपात शिकवितात.)

केंब्रिज प्लेटॉनिस्ट हे खोल धार्मिक श्रद्धेचे पुरुष होते. धार्मिक अनुभवाची आणि वृत्तीची शुद्धता त्यांना जोपासायची होती. त्यांच्या दृष्टीने हा अनुभव जीवनाला व्यापणारा, त्याला उदात्त आणि सात्त्विक बनविणारा असा होता. संयम, विनय, सौम्यता, सर्वभूतहितात रती आणि ईश्वरशरणता ह्यासारखे सद्गुण आणि हे सद्गुण मूर्त करणारे शुद्ध जीवन ही ह्या धार्मिक अनुभवाची दृश्य आणि साक्षात् फळे होती. पण समकालीन धार्मिक जीवन परस्परविरोधी बौद्धिक सिद्धांतांच्या खंडनमंडनासाठी चाललेल्या शुष्क वादविवादात आटून गेल्यासारखे त्यांना दिसत होते. धार्मिक चैतन्याचा झरा परत मोकळा, प्रवाही करणे आवश्यक होते. ह्यासाठी प्रचलित विवादात वापरण्यात येणाऱ्या संकल्पना आणि परिभाषा बाजूला सारून धार्मिक अनुभवाचे अधिक यथार्थ वर्णन करणाऱ्या मूलगामी संकल्पनांचा आश्रय त्यांनी घेतला. प्लेटॉनिक आणि नवप्लेटॉनिक ह्या प्राचीन आणि ख्रिश्चन धर्मात मिसळून गेलेल्या आध्यात्मिक तत्त्वज्ञानात ह्या संकल्पना त्यांना आढळल्या. उदा. विवेक (Reason) ही ह्या तत्त्वज्ञानांतील एक मध्यवर्ती संकल्पना होती. अस्तित्त्वाच्या खऱ्या स्वरूपांचे ग्रहण विवेकशक्तीकडूनच होते हा ह्या तत्त्वज्ञानातील एक प्रमुख सिद्धांत होता. 'विवेक हे ईश्वराचे निरांजन आहे.'—Reason is the candle of the Lord—हे केंब्रिज प्लेटॉनिस्टांचे आवडते वचन होते. 'विवेकाला अनुसरणे म्हणजे ईश्वराला अनुसरणे होय' पण विवेकाला प्रतीत होणारे सत्य हे केवळ कोरडेपणे ग्रहण केलेले बौद्धिक सत्य असत नाही. सत्याचा शोध घ्यायचा तर अंतःकरण शुद्ध करावे लागतें आणि इच्छावासनांना संयमाने अंकित करून घ्यावे लागते.

म्हणजे, विवेकाला प्राप्त होणारे ईश्वराचे ज्ञान हे कित्येक बौद्धिक सिद्धांतांच्या स्वरूपांतील ज्ञान असत नाही; तो एक अनुभव असतो. "मला जर ईश्वरविद्येची (Divinity) व्याख्या करायची झाली तर मी तिला दिव्यशास्त्र म्हणण्याऐवजी दिव्यजीवन म्हणणे अधिक पसंत करीन; शाब्दिक वर्णनांनी तिचे आकलन होणार नाही; आध्यात्मिक संवेदनाने (spiritual sensation) ते होऊ

शकेल." ( जॉन स्मिथचे डिस्कोर्स ). आध्यात्मिक अनुभवाला आणि आचरणाला धार्मिक जीवनाचा गाभाच बनवून केंब्रिज प्लेटॉनिस्टांनी दोन गोष्टी साधल्या. एकतर, आध्यात्मिक सत्य कित्येक बौद्धिक सिद्धांतांत सामावलेले असते, कित्येक विशिष्ट संकल्पनांचा वापर करूनच ते मांडता येते हे त्यांनी नाकारले; पण त्याबरोबरच ईश्वर, आत्मा, परलोक ह्याविषयीच्या ज्या प्रतिमा आणि पुराणकथा लोकमानसात घर करून राहिलेल्या असतात त्याही त्यांनी बाजूला सारल्या. थोडक्यात, एक ऐतिहासिक कथा म्हणून बायबलच्या प्रामाण्याला त्यांनी गौण महत्त्व दिले. " धर्मग्रंथ ख्रिस्ताचा केवळ एक व्यक्ती म्हणून निर्देश करीत नाही, तर पवित्र आत्म्यांतील दिव्य तत्त्व म्हणूनही त्याचा निर्देश करतो," "ईश्वर एक आहे आणि त्याचे नामही एक आहे....जेथे आपल्याला शहाणपण, न्याय, रमणीयता, चांगुलपणा, प्रेम आणि तेज त्यांच्या सर्वतोपरी उन्नत स्वरूपात आणि अत्यंत असीम परिमाणात आढळतात, तो ईश्वर असतो; आणि जेथे ह्यांच्यात खराखुरा सहभाग आढळतो तेथे ईश्वराशी खरा बंध ( Communication ) जुळलेला असतो; ह्यांच्यापासून विचलित होण्यात पापाचे सार आहे आणि तो नरकाचा पाया आहे." स्वर्ग म्हणजे सुख आणि सुख म्हणजे ईश्वराशी सरूपता प्राप्त करून घेणे. नरक म्हणजे यातना, म्हणजे ईश्वराला परके होणे. ख्रिस्ताने तारणाचे कोणतेही नवीन तंत्र स्थापन केले नाही; 'अंतःकरण शुद्ध असले तर आत्म्याला शांती लाभते' ह्यासारखे आध्यात्मिक जीवनाचे महान् आदिम नियम त्याने 'घोषित' केले आणि आपल्या आचरणाने त्यांची सत्यता दृढतेने प्रस्थापित केली. सारांश आध्यात्मिक जीवनाच्या ज्या सार्वत्रिक तत्त्वांना बायबलमधील प्रतिमांत, कथांत आणि दृष्टांतांत एका विशिष्ट प्रकारचे मूर्त स्वरूप लाभले होते ती तत्त्वे त्यांच्या शुद्ध, 'विवेकनिष्ठ' स्वरूपांत मांडण्याचा प्रयत्न केंब्रिज प्लेटॉनिस्टांनी केला. ह्या तत्त्वाभोवतीचे 'काव्यमय अवगुंठन' त्यांनी दूर केले; 'बुद्धिगम्य' आणि 'कुणालाही पटेल' अशा भाषेत ही तत्त्वे त्यांनी मांडली.

बायबलमधील प्रतिमांत आणि दृष्टांतात व्यक्त झालेली आणि दडलेली आध्यात्मिक सत्ये त्यांच्या शुद्ध 'विवेकनिष्ठ' स्वरूपात मांडण्याचा केंब्रिज प्लेटॉनिस्टांचा जो उपक्रम होता तो जिवंत आध्यात्मिक अनुभवावर आधारलेला होता. त्यांना अभिप्रेत असलेली 'विवेकशक्ती' ही प्लेटॉनिक आणि नव-प्लेटॉनिक तात्त्विक दर्शनातील विवेकशक्ती होती. ही केवळ ज्ञानशक्ती नव्हती; आध्यात्मिक उन्नतीची एक विशिष्ट पातळी ज्याने प्राप्त करून घेतली आहे अशा आत्म्याचे ही विवेकशक्ती म्हणजे ज्ञानेंद्रिय असते. ह्या विवेकाला अत्युच्च आध्यात्मिक सत्ये साक्षात् प्रतीत होतात. पण विवेकशक्तीविषयीची दुसरी एक संकल्पना आहे आणि ती आध्यात्मिक परंपरेशी संबंधित नाही, ती निसर्गविज्ञानाशी संबंधित आहे. ख्रिश्चन श्रद्धेवर आणि धर्माचरणावर बायबलमधील प्रतिमांची, दृष्टांतांची आणि कथांची जी पकड होती–जिच्यामुळे आध्यात्मिक सत्ये विकृत होत होती–ती सैल करून ह्या श्रद्धेला एका प्राचीन आणि व्यापक आध्यात्मिक परंपरेच्या जिवंत प्रवाहात नेऊन सोडायचे होते. विज्ञानाचा उदय झाल्यानंतर आणि विज्ञानाचा कार्यक्रम प्रस्थापित झाल्यानंतर दुसरी एक गरज निर्माण झाली होती. निसर्गविषयीचे जे वैज्ञानिक ज्ञान प्राप्त होते आणि त्याच्या प्रकाशात विश्वाच्या घडणीचे जे स्वरूप स्पष्ट होत होते त्यांच्या संदर्भात बायबलचा अर्थ कसा लावायचा ?

लॉक या प्रश्नाकडे वळला. 'ईश्वर असे काहीतरी आहे' हे आपल्या विवेकशक्तीने शोधून काढलेल्या सत्यांतील 'एक अगदी उघड' असे सत्य आहे असे लॉक म्हणतो. गणितातील विधाने जितक्या निश्चितपणे सत्य असतात तितक्या निश्चितपणे हे विधानही सत्य आहे असा त्याचा दावा आहे. ईश्वराचे अस्तित्व 'गणिती निश्चिती'ने सिद्ध करणारा पुरावा असा : 'मी आहे, ही गोष्ट निश्चित आहे; कारण मी विचार करतो ; मी कदाचित् नसेन असा संशय मी घेतला तरी हा संशय ( एक प्रकारचा विचार ) अस्तित्वात आहे हे सिद्ध होते आणि म्हणून हा संशय घेणारा मी आहे हे सिद्ध होते. तेव्हा मला कारण असणार. अभावापासून अस्तित्वात असलेली वस्तू निष्पन्न होऊ शकत नाही ह्या विवेकाला प्रतीत होणाऱ्या तत्त्वापासून, ज्या अर्थी मी अस्तित्वात आहे त्या अर्थी अस्तित्वात असलेली

अशी एक वस्तु माझे कारण असणार हे सिद्ध होते. कारणात गुण असल्याशिवाय ते कार्यात (परिणामात) उतरू शकत नाहीत हेही विवेकाला प्रतीत होणारे सत्य आहे. तेव्हा ज्याअर्थी मला बुद्धी आहे त्या अर्थी मला निर्माण करणारे कारणही बुद्धिमान असले पाहिजे. आता, विश्वात सर्वत्र नियमबद्धता आहे, 'सुव्यवस्था, सुसंगती आणि सौंदर्य' आहे ह्यावरून माझा निर्माणकर्ता ईश्वर सर्वज्ञ आणि सर्वशक्तिमान असला पाहिजे.

लॉकची 'विवेकशक्ती' ही केंब्रिज प्लेटॉनिस्टांच्या विवेकशक्तीहून वेगळी आहे हे उघड आहे. 'एका समान वस्तूशी समान असलेल्या कोणत्याही दोन वस्तू परस्परांशी समान असतात' ह्यासारखी तार्किक सत्ये जिला प्रतीत होतात अशी ती ज्ञानशक्ती आहे. ज्या स्वरूपाच्या ईश्वराचे अस्तित्व ती सिद्ध करते तो ईश्वर विज्ञानाने गृहीत धरलेल्या विश्वात चपखलपणे बसतो; किंबहुना अशा ईश्वराची ह्या विश्वाला आवश्यकता होती असेही मानता आले असते. कारण विश्वातील सर्व घटना जर नियमबद्ध आहेत तर हे नियम घालून देणारा कुणीतरी असला पाहिजे. शिवाय भौतिक विश्वाचे जे चित्र विज्ञानाने स्वीकारले होते त्याच्या प्रमाणे सर्व भौतिक वस्तू भौतिक कणांच्या, परमाणूंच्या बनलेल्या असतात आणि सर्व भौतिक घटना ह्या परमाणूंच्या गतींच्या बनलेल्या असतात. तेव्हा गतीचे नियम निश्चित झाले की कोणत्या घटना घडणार हेही निश्चित होते. एका गतिमान परमाणूचा आघात होऊन नियमाप्रमाणे दुसरा परमाणू गतिमान होतो. पण परमाणूंत मूळगती कोण निर्माण करतो? ती ईश्वर करतो असे मानले की सर्व प्रश्न सुटतात. ईश्वराने विश्वाच्या संदर्भात पार पाडावयाच्या कामगिरीचे स्वरूप स्पष्ट आहे. त्याने परमाणू निर्माण केले पाहिजेत, परमाणूंना गती दिली पाहिजे आणि गतीचे मूलभूत नियम घालून दिले पाहिजेत. एवढे केल्यानंतर त्याला काहीही करावे लागत नाही आणि काहीही करायला उरत नाही. ह्यानंतरच्या सर्व घटना अनिवार्यपणे अटळपणे घडतात.

पण गणिती विवेकशक्तीने सिद्ध केलेला आणि विज्ञानाला अभिप्रेत असलेल्या विश्वाशी सुसंगत असलेला किंवा त्याला आवश्यक असलेला ह्या ईश्वर आणि बायबलमध्ये ज्याने स्वतःला प्रकट केले आहे तो ईश्वर यांचा परस्परसंबंध काय आहे? किंवा दुसऱ्या शब्दांत हा प्रश्न मांडायचा तर असे विचारता येईल की विवेक आणि ईश्वराने प्रकट केलेले सत्य (revealation) यांच्यात काय संबंध आहे. प्रकटीकरणाला (revealation) काही प्रयोजन आहे का?

लॉक प्रकटीकरणापुढे नतमस्तक होतो. "प्रकटीकरणात ज्या सत्यांची साक्ष दिली जाते त्यांच्या ठिकाणी अत्युच्च निश्चिती असते ... जी गोष्ट सांगण्यात आलेली असते ती सर्वसामान्य अनुभवाशी आणि जगरहाटीशी जुळत असो, नसो" ती सत्य असलीच पाहिजे, कारण ही साक्ष ईश्वराने दिलेली असते. श्रद्धा म्हणजे प्रकटीकरणाला देण्यात येणारी मान्यता असा अर्थ करता येईल. पण लॉक पुढे जे म्हणतो ते अधिक महत्त्वाचे आहे. "तथापि हे ईश्वरी प्रकटीकरण आहे आणि आपण त्याचा योग्य अर्थ लावला आहे ह्याविषयी आपली खात्री असली पाहिजे." आणि आपण फिरून 'धर्मात विवेकाचे स्थान काय असावे?' ह्या प्रश्नाकडे येऊन ठेपतो. लॉक म्हणतो, "ईश्वराने जे काही प्रकट केले असेल ते निश्चितपणे सत्य असते; त्याच्याविषयी कोणताही संशय घेता येत नाही. तो श्रद्धेचा योग्य असा विषय आहे; **पण ते ईश्वरी प्रकटीकरण आहे की नाही ह्याचा निर्णय विवेकशक्तीनेच केला पाहिजे,**" (एसे; iv, १८, विभाग ४) लॉक विवेकशक्तीला 'नैसर्गिक प्रकटीकरण' म्हणतो. अनेक अनिवार्य सत्ये विवेकशक्तीला साक्षात् प्रतीत होतात, तिच्यापुढे प्रकट होतात. तेव्हा जेवढी सत्ये आपल्या विवेकशक्तीच्या व्याप्तीत सामावलेली असतात तेवढी ईश्वर विवेकशक्तीद्वारा आपल्यापुढे प्रकट करतो. आणि विवेकाला प्रतीत होणाऱ्या सत्यांत ईश्वर स्वतःच्या प्रकटीकरणाची भर घालतो, तेव्हा ईश्वरी प्रकटीकरण म्हणजे, "नैसर्गिक विवेकाचा विस्तार होय. ईश्वराने आपल्याला साक्षात् उपलब्ध करून दिलेल्या नव्या शोधांमुळे हा विस्तार घडून येतो. आणि हे शोध ईश्वराकडून प्राप्त झाले आहेत ह्याविषयी साक्ष आणि प्रमाणे देऊन विवेकशक्ती त्यांच्या सत्यतेची ग्वाही देते." (कित्ता, iv, १९, विभाग ४.)

तेव्हा ईश्वराने प्रकट केलेली म्हणून जी सत्ये आपल्यापुढे येतात त्यांचे परीक्षण विवेकशक्तीने करायचे असते. एकतर, आपल्या विवेकशक्तीला स्पष्टपणे सत्य म्हणून प्रतीत होणाऱ्या सत्यांना विरोधी असलेले काहीही ईश्वराने प्रकट केलेले सत्य म्हणून आपल्याला प्राप्त होणार नाही. दुसरी गोष्ट अशी की विवेकशक्तीला जे सत्य म्हणून स्पष्टपणे प्रतीत होते किंवा ज्याची सत्यता निश्चितपणे सिद्ध करता येते असे कोणतेही सत्य ईश्वराने प्रकट करण्यात प्रयोजन नाही. उदा. भूमितीत सिद्ध करण्यात आलेले एखादे प्रमेय. कारण ते ईश्वराने प्रकट केले आहे ह्या आधारावर त्याचा सत्य म्हणून स्वीकार करण्याचे आपण ठरविले तर त्यापूर्वी ते ईश्वराने प्रकट केले आहे असा निर्णय विवेकाला, योग्य त्या पुराव्याच्या आधारे, घ्यावा लागणार. आणि भूमितीतील प्रमेय विवेकशक्ती जितक्या निश्चितपणे सत्य म्हणून सिद्ध करू शकते तितक्या निश्चितपणे अमुक एक सत्य ईश्वराने प्रकट केले आहे हे ती कधीही सिद्ध करू शकत नाही. गणिती सिद्धीच्या मानाने ह्याविषयीचा पुरावा नेहमीच काहीसा कमकुवत असतो.

सारांश, लॉकच्या म्हणण्याप्रमाणे 'सर्व बाबतीत निर्णय घेण्याचा आणि मार्गदर्शन करण्याचा अंतिम अधिकार विवेकशक्तीचाच आहे.' ह्याचा अर्थ बायबलमध्ये ईश्वरी संदेश प्रकट करण्यात आला आहे ही गोष्ट लॉक नाकारीत असे असा नाही. बायबल हे 'ईश्वरी प्रकटीकरण' आहे असे परंपरेने मान्य करण्यात आले होते आणि ह्या दृढमूल श्रद्धेची चिकित्सा लॉक करीत नाही. तिचे प्रामाण्य सिद्ध करण्याचा तो प्रयत्न करीत नाही. पण बायबलमधील वचनांचे जे नाना प्रकारचे अर्थ लावण्यात येत होते, विशेषतः अनेक भिन्न कडवे प्रॉटेस्टंट पंथ आपल्याला ईश्वरी साक्षात्कार झाल्याचा दावा करून बायबलमधील साध्या वाक्यांचे जे अतिरंजित अर्थ लावीत होते त्यांना लॉकने कसून विरोध केला. 'ख्रिश्चन धर्माची विवेकशीलता'– 'रीझनेबलनेस ऑफ् ख्रिश्चानिटी'– ह्या त्याच्या ग्रंथाचा उद्देश बायबलची आध्यात्मिक आणि नैतिक शिकवण साधी, सोपी, 'समंजस,' विवेकाला पटण्यासारखी आहे हे दाखवून देण्याचा होता.

बायबल हे मानवजातीतील बहुसंख्य निरक्षर लोकांना त्यांचे तारण कसे होईल ह्याविषयी मार्गदर्शन करण्यासाठी ईश्वराने रचलेल्या लिखाणांचा संग्रह आहे अशी भूमिका लॉक स्वीकारतो. तेव्हा बायबलच्या ह्या उद्देशाच्या दृष्टीने आवश्यक असलेल्या गोष्टीविषयीची जी वचने बायबलमध्ये आहेत त्याचा सरळ शब्दशः अर्थ घेतला पाहिजे. आता माणसाच्या तारणाविषयी किंवा पुनरुद्धाराविषयी जो ख्रिश्चन सिद्धांत आहे तो अॅडमच्या 'पतना'वर आधारलेला आहे. ह्या पतनाचे काय परिणाम झाले? ह्या पतनामुळे अॅडमने काय गमावले आणि ख्रिस्ताने माणसाला काय परत मिळवून दिले ? लॉकचे उत्तर असे की अॅडमने आणि त्याच्या वंशजांनी आनंद गमावला आणि अमरत्व गमावले. अॅडमच्या पापाची त्याला आणि त्याच्या वंशजांना जी शिक्षा झाली ती एवढीच की ते मर्त्य झाले आणि कष्ट व दुःख भोगणे त्यांना प्राप्त झाले. कित्येक धर्मशास्त्रज्ञ जे असे मानतात की अॅडमच्या पापामुळे त्याची आणि त्याच्या सर्व वंशजांची प्रकृतीच पूर्णपणे पापमय झाली आणि माणसाने स्वाभाविक प्रेरणेने केलेले प्रत्येक कृत्य पापी असते त्याला काही आधार नाही. ख्रिस्ताने ज्या गोष्टी माणसाला परत मिळवून दिल्या त्या म्हणजे आनंद आणि अमरत्व; ह्या अर्थात् ह्या जगात माणसांना लाभणार नाहीत पण शेवटच्या निर्णयाच्या दिवशी सर्व मेलेल्या माणसांचा पुनरुद्धार होऊन स्वर्गाचे राज्य स्थापन झाल्यानंतर लाभतील. माणसाला हे लाभण्यासाठी ख्रिस्ताने दोनच अटी घातल्या आहेत असे बायबलच्या शिकवणीवरून दिसते. पहिली, जीझस हा माणसाच्या तारणासाठी ईश्वराने पाठविलेला 'मेसाया' आहे अशी श्रद्धा बाळगणे; दुसरी, पूर्वीच्या पापाबद्दल पश्चात्ताप करून पुढे नीतीने जगणे. ह्याशिवाय दुसऱ्या कोणत्याही सिद्धांतावर विश्वास ठेवला पाहिजे अशी ख्रिस्ताची मागणी नाही. येशू ख्रिस्ताने प्रामुख्याने काय केले तर माणसाच्या नैसर्गिक विवेकशक्तीने जे नैतिक नियम शोधून काढले होते (आणि धार्मिक भाष्यकारांनी ज्यांना अंधश्रद्धेमुळे व अज्ञानामुळे विकृत स्वरूप दिले होते) त्या नियमांची स्वच्छ मांडणी त्याने दृढपणे केली आणि कित्येक नवीन नियम घालून दिले. पण

हे नवीन नियमही विवेकशक्तीला प्रतीत होणारे नियमच होते. तेव्हा 'ह्यापेक्षा अधिक समंजस, विवेकाला पटणारे असे काय असू शकेल ?' असा लॉकचा प्रश्न आहे.

पण ख्रिश्चन धर्माच्या ह्या मांडणीतही विवेकाला खटकणारे असे काहीतरी आहेच. ख्रिस्त अवतरल्या-नंतर मेसाया म्हणून त्याच्यावर श्रद्धा ठेवली पाहिजे ही अट, तो खरोखरीच मेसाया असल्यामुळे योग्य असेलही. पण ख्रिस्तजन्मापूर्वी जी माणसे नीतीने वागत होती त्यांना ही अट तारणासाठी घालणे कसे काय योग्य ठरते ? ह्यावर लॉकचे उत्तर असे की आपण मेसाया पाठवू असे ईश्वराने जे वचन दिले होते त्यावर त्यांनी विश्वास ठेवला पाहिजे असे त्यांच्यासाठी असलेल्या अटीचे स्वरूप होते. पण ईश्वराने असे वचन दिले होते हे ज्यू परंपरेतील माणसांना माहीत होते. इतरांना, उदा. ग्रीक आणि रोमन लोकांना अशा वचनाची कल्पनाही नव्हती. मग त्यांच्यावर अशी अट कशी लादता येईल ? ह्याला लॉकने जे उत्तर दिले त्याने ख्रिश्चन धर्माच्या मुळावरच घाव घातल्यासारखा झाला. त्यांना नैतिक नियम 'नैसर्गिक प्रकाशा'मुळे प्रतीत झाले आणि "ईश्वरी प्रकृतीचा आणि ज्ञानाचा जो स्फुल्लिंग माणसात असतो, ज्याच्यामुळे तो माणूस बनतो आणि माणूस म्हणून ज्या कायद्याच्या आधिपत्या-खाली तो असतो त्याचे दर्शन ज्याने त्याला घडविले होते त्याच स्फुल्लिंगाने, ह्या कायद्याचे अतिक्रमण जेव्हा माणसाकडून घडत असे तेव्हा आपला आणि आपल्या अस्तित्वाचा जो कृपाळू, दयाळू आणि कनवाळू निर्माता आणि पिता आहे त्याच्याकडे ह्या दुष्कृत्याचे परिमार्जन कसे करावे हेही त्याला दाखवून दिले." ह्याचा अर्थ असा की ईश्वर कनवाळू आहे, माणसाच्या हातून जेव्हा नैतिक नियमांचे उल्लंघन होते तेव्हा त्याने जर ईश्वराची पश्चात्तापपूर्वक क्षमा मागितली तर ईश्वर त्याला क्षमा करतो, पापापासून मुक्त करतो. पण मग ख्रिस्ताच्या मध्यस्थीची जरूरी काय ? आणि माण-साच्या तारणाची जी विशिष्ट ख्रिस्ती अशी संकल्पना आहे तिचे स्थान काय ? आणि ही संकल्पना 'नव्या करारा'त जी प्रकट करण्यात आली आहे त्या ईश्वरी प्रकटीकरणाची आवश्यकता तरी काय ?

ह्यावर लॉकचे म्हणणे असे आहे की प्रगल्भ बुद्धीचे शहाणे आणि सद्गुणी लोक घेतले तर माणसाच्या विवेकबुद्धीवर आधारलेला माणसाचा 'नैसर्गिक धर्म' त्यांच्या बाबतीत पुरेसा असतो. पण अज्ञ आणि प्राकृत माणसांचा बनलेला बहुजन-समाज घेतला तर हा नैसर्गिक धर्म पुरेसा ठरत नाही. त्याच्या अधिकाराचा वचक त्यांना जाणवत नाही. तेव्हा अशा लोकांसाठी ईश्वरी प्रकटीकरणा-मध्ये जे प्रामाण्य, जो अधिकार अभिप्रेत असतो त्याची आवश्यकता असते. ईश्वरी प्रकटीकरणाचे हे एक प्रयोजन झाले. दुसरे प्रयोजन असे : ही गोष्ट खरी आहे की मानवी नीतीची मूलभूत तत्त्वे विवेकशक्तीला प्रमाण म्हणून प्रतीत होतात आणि गणितात ज्याप्रमाणे आदिविधानांपासून (axioms) इतर प्रमेयांचे निगमन करता येते त्याप्रमाणे नीतीच्या मूलभूत तत्त्वांपासून दुय्यम, साधित नियमांचे निगमन करून मानवी जीवनाला पुरेशी अशी समग्र नीती प्रस्थापित करता येते. पण हे अतिशय दुर्घट असे काम आहे आणि त्याच्यात माणसाची प्रगती कष्टाने आणि सावकाश होते असा अनुभव आहे. पण ही समग्र नीती माणसासाठी स्पष्ट करणे आणि तिचा अधिकार, तिचे प्रामाण्य त्याला स्वीकारायला लावणे मानवी हिताच्या दृष्टीने अतिशय आवश्यक आहे. ईश्वरी प्रकटी-करणामुळे हे साधले जाते. शिवाय मानवी बुद्धीला स्वतःच्या बळावर जी सत्ये कधीही अवगत झाली नसती ती ईश्वराने प्रकट केल्यामुळे त्याला समजून येतात. उदा. मरणोत्तर जीवन असते, पापाबद्दल शासन होते, सद्वर्तनाला पारितोषिक मिळते, इ.

तेव्हा लॉकच्या म्हणण्याप्रमाणे प्रकटीकरणाला काही कार्य उरतेच, प्रकटीकरणाचे काही प्रयोजन आहेच. एका बाजूने विवेकशक्तीचा सार्वभौम अधि-कार लॉक मान्य करतो; कारण ईश्वरी प्रकटीकरण असल्याचा दावा करणारा धर्मग्रंथ जेव्हा पुढे येतो तेव्हा हा दावा कितपत समर्थनीय आहे ह्याचा निर्णय विवेकशक्तीनेच घ्यायचा आहे. पण एकदा एखाद्या धर्मग्रंथाच्या बाबतीत हा दावा मान्य कर-ण्यात आला की त्यात प्रकट करण्यात आलेली आणि विवेकाला विरोधी नसलेली सत्ये मान्य करणे भाग आहे. मग ह्यांपैकी कित्येक सत्यांचे प्रामाण्य विवे-

[अनुक्रमणिका](#)

काला जरी सिद्ध करता येत नसले तरी ईश्वराने प्रकट केलेली सत्ये म्हणून ती स्वीकारावी लागतात.

सोळाव्या आणि सतराव्या शतकात परंपरेला बाजूला सारून व्यक्तीच्या अनुभवांच्या आणि ज्ञानशक्तींच्या बळावर ज्ञानाची नव्याने उभारणी करण्याचा उपक्रम विचारवंतांनी सुरू केला. प्रॉटेस्टंटांनी बायबलचा अर्थ लावण्याचा चर्चचा जो परंपरागत अधिकार होता तो झुगारून दिला आणि हा अधिकार व्यक्तीकडे दिला. ईश्वराने प्रकट केलेले सत्य ज्याच्यात ग्रथित करण्यात आले आहे ते बायबल आणि व्यक्ती ह्यांच्यांत परंपरेला वगळून, साक्षात् नाते निर्माण केले. देकार्त आणि लॉक ह्यांनी आपल्या स्वतःच्या बुद्धिला, किंवा बुद्धीला आणि अनुभवाला जे सत्य म्हणून प्रतीत होईल तेवढेच सत्य म्हणून आपण स्वीकारणार असे जाहीर केले. विज्ञानाची स्वतःची परंपरा असली तरी विज्ञानाचा दृष्टिकोन परंपरानिष्ठ नसतो. बुद्धीच्या आणि अनुभवाच्या निकषावर जे टिकून रहाते तेवढेच सत्य म्हणून स्वीकारायचे ही तर वैज्ञानिक पद्धती आहे. सतराव्या शतकात निसर्गाचे क्षेत्र वैज्ञानिक पद्धतीला म्हणजे मानवी बुद्धीला खुले झाले. विज्ञानाची झपाट्याने प्रगती झाली आणि न्यूटनच्या कामगिरीने विज्ञानाला व वैज्ञानिक पद्धतीला जगमगीत प्रतिष्ठा लाभली. सामाजिक व्यवहाराच्या क्षेत्रातील वस्तुस्थिती वेगळी होती. प्रॉटेस्टंट पंथीयांनी चर्चमध्ये मूर्त झालेल्या परंपरेचे प्रामाण्य झुगारून दिले ही गोष्ट खरी असली तरी ईश्वरी प्रकटीकरण म्हणून बायबलचा सार्वभौम अधिकार त्यांनी मान्य केला होता. बायबलचा अर्थ लावण्याचा अधिकार जरी त्यांनी व्यक्तीकडे सुपूर्द केला असला तरी हा केवळ अर्थ लावण्याचा, गौण अधिकार होता; सत्य काय आहे हे ठरविण्याचा तो सार्वभौम अधिकार नव्हता आणि युरोपियन संस्कृतीत बायबलला असलेले प्रामाण्य केवळ परंपरेवर आधारलेले होते. पण 'नैसर्गिक प्रकाशा'च्या रूपाने ईश्वर प्रत्येक व्यक्तीच्या मनात स्वतःला सतत प्रकट करीत असतो ह्या सिद्धांताने बायबलमधील प्रकटीकरणाला गौण स्थान प्राप्त झाले. लॉकच्या भूमिकेप्रमाणे प्रकटीकरण असल्याचा दावा करणाऱ्या धर्मग्रंथाला विवेकशक्तिच्या निर्णयपीठापुढे उभे राहून आपला दावा सिद्ध करावा लागतो. ह्या सिद्धांतामुळे बायबलच्या स्वयंसिद्ध प्रामाण्याला सुरुंग लावला गेला. 'बायबलचा ईश्वरी प्रकटीकरण असल्याचा दावा कितपत मान्य करता येईल ?' हा प्रश्न उपस्थित करून लॉकने हा सुरुंग शिलगावला नाही. पण त्याने पेरलेला सुरुंग तेथेच राहिला.

अठराव्या शतकात 'प्रकटीकरणा'ची संकल्पना आणि बायबल ह्यांना बचावाचा पवित्रा धारण करावा लागला. 'ख्रिश्चन धर्म गूढ नव्हे'– 'ख्रिश्च्यॅनिटी नॉट मिस्टिरियस'– ह्या जॉन टोलंड ह्याच्या प्रातिनिधिक ग्रंथाचा उद्देश ख्रिस्ती धर्मात विवेकाला प्रतीत होणाऱ्या सत्यांशी विसंगत असे काहीच नाही हे दाखवून देण्याचा आहे. पण ह्याचा अर्थ असा होतो की 'प्रकटीकरणा'चे काही प्रयोजन उरत नाही; बायबल ही विवेकनिष्ठ धर्माच्या मार्गातील एक अडगळ ठरते. बायबलमध्ये प्रकट करण्यात आलेली जी सत्ये विवेकनिष्ठ धर्माच्या तत्त्वांशी सुसंगत आहेत ती अर्थात् विवेकाधिष्ठित म्हणून स्वीकारणे योग्य असते, त्यांच्यासाठी प्रकटीकरणाच्या आधाराची आवश्यकता नसते. आणि जी सत्ये विवेकाधिष्ठित तत्त्वांशी विसंगत असल्याचे आढळते त्यांचा वेगळा अर्थ लावून ही विसंगती दूर करावी लागते किंवा त्यांच्याकडे डोळेझाक करावी लागते. विवेकाधिष्ठित धर्माची एक कल्पना अठराव्या शतकात रूढ झाली होती. निसर्गातील सर्व घटना सार्वत्रिक नियमांना अनुसरून घडतात आणि हे नियम–मानवेतर निसर्गाचे आणि मानवी प्रकृतीचे नियमन करणारे हे नियम–असे आहेत की त्यांच्या योगाने मानवजातीचे जास्तीत जास्त शक्य असलेले कल्याण साधले जाते. ह्यावरून सर्वशक्तिमान आणि दयाळू असा जगाचा निर्माणकर्ता असला पाहिजे हे सिद्ध होते. अठराव्या शतकातील विवेकाधिष्ठित धर्माचा आशय असा होता. हे जग परिपूर्ण नसले तरी आपले हे जे जग आहे ते परिपूर्ण अशा ईश्वराला जी जगे निर्माण करणे शक्य होते त्यांच्यातील सर्वोत्कृष्ट जग आहे हे ह्या विवेकाधिष्ठित धर्माचा पुरस्कार करणाऱ्यांचे ब्रीदवाक्य होते. आदिमानवाच्या पापामुळे सारा निसर्ग आणि मानवी प्रकृती विकृत आणि भ्रष्ट झाली आहे, विश्वपतीच्या दुरिताच्या, कष्ट, यातना आणि मृत्यू यांच्या





अनुक्रमणिका

स्वरूपात ह्या भ्रष्टतेच्या खाणाखुणा ईश्वराच्या कृपेला पारख्या झालेल्या ह्या जगात सर्वत्र आढळून येतात, ख्रिस्ताला शरण जाऊन त्याच्यामार्फत ईश्वरी अनुग्रहाची याचना करणे हाच माणसाच्या तारणाचा एकमेव मार्ग आहे हा ख्रिस्ती सिद्धांत आता भूतकालात दूर सरला होता. ख्रिस्ती परंपरेत वाढलेल्यांना हा विवेकनिष्ठ धर्म स्वीकारणे अशक्य होते. पण विवेकाला अजिबात डावलणे त्यांना शक्य नव्हते. बिशप बटलरच्या 'ॲनॅलॉजी' ह्या ग्रंथांत ही ओढाताण स्पष्टपणे दिसून येते. बिशप बटलरचा युक्तिवाद असा की तुम्ही प्रकटीकरण नाकारता कारण तुम्हाला त्याच्यात अनेक तर्कविसंगत, विपरीत, विवेकाला न पटणाऱ्या गोष्टी आढळून येतात. आणि तुम्ही निसर्गात आढळणाऱ्या व्यवस्थेपासून, सुरचनेपासून ईश्वराचे अनुमान करता. पण आपण निसर्गाची व्यवस्था आणि क्रम पाहिला तर आपल्याला त्याच्यातही तितक्याच विपरीत, अनाकलनीय, विवेकाला न पटणाऱ्या गोष्टी आढळून येतात. मग ह्या स्वरूपाचा निसर्ग जर सर्वशक्तिमान आणि दयाळू ईश्वराची निर्मिती म्हणून मान्य करायला तुम्ही तयार असाल तर ह्या स्वरूपाचे 'दोषपूर्ण' प्रकटीकरण ईश्वराने केले आहे हे मान्य करायला तुम्हाला अडचण का भासावी? निसर्गात आणि प्रकटीकरणात विपरीत भासणाऱ्या गोष्टी मर्यादित मानवी बुद्धीला अनाकलनीय ठरतात अशी गूढे आहेत एवढे म्हणून ह्या दोह्रोतही ईश्वराच्या कृपेचाच आविष्कार झाला आहे असे आपण का मानू नये ?

पण बिशप बटलरने बायबलच्या बचावासाठी उपसलेले हे हत्यार दुधारी ठरले. निसर्ग आणि बायबल ह्या दोहोंकडे माणसे अधिक निरखून पाहू लागली आणि प्रकटीकरणावर आधारलेला धर्म व विवेकावर आधारलेला धर्म या दोहोंचा पाया सारखाच भुसभुशीत आहे ह्या निर्णयाकडे अनेकजण वळू लागले. ख्रिस्ती धर्माविषयी ह्यूमने काढलेल्या पुढील निष्कर्षाशी अनेकजण सहमत होते. ख्रिस्ताने आणि त्याच्या उपदेशकांनी, संतांनी केलेल्या अनेक चमत्कारांवर ख्रिस्ती श्रद्धाळू विश्वास ठेवतात पण ख्रिस्ती धर्मावर कुणाचा विश्वास बसतो हाच एक मोठा चमत्कार आहे असे ह्यूमचे म्हणणे आहे. "तेव्हा, एकंदरीत, आपल्याला असा निष्कर्ष काढता येईल की ख्रिश्चन धर्माला त्याच्या केवळ प्रारंभीच चमत्कारांची साथ लाभली होती असे नसून आजसुद्धा कुणीही विवेकशील माणूस चमत्कार घडल्याशिवाय त्याच्यावर विश्वास ठेवू शकणार नाही. त्याच्या सत्यतेविषयी आपली खात्री पटवून द्यायला केवळ विवेकशक्ती अपुरी पडते; आणि त्याला मान्यता देण्याची प्रेरणा ज्याला श्रद्धेपासून मिळते त्याला आपल्या अंतरंगात एक चमत्कार सातत्याने घडून येत आहे अशी जाणीव होते; आपल्या विवेकशक्तीची सर्व तत्त्वे खच्ची करणारा, जगाच्या रहाटीशी आणि अनुभवाशी अत्यंत विरोधी असलेल्या गोष्टींवर विश्वास ठेवायचा निर्धार आपल्याला देणारा असा हा चमत्कार असतो."

—

अनुक्रमणिका

# विज्ञान व धर्मश्रद्धा : प्रश्नावली

[ धर्मसुधारणा विशेषांकाप्रीत्यर्थ काही विचारवंतांना पाठविलेली प्रश्नावली व तिला श्री. वसंत पळशीकर यांनी दिलेली उत्तरे खाली दिली आहेत – का. सं. ]

प्र. १ वैज्ञानिक शोध आणि वैज्ञानिक विचारपद्धती ह्यांच्यामुळे धर्म कालबाह्य झाला आहे असे अनेकजण मानतात. उलट धर्म 'श्रद्धे'वर आधारलेला असतो आणि ह्या श्रद्धेला वैज्ञानिक शोधांमुळे छेद जाऊ शकत नाही, वैज्ञानिक ज्ञान आणि ह्या श्रद्धेचा आशय ह्यांच्यामध्ये परस्पर-विरोध संभवत नाही असे अनेकजण मानतात. हा दुसरा पक्ष जर स्वीकारला तर ह्या श्रद्धेचा आशय काय असू शकेल? एका विशिष्ट दृष्टीने जीवन जगण्यात– (केवळ उदाहरणार्थ आत्मौपम्य बुद्धीने जगण्यात)–जीवनाचे खरेखुरे सार्थक असते एवढाच ह्या श्रद्धेचा आशय असु शकेल का? की ह्या दृष्टीने जीवन जगण्यात जीवनाचे खरेखुरे सार्थक असते असे मानण्यात विश्वाच्या स्वरूपाविषयीचे काही सिद्धांत (ontological) अभिप्रेत, गृहीत असतात? (केवळ उदाहरणार्थ ईश्वर, ब्रह्म, अमर आत्मा, इ. यांचा असे सिद्धांत म्हणून उल्लेख करता येईल.) असे काही सिद्धांत अभिप्रेत असले तर हे सिद्धांत सत्य आहेत असे आपल्या श्रद्धेला साक्षात् दर्शन होते किंवा कोणत्यातरी मार्गाने हे ज्ञान होते आणि कोणतेही वैज्ञानिक शोध लागले तरी हे ज्ञान अबाधित रहाते असे मानता येईल का?

उ. १ धर्म विश्वाच्या स्वरूपाविषयीचे काही सिद्धांत सांगतो. विश्वातील व्यवहार कसे चालतात याचे ज्ञान करून देणारे केवळ हे सिद्धांत असत नाहीत. सर्व चराचर सृष्टीतील अनुबंध त्यातून स्पष्ट होतात. हे अनुबंध निर्हेतुक नाहीत ही गोष्टही त्या सिद्धांतांमध्ये गर्भित असते. आणि म्हणून माणसाने स्वतःशी, निसर्गाशी व इतरांशी कसे वर्तन करावे यासंबंधीही त्या सिद्धांतांमध्ये दिग्दर्शन असते. समाजाची धारणा करतो तो धर्म असे म्हणूनच म्हटले आहे.

अमूक एक धारणा मी का प्रमाण मानावी, अमूक एक जीवनदृष्टी मी 'सत्य' का मानावी, यासाठी अंतिमतः, 'पुरावा' सादर केला जाऊ शकत नाही. वैज्ञानिक विचारपद्धतीने लावावयाच्या शोधांच्या क्षेत्रात ही गोष्ट येत नाही. 'साक्षात्कारा'च्या क्षेत्रातली ती गोष्ट आहे. साक्षात्कारांचे सत्यत्व वैज्ञानिक स्वरूपाचे असत नाही. जीवनव्यवहारांच्या व अनुभवांच्या संदर्भात साक्षात्कारातून सूचित होणारी जीवनदृष्टी वा धारणा किती अर्थपूर्ण प्रतीत होते त्यावर त्याचे सत्यत्व अवलंबून असते.

तसे पाहिले तर आपण स्वतःशी, निसर्गाशी वा इतरांशी कसे वागावे हे ठरविण्यास माणूस मोकळा असतो. आणि तरीही बहुसंख्य व्यक्ती काही थोडक्या व्यक्तींच्या या क्षेत्रातल्या 'साक्षात्कारी' सामर्थ्यावर श्रद्धा ठेवणे पसंत करतात असे दिसते. ही गोष्ट अस्वाभाविक तर नाहीच पण तशी अनिष्टही नाही.

अमूक एक जीवनदृष्टी वा धारणा बाळगण्यासाठी विश्वाच्या स्वरूपाविषयी काही सिद्धांत मांडणे आवश्यकच आहे का या प्रश्नाचे उत्तर होकारार्थी द्यावे लागते. ज्याला आपण निसर्गसृष्टीचे भौतिकी व्यवहार म्हणू त्यांविषयीचे वैज्ञानिक ज्ञान पूर्णपणे स्वीकारल्यावरही मानवी व्यवहाराच्या विश्वाच्या स्वरूपाविषयी काही सिद्धांत मांडावाच लागतो आणि असा सिद्धांत केवळ वैज्ञानिक ज्ञानाधारित असत नाही.

मानवी व्यवहारांच्या क्षेत्रात एकच एक साक्षात्कारी दर्शन एकमेव सत्य म्हणून मान्यता पावलेले नाही आणि, या प्रकारच्या दर्शनाचे स्वरूप व कार्य लक्षात घेता अशी मान्यता एखाद्या दर्शनास प्राप्त होईल अशी शक्यताही नाही. त्याची गरजही नाही.

वैज्ञानिक ज्ञान कितीही वाढले तरी अशा दर्शनांना ते छेद देऊ शकणार नाही. तसेच अनेक साक्षात्कारी दर्शनेही एकमेकांना छेद देऊ शकत नाहीत.

अनुक्रमणिका

प्र. २ विज्ञानयुगातील ह्या धार्मिक श्रद्धेचे आणि हिंदू धर्म, इस्लाम, इ. पारंपरिक धर्म आणि त्यांचे सिद्धांत ह्यांचे नाते आपल्या दृष्टीने काय आहे?

उ. २ ज्या प्रकारच्या साक्षात्कारी दर्शनांवर पारंपरिक धर्मांची उभारणी झालेली आहे त्या दर्शनांमध्ये वैज्ञानिक सत्यशोधनाच्या क्षेत्रातील अनेक बाबींचा समावेश होऊन त्यांसंबंधीही ' सत्ये ' प्रतिपादिली गेली आहेत. त्या बाबी कोणत्या ते पाहून त्यांच्यासंबंधीची मांडणी ही वेगळी करून ' धर्मबाह्य ' ठरविली पाहिजे.

या प्रकारच्या धर्मबाह्य गोष्टी काढून टाकल्यावर या धर्मांनी मानवी व्यवहाराच्या विश्वाच्या स्वरूपाविषयी मांडलेले सिद्धांत आणि सांगितलेले आचारधर्म जसेच्या तसे स्वीकारार्ह ठरतात असे अर्थातच नाही. पण ते तसे अबाधित न ठरण्याचे श्रेय विज्ञानयुगाला देण्याचेही काही खास कारण नाही. मानवी व्यवहाराच्या विश्वाच्या स्वरूपाविषयी नवनवी साक्षात्कारी दर्शने आज प्रसृत झालेली आहेत आणि ती ज्या प्रमाणात ग्राह्य वाटतात त्या प्रमाणात पारंपरिक धर्म व त्यांचे सिद्धांत सुधारून वा बदलून घ्यावे लागतील व ती प्रक्रिया चालू आहे. वैज्ञानिक सत्यशोधनापासून प्रेरणा घेऊन किंवा त्यांचे निमित्त होऊन नवनवी दर्शने पुढे ठेवली गेली आहेत त्या मर्यादेपर्यंत विज्ञानयुगाला श्रेय द्यायचे असल्यास हरकत नाही. पण आजचे विज्ञानयुग अवतरण्याच्या आधीही, अगदी प्राचीन कालापासून नवी दर्शने मांडली गेलेली आहेत आणि त्यांची दखल पारंपरिक धर्मांना घ्यावी लागली आहे.

प्र. ३ धर्म ही केवळ व्यक्तीच्या खाजगी जीवनाची बाब आहे पण भिन्न व्यक्तींमधील परस्परसंबंधांचे नियमन मानवी कल्याणाच्या ' ऐहिक ' संकल्पनेद्वाराच होणे योग्य आहे अशी एक इहवादी भूमिका आहे. ती आपल्याला पटते का?

उ. ३ मानवी कल्याणाची ' ऐहिक ' संकल्पनाही चराचरसृष्टिविषयक सर्वस्पर्शी अशा साक्षात्कारी दर्शनातूनच आकारास येत असते. मानवी व्यवहारांच्या क्षेत्रात चराचरसृष्टी ज्या प्रमाणात समाविष्ट आहे त्या प्रमाणात, या अर्थाने विश्वाच्या स्वरूपाविषयी कोणतीच भूमिका न घेता भिन्न व्यक्तींमधील परस्परसंबंधांचे नियमन होऊ शकत नाही. वेगवेगळे धर्म एकाच समाजात अनुसरले जातात तेथे काही परस्परकलह व तणाव हा अपरिहार्य आहे. अहिंसेचे पथ्य पाळून सर्वांनी व्यवहार केल्यानेच त्याचे विध्वंसक परिणाम टळून त्याची विधायक फळे पदरात पडतील. हे जाणणे विवेकालाच आवश्यक आहे की वेगवेगळ्या धर्मांच्या —साक्षात्कारी दर्शनांच्या— मधील सर्जनशील तणावाची समाजाच्या निकोप विकासासाठी आवश्यकता आहे.

प्र. ४ भारतीय समाजासारख्या बहुधार्मिक समाजात हिंदू धर्म, इस्लाम, इ. पारंपरिक धर्मांचे स्थान कोणते रहावे असे आपल्याला वाटते?

उ. ४ भारतातील राज्यसत्ता ही धर्मसत्ता नसावी. म्हणजेच कोणत्याही एका धर्माला 'अधिकृत धर्म ' म्हणून मान्यता व प्रामाण्य नसावे. धर्मांच्या बाबतीत तिने 'सहानुभावपूर्व तटस्थते 'ची भूमिका स्वीकारावी. सर्वधर्मसमभावाने वर्तन करावे.

विविध धर्मांच्या सहअस्तित्वाच्या दृष्टीने अनिवार्य अशी पथ्ये कोणती त्यांची स्पष्टता करावी, त्यांचा कायद्यांमध्ये अंतर्भाव करावा आणि त्यांच्या चालनाचा काटेकोरपणे व निःपक्षपातीपणे आग्रह धरावा. एवढे पुरेसे आहे.

या चौकटीत धर्मांना सन्मानाचे स्थान असावयास हवे.

प्र. ५ नीतीला धर्माचे अधिष्ठान आवश्यक आहे असे कित्येकांचे मत आहे. हे मत सत्य असल्यास कोणत्या अर्थाने सत्य आहे?

उ. ५ पहिल्या प्रश्नाच्या उत्तरातच या प्रश्नाचे उत्तर आले आहे.

## ब्र. स्वामी केवलानंद यांचे धर्मविषयक तत्त्वज्ञान

[ दिनांक माघ शुद्ध १५ शके १८६०, ४ फेब्रुवारी १९३९ शनिवारच्या दैनंदिनी वरून ]

धर्माची– ज्या धर्माची– स्थापना आता व्हावयास पाहिजे आहे तो धर्म कसा असावा ?

तो धर्म विश्वधर्म होण्यास स्वतः समर्थ असावा.

तो धर्म समाजाचा सर्वांगीण उत्कर्ष करणारा असावा.

तो धर्म सर्व समाजाला एकाच उच्च ध्येयाकडे नेणारा असावा.

तो धर्म केवळ ऐहिक दृष्टीच्या परंतु विद्वान आणि उदारमनस्क अशा सद्गृहस्थालाही $\frac{4}{5}$ ( चार पंचमांश ) तरी पटणारा असावा.

निराळ्या भाषेत असे म्हणता येईल—

मनुष्यांचा समाज असतो. समाजघटक प्रत्येक व्यक्तीला आणि अखिल समाजाला काही अधिकार आणि काही कर्तव्ये असतात. प्रत्येक व्यक्तीला, इतर व्यक्ति आणि अखिल समाज यांच्या तंत्राला धोका न आणता स्वतःचा सर्वांगीण उत्कर्ष करून घेण्याचा रिक्थ (अधिकार) आहे परंतु प्रसंगी समाजाकरता आत्मार्पण करणे हेही कर्तव्यच आहे. तर अशा रीतीने व्यक्ति नि समाज ( यांची ) सर्व कर्तव्ये आणि त्यांचे व्यवहारामध्ये परस्पराशी वागण्याचे सर्व प्रकारचे नियम यांच्या समुच्चयास आणि त्यातील प्रत्येक नियमास धर्म अशी संज्ञा आहे.

पूर्वी एकदा समाजाची वृद्धि आणि धारण-पोषण करणारा एक धर्म उत्पन्न झाला होता. त्या धर्माने बराच काल सर्व समाजाचा उत्कर्षाचा गेला. परंतु काही कालाने म्हणजे खालचा समाज उत्कर्षाला जातो आहे असे पाहून पुढला समाज खालच्या समाजाच्या उत्कर्षाला प्रतिबंध करू लागला. तेव्हापासून त्या धर्मातील उत्कर्षाचे धोरण मागे पडले आणि समाजधारणेला लागणारा समाजाचा बळकटपणा नाहीसा झाला. मग त्यापासून काही संप्रदाय उत्पन्न झाले. बौद्ध नी जैन. ते विश्व धर्म झाले. त्या स्थितीत पुनः वरिष्ठ आणि विद्वान् अशा सनातनी समाजाने पूर्व धर्मात काही अंश समाविष्ट करून ( मूर्ती, देवळे, व्रतवैकल्ये, तीर्थक्षेत्र, काही आध्यात्मिक संप्रदाय ) पुनः सर्व समाजास एकत्रित करण्याचा प्रयत्न केला. तो काही शतके टिकला, परंतु पूर्वीच्या समाजरचनेतील मुख्य मुख्य अंश फार बोचक होते, ते बोथट न होता तीक्ष्णच झाले. त्यामुळे अखेर अखंड होत असलेला समाज अगदी छिन्नविच्छिन्न होऊन शतशः खण्डित झाला. आता पुन्हा जर त्या समाजास एकजीव करावयाचे असेल तर धर्माची आमूलाग्र निराळीच रचना करावी लागेल. कदाचित त्याचे धर्म हे नाव बदलावे लागले तरी अडचण नाही.

अशी जी धर्माची स्थापना व्हावयास पाहिजे आहे ती अर्थकाममूलक असून मोक्षगामी असावी आणि तो मोक्ष सद्योमुक्ति–जीवन्मुक्तिरूप असावा. अपरोक्ष ( प्रत्यक्ष ) असावा. परोक्ष नसावा. केवळ बोवामहाराजांना अपरोक्ष असण्यापेक्षा सामान्य समाजालाच तो साक्षात् अपरोक्ष असावा.

---

अनुक्रमणिका

# जाहिरात सूची








अनुक्रमणिका

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका






मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास


नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष





नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

अनुक्रमणिका











अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास


नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

अनुक्रमणिका







The old order changeth...........more than its temples and churches, GOA is now better known for its towering socio-economic monument built by our tenacious and hardworking people.

On a soild foundation laid by the sacrifices of our freedom fighters.

Each year raises our peoples vision, hopes and faith in their strength and endeavours.

Goans have now multiple opporunities in agriculture, industry and social reform.

A rejuvenated village has set its objective to a continued economic growth. It has better educational and medical facilities, electricity, roads, bridges, transport and water supply.

Panchayats and co-operatives have given a fillip to rural economy.

A trained farmer freed from feudal clutches now adopts modern farm practices and an artisan breaks new ground in craftsmanship.

It is this solid edifice for which Goa receives eulogies from various sections of the community.

We therefore pledge anew to strengthen our economy to guarantee a happy and prosperous life to our people.

**Issued By Department of Information**

*Govt. of Goa, Daman and Diu*
*Panaji–Goa.*


मराठीचा विकास : महाराष्ट्राचा विकास


नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास


नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास


नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

अनुक्रमणिका






अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास


नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष







अनुक्रमणिका









अनुक्रमणिका

अनुक्रमणिका










राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास


नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास



नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास


नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

अनुक्रमणिका



राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत



द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका















मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास


नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास


नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

अनुक्रमणिका











नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

अनुक्रमणिका











अनुक्रमणिका

अनुक्रमणिका




राज्य मराठी विकास संस्थेद्वारे संगणकीकृत




द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास




नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास


नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

अनुक्रमणिका








अनुक्रमणिका


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास






नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष


मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास


नवभारत
७५
अमृतमहोत्सवी
वर्ष

